# समर्पण

स्वतःच्या जन्माची होळी झाली,
तिची क्षिति न बाळगतां भावा-
दिरांच्या आणि भाच्या-पुतण्यांच्या
संसारांचे बगीचे फुलवण्यांत धन्यता
मानणारी माझी प्रेमळ भगिनी

तपस्विनी मथूताई
सरस्वतीबाई पटवर्धन
हिला.

ना. धों. ताम्हनकर

गुजाताईनं माझ्या स्वाधीन केलेली ही आत्मकथा मी आज वाचकांना वाचायला देत आहे. या कथेचं पुनर्लेखन माझ्या हातून झालं असलं तरी शक्य तों गुजाताईचंच लिखाण कायम ठेवण्याचा मी प्रयत्न केला आहे. लेखनाचा अभ्यास नसल्यामुळं क्वचित् प्रसंगीं दिसून येणारा दूरान्वय, अवास्तव विस्तार आणि अशुद्ध शब्दप्रयोग असे कांही दोष दूर करण्यापेक्षा मी अधिक लुडबूड केली नाही. पुस्तकावर लेखकाच्या जागीं माझं नांव घातलं असलं तरी मूळ लेखिकेचं ऋण मी प्रांजलपणें मान्य करतों आहे.

माझ्या डोळ्यापुढं घडलेला प्रसंग शेवटीं जशाच्या तसा सांगितला आहे.

मित्र रा. ज. देशमुख यांच्या तगाद्यामुळं हें आता तरी पुरं झालं. त्यांचा लकडा लागला नसता तर हें घोंगडं आणखी किती काळ भिजत पडलं असतं कुणास ठाऊक! कार्यपूर्तीचं समाधान मिळवून दिल्याबद्दल मी त्यांचे मनापासून आभार मानतों. पुस्तकाचं मुद्रण आणि चित्रण करणाऱ्या सहाय्यकांचे मला मोठे उपकार वाटतात. त्यांचाहि मी उतराई आहे.

अधिक श्रावण शुद्ध १३<br>३०-७-४७

ना. धों. ताम्हनकर

# गुजाताई

## १

आज मी प्रवासिनी बनलें आहे.

पण यांत नवल काय केलं ? माणूस जन्माला आला की तो प्रवासीच बनलेला असतो. जन्माला यायचं, बालपणांतून तारुण्याकडं, तरुणपणापासून म्हातारपणाकडं, आणि म्हातारपणापासून मरणाकडं त्याचा प्रवासच नाही का चालूं असत ? या प्रवासांत तो निरनिराळ्या टप्प्यावर थांबतो. तिथल्या सोयी गैरसोयी, तिथलीं सुखदुःखं अनुभवतो; गैरसोयींतनं सोय आणि दुःखांतून सुख काढण्यासाठी, धडपड करीत त्याचा हा प्रवास चालूं असतो. पण हा त्याचा प्रवास तो हौस म्हणून करीत नसून तो त्याला करणं भागच असतं म्हणून तो करीत असतो. या प्रवासांत आणखी एक गंमत आहे. त्याला हा प्रवास जागच्या जागीं बसून करतां येतो. जी जागा त्याच्या वाट्याला येते त्या जागेला चिकटूनच त्याच्या जीविताची यात्रा चालूं असते.

पण माझ्या आजच्या प्रवासाचं तसं नाही. हा माझा प्रवास जीविताच्या यात्रेतलाच एक भाग असला, तरी तो मला करणं भागच होतं असं नाही. गैरसोयींतनं स्वतःची सोय निर्माण करण्यासाठी किंवा असह्य दुःखाचं निवारण करण्यासाठीहि मी हा प्रवास पत्करलेला नाही. खरं सांगायचं तर असंच म्हटलं पाहिजे की माझ्या सुदैवानं मला लाभलेलं ठिकाण लोकांनी हेवा करावा इतकं छान आहे. आणि असं असूनहि तें सोडून मी तेथून बाहेर पडलें आहे. तुम्ही विचाराल असं सुखाचं ठिकाण सोडून बाहेर पडण्याचा खुळेपणा तूं कां केलास ? काय उत्तर देऊं मी तुम्हांला ? सुखानं भरलेलं ठिकाण सोडून बाहेर पडणं हा खुळेपणा नव्हे असं मी कसं सांगूं ? आणि तसं सांगितलं तर कुणाला पटेल

तें ? नाहीच पटायचं. म्हणून मी तुम्हांला कांही न सांगतां तुम्ही काय म्हणाल तें मुकाट्यानं ऐकून घेतें.

पण तुमच्यापुढं मी असं तोंड मिटून बसलें, तरी माझं मन कुठं मला गप्प बसूं देतंय ? मला लाधलेलं सुखच मला असह्य होऊं लागलं आणि म्हणून मी त्यापासून दूर जायचं ठरविलं. हें बरं केलं असं एकदां तें म्हणतं--फार काय ' तूं दूर जा ' असं त्यानंच मला सांगितलं आहे. पण त्याच्या सांगण्याप्रमाणं मी वाट चालूं लागलें, तेव्हा तें फिरून शंका घेतंच आहे ! तुम्हांला जसं कांही सांगायचं नाही असं मी ठरविलंय तसं मनाच्या शंकाकुशंकांकडंहि आतां लक्ष द्यायचं नाही असा माझा निर्धार झालेला आहे.

मी आज प्रवासिनी बनलें आहे. आणि माझा हा प्रवास पाय नेतील तिकडं आणि डोकं सांगेल त्याप्रमाणं चालू रहायचा आहे.

माझ्या सभोंवार काळोख पसरला आहे. मी कोणाला दिसत नाही आणि मलाहि कोणी दिसत नाही. या काळोखांत काट्याकुट्यावर पाय पडून माझी चाल मधेच बंद पडेल का ? जिवाणु बिवाणू तर माझ्या पायाला डसणार नाही ना ? अशी भीति मला वाटती आहे. काट्यानं पुढची चाल बंद केली, तर परत फिरणंहि अशक्य होईल, आणि या आडवाटेवर मधेच कुठेतरी मी अडकून पडेन. तसं झालं तर लोक काय म्हणतील ? काय म्हणणार ? माझ्या माथीं खुळेपणा मारून बसतील मात्र. असं हसं होण्यापरीस जिवाणूं डसून मरण आलेलं मला पत्करेल. पण तसं मरण यावं असंहि मला वाटत नाही. माझ्याभोंवतीं पसरलेल्या या काळोखापलीकडं सुरेख चांगलं चांदणं फुललेलं आहे, आणि त्या चांदण्यांत माझी वाटचाल मोठ्या मजेत चालली आहे, हें माझं मनोराज्य अवचित आलेल्या मरणानं मोडून पडेल. छे ! ती कल्पनाहि मला सहन होत नाहीं. जिवाला वैतागून मरणाला शोधीत मी प्रवासिनी बनलें नाही. तर लाभलेल्या जीविताच्या समाधानांतून नवं नवं समाधान निर्माण करण्याच्या हव्यासानं मी ही वाटचाल सुरू केली आहे.

ते बघा मंगळाच्या चांदणीसारखे लाल लाल डोळे मला खुणवायला लागले. रूळरस्त्याच्या वावटयावर बसून ते मला बोलावत आहेत. तुला वाहून नेणारी गाडी आमच्या पायांतून जाणार आहे असं ते मला सांगताहेत.

अधिक दिवे आणि माणसांचा किलबिलाट! माझ्यासारखींच आणखी माणसं प्रवासाला निघालीं आहेत. माणसांच्या घोळक्यांत आल्यामुळं हायसं वाटतंय, पण कुणी ओळखील की काय अशी भीतीहि वाटतीय.

ज्या मरणाला भीत होतें तें आलंच शेवटीं!

" आँ! बाई तुमी! अन् अशा येकल्या!" एका म्हातारीनं मला विचारलं. कसं ओळखलं या बाईनं मला! मी दचकलें तिच्या या प्रश्नानं. आणि कांही-तरी बोलायला पाहिजे म्हणून बोललें—

" एकटी कशी? गंडी आला होता की पोंचवायला. गाडीला वेळ आहे म्हणून म्हटलं जा परत. रात्रीच्या थंडींत कशाला कुडकुडत पडायचं त्यानं? बरं पण तुम्ही कशा इथं स्टेशनवर?"

" तुमचा शिरपती येनार हाय नव्ह का आज? तीन सालांत भेटलं नाय लेकरूं. कुठं मुलखावर गेलं होतं आन् हालवनवासांत दीस काढीत होतं. भग-वानाच्या किरपेनं जगून वाचून घरला येतंय. म्हणून सांजपासून येऊन बसलेंया हितं. गाडी पहाटेला येणाराय शिरपाची."

" म्हणजे मंजुळाबाई होय तूं! होऊं दे बाई एकदां मायलेकरांची भेट."

" तुमच्या पायावर घालायला घेऊन येईन बरं का बाई. तुम्हा साऱ्यांच्या आश्रीरवादानं त्यो धडपणी घरीं येतोया."

" बरं आण हं मंजुळाबाई. आनंद वाटेल साऱ्यांना तुझ्या श्रीपतीला पाहून."

" पर तुम्ही गांवाला चाललायसां की?"

" अग गेलें तरी येईन मी परत लवकरच." मी धडधडीत खोटं सांगून वेळ मारून नेली. त्या प्रेमळ आईच्या भाबड्या मनाचा विरस करणं मला बरं वाटलं नाही.

आणखीहि दहावीस माणसं तिकिटाच्या खिडकीपुढं ताटकळत आहेत. मंजुळाबाईसारखींच तींहि कसल्या ना कसल्या हुरहुरीनं जमलीं असतील. मंजुळा आपल्या लाडक्या लेकाला उतरून घ्यायला आली आहे, तर ती बघा दुसरी एक बाई आपल्या लेकीला सासरीं पोंचविण्यासाठीं आली आहे. माय-लेकी मध्यरात्र झाली तरी एकमेकीला बिलगून निरोप देण्याघेण्यांत गर्क आहेत. मंजुळेच्या डोळ्यांत समाधानाचे अश्रु चमकतात, तसेच या कंदिलाच्या मिण-

मिणत्या उजेडांत त्या मायलेकींचे विरहाचे अश्रुहि चमकतात! तो पहा म्हातारा मारवाडी आपल्या जवळच्या माणसाला कपाशीचे आणि गुळाचे भाव विचारतो आहे. आणि आपणालाच सर्व गाड्या घालण्याबद्दल त्याला मथवितो आहे. आणि ते चार पांच जण नाशिकच्या कोर्टातल्या खटल्याबद्दल जोशी वकीलाकडं जावं की पोवार बालिष्टराला बोलवावा याचे बेत करीत आहेत. आणि ते पाहिलेत शाळासोबती दिवाळीच्या सुटींत मौज करायला म्हणून कुठंतरी निघालेले आहेत. सगळे प्रवासी आणि सगळ्यांच्या प्रवासाचा उद्देश एकाहून अगदी वेगळा. मी यांपैकी कुणाच्याच प्रकारांत बसत नव्हतें.

तिकिटाची खिडकी उघडलेली दिसते. कोण गर्दी आणि किती घाई! आधी तिकिट मिळविलं तरी गाडी यायची तेंव्हाच येणार. आणि साऱ्यांचा प्रवास एकदमच सुरू होणार. पण हा विचार कोणंच कसा करीत नाही? प्रत्येक गोष्ट पहिल्यांदा आपणाला मिळाली पाहिजे यासाठी माणूस किती धडपडतो!

आता या दोन माणसांचं झालं की माझी पाळी येणार. आणि मी तिकिट मागणार. पण कुठलं तिकिट मागूं मी? मी प्रवासाला निघालें आणि कुठं जायचं हेंच मला ठाऊक नाही! तुमचं सोडा, पण माझं मलासुद्धां नवल व टतंय या खुळेपणाचं, पण खूळ असलं तरी तें आता कडेला लावायलाच पाहिजे.

"नाशिकचं एक तिकिट द्या मास्तर."

"नाशिकचं! ही गाडी भुसावळला जातीय. नाशिकची गाडी पहाटे साडे-पांचला आहे. उचला हे आपले पैसे.

"नाशिकला जात नाही ही गाडी? बरं तर भुसावळच्या आदल्या स्टेशनचं तिकीट द्या.

"म्हणजे तुम्ही कामासाठी कुठं निघालांय कीं नुसतं आगगाडींत बसून फिरायचं आहे तुम्हाला? मघाशी नाशिकला निघालां होतां आणि आता म्हणतांय भुसावळ!"

"भुसावळकडंच जायचं मला. चुकून नाशिक म्हटलं मी."

"ठीक आहे. हें भुसावळचं तिकिट आणि हे उरलेले पैसे. भुसावळच्या अलीकडच्या स्टेशनवर गाडी थांबत नाही म्हणून भुसावळचं दिलंय तिकिट."

तिकिटाला किती पैसे पडले आणि पैसे परत आले ते किती, हें बघायचं-

सुद्धां वाटलं नाहीं मला. फार फजीती न होतां तिकिट हातांत आलं हेंच पुष्कळ झालं.

गाडीचा दिवा दिसायला लागला आहे. आपापलीं बोचकीं उचलून सगळीं-जणं कशीं सज्ज होऊन राहिलीं आहेत. जरा दमानं घ्या बाबांनो. गाडी थांबूं दे तरी पुरती ? आणि समोर आला त्याच डब्यांत कां अशी रेटारेटी ? करा बाबांनो. मी आपली पुढं जाऊन बघतें कुठं शिरकाव झाला तर. छान झालं की ! हा बायकांचा डबा खूपच रिकामा आहे. बरं झालं, चांगली जागा मिळाली. आलीच झोंप तर आडवं सुद्धां होतां येईल.

पण मला झोप यायला थोडीच बसलीय ! गाडी बरोबर माझ्या डोक्यांतले विचारहि लागलेत धावायला. आणि गंमत बघा हं कशी होते आहे ती ! गाडी बरोबर मी पुढं सरकतें आहे आणि माझे विचार मात्र परत घरीं चालले आहेत! उद्यां मी घरीं दिसलें नाहीं, तर कोण बोभाटा होईल ! शेजारीपाजारी, इष्ट-मित्र, सगळ्या ठिकाणीं चौकशी सुरू होईल. पैपाहुण्यांकडं, माझ्या माहेरील माणसांकडं तारा, पत्रं रवाना होतील. कुणी माझ्या थिल्लरपणाबद्दल नावं ठेव-तील, कुणी भरलेल्या घरांतून बळेबळे देशोधडीला लागल्याबद्दल मला कर्मदरिद्री म्हणतील, कुणी वरून गोजिरवाणं दिसणारं माझं घर आंतून त्रासदायक असेल असा तर्क लढवून भल्या माणसांवरहि आग पाखडतील. हजारांच्या हजार जिभा आपापल्या स्वभावधर्माप्रमाणं वळवळायला लागतील. वळवळेनात ? मला आतां त्याचे थोडेच चटके बसणार आहेत ? पण निरपराधी माणसांना त्यांचे फटकारे सोसावे लागणार. आणि त्याचा दोष कुणाकडं ?. माझ्याकडंच नाही का ?

बरं झालं हें बाळ रडायला लागलं आणि त्याची आई त्याला उगी करत असतांनाहि त्याचं तोंड मिटत नाही. बाई बाई ! काय हातपाय झाडतंय ! होतंय तरी काय त्याला ! ' बाई द्या बघूं त्याला माझ्याकडं'' शेजारच्या बाईला कळवळा आला. तिच्याजवळहि लेकरूं झोपलंय. आईनंच आईची अडचण ओळखावी म्हणतात तें खरं. पण तिच्याजवळ तरी कुठं राहातंय तें ? आपण तरी बघावं आपल्याला कांही करतां येतंय का ? त्याच्या बरोबर त्याच्या आईलाहि रडूं यायला लागलं कीं !

" ये बाळ माझ्याकडं, उगी राहायचं हं आतां. शहाणा माझा राजा तो, उगा ग, उगा ग, हात रे काऊ, बघ गाडी कशी धावतीय ! कशासाठी पोटासाठी म्हणती आहे ! "

अगबाई ! अस्सं आहे होय ! सोन्याची झाली म्हणून तार बोचल्याशिवाय का राहील ? आत्ता गप्प करतें मी बाळाला. आयांना मुलांना दागिने घालायचा तेवढा सोस. पण त्यापायीं त्यांना कासावीस व्हायची पाळी येते हें कुठं लक्षांत येतं त्यांच्या ? डुलाचा आकडा उचकटून कानाच्या पाळींत रुतल्यावर पोर कळवळेल नाहीं तर काय करील ?

" घ्या आई तुमचं बाळ. झालं गप्प. जरा मांडीवर घेऊन थोपटा म्हणजे आत्ता झोप लागेल त्याला. रडून रडून दमलं बिचारं. "

" तुमच्यातरी हातगुणानं तोंड मिटलं मेल्याचं. एकेक वेळां चळ भरला की अस्सा पुरेवाट करतो. तुम्ही मंत्र बिंत्र घातलांत की काय तरी ? "

" मंत्र नाही, पण थोडंसं तंत्र केलं मी ! " मी काय चेटुक केलं तें समजावून दिलं तेव्हां ओशाळल्यासारखा चेहरा झालाय त्या माउलीचा. आतां दुसरीकडं बोलणं वळवलंच पाहिजे असं ओळखून मी म्हटलं " कुठपर्यंत जायचंय ? नाशिकहून आलां वाटतं ? "

" जायचं आहे खूप दूर. उद्यां संध्याकाळ होईल घरीं पोंचायला. आज सकाळीं घर सोडलंय. अलीबागेपाशी गांव आहे आमचं. तिथनं मुंबई आणि मुंबईहून रामगांव. "

" म्हणजे रामगांवला असतां तुम्ही ? "

" रामगांवाहून आंत सतरा कोस आहे आमचं गांव. "

" मग तान्हं मूल घेऊन इतकं दूर जायचं तर पोंचवायला कोणी बरोबर कसं आलं नाही ? "

" कोण येणार ? देवाच्या दयेनं दुसरी कसली ददात नाही मला, पण माणुसबळाच्या नावानं खडखडाट आहे. माहेरीं एक म्हातारी मावशी होती. ती आजपावतर उपयोगी पडत होती अडीअडचणीला. पण गेली बिचारी देवाच्या घरीं. तिचं फार झालं म्हणून पत्र आलं तेव्हा गेलें. नशीब म्हणून

गाठतरी पडली अखेरची. आता त्यांना मी आणि मला हे. नोकरीमुळं त्यांना नाही यायला होत. बरं पण तुमी कुठं चाललांय ? ”

“ कुठंतरी. ” माझ्या या उत्तराचं आश्चर्य वाटलं त्यांना. त्यांनी विचारलं,

“ कुठंतरी म्हणजे ! माझ्याबरोबर आमच्या घरीं चला म्हटलं तर याल ? ”

“ हो, आनंदानं. ” मी सांगून टाकलं “ मी हवं असलं तर तुमच्याबरोबर येईन. मला कुणावर भार न घालतां कुठंतरी राहायचं आहे. माझ्या हातून होईल तेवढी मी तुम्हांला मदत करीन. पण माझी एक अट आहे. ती तुम्ही पाळली पाहिजे. ”

“ सांगा तरी ? ”

“ माझ्याबद्दल तुम्ही कसलीहि चौकशी करायची नाही. माझं नांव गुजाताई आणि मी कुलशीलवंताची बायको आहे. जातीनं ब्राम्हण आहें मी. कुणाचा बोल येईल अशी कोणतीहि वाईट गोष्ट माझ्या हातून घडलेली नाही, कोणत्याहि हिंदु कुटुंबांत काम करायला मी तयार आहे. एवढी माहिती मी होऊन तुम्हाला सांगतें. याहून अधिक चौकश्या तुम्ही करूं नयेत आणि केल्यात तरी मी कांही सांगायची नाही. ही मी तुमच्यासमोर दिसतें आहे, तशा स्थितींत माझी सोबत तुम्हांला पत्करण्यासारखी असेल तर सांगा. मी भुसावळला उतरणार आहे. तिथपर्यंतचंच तिकिट आहे माझं. भुसावळपर्यंत विचार होऊं दे तुमचा. ”

“ कांही नको विचार करायला. चलाच माझ्याबरोबर तुम्ही गुजाताई. ”

“ ठीक आहे. तुमची घरांत पूर्ण सत्ता असेल असं मी समजून चालतें. तरीपण आधीपासून सावधगिरी घेतलेली बरी म्हणून विचारतें, तुमच्या पुरुषांना माझं हें लोढणं तुम्ही गळ्यांत बांधून घेतलेलं नाही आवडलं तर ? ”

“ तें माझं मी बघून घेईन. ”

आणि खरोखरीच मी सौ. आक्कांच्याबरोबर दिवेवाडीला आले. आक्कांचे यजमान बापूराव मला पाहून बाचकले आणि प्रथम कांही वेळ ते माझ्याशीं परकेपणानेंच वागत. पण आठचार दिवसांत आक्कांच्या घरांत मी सर्वांना हवीहवीशी वाटूं लागलें.

माझ्या प्रवासाचा हा पहिला टप्पा मी गांठला. वावटळींत पाचोळा उडावा आणि तो कुठंतरी जाऊन पडावा तसंच नाही का हें झालं? थोडी नव्हे थोडकी नव्हे चोवीस पंचवीस वर्षं ज्या कोंडाळ्यांत मी अडकून पडलें होतें, त्यांतून मी निखळलें आणि शे दोनशे कोसांवर व दिवेवाडीसारख्या आडवळणी खेड्यांत येऊन पोंचलें. आडवळणी खेड्यांत आलें हे अगदीं माझ्या मनासारखं झालं. अज्ञातवासांत राहायचा माझा हेतु शहरगांवपेक्षां खेड्यापाड्यांतच तडीला जाईल असं मला वाटलं आणि असं सोइस्कर ठिकाण लाभल्याबद्दल मी देवाला मनोमन नमस्कार केला.

पण या थारेपालटामुळं मला वाटलेलं समाधान फार काळ टिकलं नाही. मला रहायला जागा नव्हती आणि मी छळवादी माणसांच्या गराड्यांत वैतागून गेलें होतें असं मुळीच नव्हतं. फार काय, माझ्या पात्रते-पेक्षा कितीतरी जास्त मोठेपणा मला माझ्या घरांत लाभलेला होता. आक्का बापुरावांच्या घरीं मला याहून अधिक तें काय मिळालं? मग पहिली जागा सोडून ही दुसरी जागा मिळविण्यांत मी काय साधलं? फारा दिवसांच्या सह-वासांतल्या माणसांचं मन दुखवून हे नवे लागेबांधे जोडण्याचा आटापिटा केला तरी कशाला? अशा एक ना दोन हजार शंका माझ्या मनांत थयमान घालायला लागल्या. आणि माझं मन म्हणायला लागलं—

" छे, एवढ्यासाठीच तूं घराबाहेर पडली नाहीस. दैवयोगानं आयतं मिळालं, त्यांतच घुटमळत राहाण्यापेक्षा आणि दुसऱ्या माणसांच्या केवळ चांगुलपणावर तरंगण्यापेक्षा स्वतःचं वेगळं जीवन निर्माण करून त्यानं जगाला चकित करावं अशी तुला तळमळ लागली होती, म्हणून तूं घराबाहेर पडली आहेस. प्रवाह-पतित म्हणून काळ कंठूं नको. "

पण असं कांहीतरी मी काय करूं? आणि कशाच्या जोरावर? पैशाच्या जोरावर पुष्कळ गोष्टी करतां येतात. पण माझ्यापाशी त्याच्या नावानं शून्यच होतं. विद्या होती म्हणावं तर तिकडूनहि खडखडाट. रावजींनीं जेवढं वाचन मला करायला लावलं आणि जे नवे नवे विचार माझ्या कानांवर घातले, एवढाच शिक्षणाचा संस्कार माझ्या मनावर झालेला. अशा सामुग्रीवर मला काय करतां येणार अशी भीति मला वाटूं लागली.

पण त्याच वेळीं मला रावजींकडून ऐकायला मिळालेले विचारहि धीर देत होते. ‘ महत्कार्य करायला साधन सामुग्रीपेक्षां मनाची तळमळ अधिक साहाय्य करते. पैशावाचून आणि पदव्यावाचून करतां येण्यासारख्या कितीतरी गोष्टी जगांत असतात. त्या शोधल्या पाहिजेत, केल्या पाहिजेत. कांही साधतील कांही फसतील. साधतील त्याच्यापुढल्या गोष्टींचा शोध करायचा, फसतील त्यांचा नाद सोडायचा. साधल्याबद्दल हुरळून जायचं नाही, फसल्याबद्दल नाउमेद व्हायचं नाहीं. ’ रावजींनी सांगितलेली विजापुरच्या उपल्या बुरुजाची दंतकथा माझ्या मनांत पक्की बिंबलेली होती. गोवऱ्या विकून एका बाईनं तो प्रचंड बुरुज बांधला म्हणे ! तिच्यापाशी का पैसा होता की विद्या होती ? पण तिनंसुद्धा एक प्रचंड कार्य करून ठेवलं. आज शेकडो वर्षं तें तिच्या कर्तबगारीची साक्ष देत उभं आहे.

विचारांच्या अशा घासाघिशींत कांही दिवस गेले. मी आक्कांच्या घरांत त्यांना जास्तींत जास्त सुखांत ठेवण्याचा प्रयत्न करीत दिवस कंठत होतें. स्वयंपाकाचं काम आक्का करीत, पण धुणंपाणी, भांडी, दळण, मुलांचं न्हाणं माखणं औषधपाणी मी संभाळीत होतें. माझी राबणूक पाहून आक्का आणि बापूराव कधी कधी रागवतसुद्धा. बापूराव तर माझ्याबद्दल आक्कांना बोलत. एके दिवशीं त्या नवराबायकोंचा संवाद सहजगत्या माझ्या कानावर आला—

“ गुजाताई आल्यापासून भारीच मिजास वाढलेली दिसते तुझी. जेवण झाल्यावर आंचवून घेत नाहीस तिच्याकडून हें नशीब तिचं. ”

“ इकडून असे टोमणे मिळण्याजोगं झालं आहे खरं. पण मी बळेनं कां लावतें तिला कामाला ? ती आपण होऊन करते सारीं कामं त्याला मी काय करूं ? मी कांही करतें म्हटलं तर म्हणते ‘ तुम्हा लेकुरवाळ्यांना मुलांच्या खस्ता खातांना पुरेवाट होते. आणखी काय करायला पाहिजे तुम्ही ? ’ आणि असं म्हणून मुलांचीं कामंसुद्धा तीच करून टाकते मला पत्ता सुद्धा लागू न देतां. पगार वाजवून घेणारे चाकरसुद्धा करायचे नाहीत असे कष्ट फुकटावारी करतेय. माझा जीव थोडाथोडा होतो हें बघून. ”

“ गुजाताईच्या खाण्यापिण्याची तरी काळजी घेत जा नीट. आणि तिची लुगडींबिगडीं बऱ्यापैकी घे. ”

" होय बाई, तेवढी एक गोष्ट मात्र बरी आहे गुजाताईची. नाकाओठावर जेवत नाही ती. दोन्ही वेळेला चांगलं पोटभर जेवते. मधे अधे मात्र कांही खायची नाही हो! आतां लुगड्यांबद्दल म्हणायचं झालं म्हणून सांगतें, आलींच आहेत तिचीं पातळं फाटायच्या लागाला. तेव्हां येत्या पहिल्या तारखेला रामगावला जाणं होईल, तेव्हा घेऊन यावीं दोन चांगल्यापैकी लुगडीं आणि पोलक्यांच्यासाठी कापड, पांघरायसाठी एक रग नी चादरहि आणावी. दोन कांबळ्याच्या बिछान्यावर झोपतेय नुसत्या. घरांत गाद्या आहेत, त्यांतली एक घे म्हटलं तर ' एक का, गरज वाटेल तेव्हा दोनसुद्धां घेईन ' असं उत्तर दिलंन्. एकेका वेळीं तऱ्हेवाईकपणा करते. अन् असं कां म्हणून विचारलं तर ' कसल्या चौकश्या करायच्या नाहीत ' ही तिची ताकीद आहेच ! '

त्यांच्या या बोलण्यावरून मला धीर आला. आपण त्यांना जड वाटतों की काय ही माझ्या मनांत कधी कधी डोकावणारी शंका पार पळाली. एवढंच नव्हे, तर आपण केलेल्या कष्टांबद्दल त्या नवराबायकोंना उपकार वाटतात हें मोठं समाधान मला वाटायला लागलं. कुणी किती रक्त आटवलं तरी त्याची जाणीव नसलेले कृतघ्न लोक मी पाहिलेत. आक्का, बापुराव त्या जातींतलीं माणसं नव्हतीं. मी अंगीकारलेल्या नव्या जीवनक्रमाच्या मंगलचरणाला अशीं गोडवीं माणसं मला भेटलीं हा एक शुभशकुनच मला वाटूं लागला.

दुसरे दिवशीं मी एक गम्मत केली. सर्वांत स्वस्त पण टिकाऊ अशीं काळ्या निळ्या रंगाचीं दोन पातळं मी माझ्यासाठीं घेऊन आलें. आणि ती आक्कांना दाखवून म्हटलं " साडे नऊ रुपयांला आणलींत हीं तुमच्या दामोदरशेठजीकडून. बापूंना सांगा तेवढे पैसे पोंचते करायला. "

" हीं का पातळं नेसणार आहेस तूं गुजाताई ! कुणी सांगितला होता तुला हा कारभार ? तुला चांगल्यापैकी लुगडीं घ्यायचं ठरलं होतं यांचं. "

" मग हीं पातळं वाईटपैकी आहेत असं कशावरनं ठरवलंत तुम्ही आक्का ! वरीसभर हीं खात्रीनं टिकतील. त्याच्याआंत फाटलीं तर घ्यायची नाही मी नवीं. बघाच तुम्ही. माझीं लुगडीं आणायचं बापूंचं काम मीच उरकून टाकलं हें बरं नाही का झालं ? "

" होय बाई, तूं करतीस तें बरंच असतं सदोदित. " आक्का बोलल्या

घुश्श्यांत बोलल्या आणि दुपारीं माझी खरेदी बापूंच्या पुढं ठेवून म्हणाल्या— " हीं जाजमं आणलीं आहेत गुजाताईनं. "

" जाजमं ! आणि तीं कशाला ? " बापूंनी विचारलं.

" स्वतःला नेसायला. " आक्का म्हणाल्या आणि मी केलेल्या या कारभाराबद्दल त्यांनी आपली नापसंती तिखटमीठ लावून नवऱ्यापुढं प्रगट केली.

बायकोची समजूत घालण्यासाठी बापू म्हणाले " अग, तूं इतकं हें काय करती आहेस ? गुजाताईनं हीं पातळं आणलीं असलीं तरी ती कांही घेतलेलीं नाहींत. संध्याकाळीं हीं परत करून दुसरीं चांगलीं लुगडीं तूं म्हणतेस तशीं घेऊन येतों मी. मग तर झालं ना ? "

आक्कांचा राग थंड झाला. बापू खरोखरच म्हटल्याप्रमाणं करतील आणि माझी युक्ति फिसकटून टाकतील असं मला वाटलं. पण तसं होऊं न देण्याची दुसरी युक्ति मला सांपडली. आणि एक नामी संधीहि चालून आली. आणलेल्या पातळांतल्या एकाची घडी मोडून मी नेसलें आणि दुसरं भिजवून वाळत टाकल्यावर मी रोजच्याप्रमाणं बाहेर गेलें. गावांत एक चक्कर मारायची आणि कुणी अडलं नडलेलं असेल तर त्याला कांही मदत करतां आली तर करायची असा क्रम मी ठेवला होता. आज मला एक चांगलंच काम मिळालं.

दिवेवाडीला सरकारी दवाखाना आणि डॉक्टर नव्हता. पण पेन्शन घेतलेले डॉक्टर देव नांवाचे होते, ते तिथं येऊन आपल्या मळ्यांत राहिलेले होते वाडींत त्यांनी आपला एक लहानसा दवाखानाहि ठेवला होता कुणी फी दिली तर घ्यायची, नाही दिली तर नडवायचं नाही, अशा तऱ्हेनं ते त्या पंचक्रोशींतल्या लोकांच्या उपयोगी पडत होते. मी त्यांची आक्कांच्या मुलांच्या निमित्तानं ओळख करून घेतली होती आणि त्यांच्यासारखी लोकसेवा करायची संधि मिळाली तर मलाहि आनंद वाटेल असं मी एकदां त्यांना म्हटलं होतं.

आज मी गांवांतून चाललें असतांना डॉक्टर देव एका छकड्यांतून माझ्यापुढून चाललेले मला दिसले. त्यांचेंहि लक्ष माझ्याकडं गेलं आणि त्यांनी छकडा थांबवून मला म्हटलं " दवाखान्यांत चला गुजाताई. तुम्हाला पाहिजे होती ना ! तशी संधि आली आहे आज. "

शेजारच्या एका खेड्यांत एका गरीब शेतकऱ्याच्या बाळंतीण बायकोला

पाहून डॉक्टर देव आलेले होते. खेडवळ सुईणींनी केलेलं बाळंतपण तिला भोवलं होतं. आणि आज तिची प्रकृति चिंताजनक झालेली होती. डॉक्टरनी इंजेक्शन दिलं होतं. आणि औषधयोजनाहि केलेली होती. परंतु एवढयानं भागण्यासारखं नव्हतं. डुश् का काय म्हणतात ना तें तिला द्यायला हवं होतं. आणि त्यासाठीं नर्सची मदत हवी होती. त्या खेडयांत कुठली आली आहे नर्स ? आणि शहरगावाहून धंदेवाईक नर्स बोलवायची तर त्या गरीब शेतकऱ्या-पाशी पैसा कुठं होता तिला द्यायला ? अशा स्थितींत त्या बिचाऱ्याचं नशीब देवाच्या हातीं सोंपवून स्वस्थ बसण्यापलीकडं डॉक्टरांना आणि त्या गरीब माणसांना कांही करतां येण्यासारखं नव्हतं.

" गुजाताई, तुम्ही होतां कां त्या बाईची नर्स ? " डॉक्टर देवांनी मला विचारलं.

" मी ! जन्मांत कधीं केलेलं नाहीं हें काम. आणि दुखणं साधंसुधंहि नव्हे. असलं जोखमीचं काम पत्करायला भीति वाटते मला. माझ्या एकाद्या चुकीनं बिचारीच्या प्राणावर बेतायचं. "

" कांही नाही बेतत. बरोबर कराल तुम्ही साऱ्या गोष्टी. अवघड काय असतं त्यांत ? मी समजून देतों तुम्हांला काय काय आणि कसं करायचं तें. अहो, आमचा गडी सुद्धा करतो असल्या गोष्टी. मग तुम्हालाहि न यायला काय झालं ? बघा, मरणाच्या दारांत बसलेल्या तुमच्या एका भगिनीला वाचविल्याचं श्रेय मिळेल तुम्हांला. प्रयत्न करणं आपलं काम. त्यानंतर देवाची मर्जी. "

डॉक्टर देवांच्या बोलण्यांत अशी जादू होती की त्यांना ' नाही ' म्हणणं माझ्याहातून होईना. शिवाय स्वतःचं असं विशेष कांहीतरी करून दाखवि-ण्याची माझ्या अंतरीची इच्छा त्या वेळीं बळावली. नव्या प्रकारचं काम, नवा अनुभव मिळविण्याची चालून आलेली संधि गमावणं मला प्रशस्त वाटेना. मी अधिक कांही विचार न करतां म्हटलं, " आपण सांगाल तें काम करायला तयार आहे मी. केव्हा जायला पाहिजे ? "

" माझी खात्रीच होती तुम्ही माघार घेणार नाही अशी " डॉक्टर हंसून म्हणाले " कधी जायला पाहिजे म्हणाल, तर ताबडतोब जायला पाहिजे

आहे. याआधींच उपचार व्हायलं पाहिजे होते बाईला. घटका तासाचा उशीर सुद्धा घातुक आहे. तुम्ही आलेल्या गाडींतून आत्ताच्या आत्ता निघाला तर बरंच होईल."

"ठीक आहे. घरीं जाऊन सांगून येतें. नाहीतर आक्का बापू उगीच काळजी करीत बसतील."

"उत्तम. आणि हें पहा तुमचे कपडे आणि चालचलाऊ अंथरूण पांघरूणहि घेऊन या. एखादा दिवस रहावं लागेल तिथं, तुम्ही येईपर्यंत औषध आणि सगळी साधनसामुग्री तयार करून ठेवतों."

मी घरीं गेलें. माझी एक मैत्रीण चार कोसांवरच्या गावीं आली आहे, तिचा 'ताबडतोब निघून ये' असा निरोप आला आहे. मी एकदोन दिवस तिच्याकडं जाऊन येतें, असं कांहींतरी सांगून मी निघालें. एका शेतकऱ्याच्या घरीं मला जायचं आहे एवढंच नव्हे, तर दिवस दोन दिवस तिथं राहायचं आहे असं सांगितलं तर आक्कांच्या ब्राह्मणी मनाला मानवणार नाही, अशी मला भीति वाटली म्हणून मी ही काल्पनिक मैत्रीण त्यांच्यापुढं उभी केली.

"तुझ्या या मैत्रिणीला इकडं कां नाही बोलावत ? आतां तूं स्वतः जाती आहेस तर त्यांना घेऊन ये आपल्याबरोबर" असं आक्का म्हणाल्या. मी "बरं आहे" असं म्हणून वेळ मारून नेली.

डॉक्टरनी औषध कसं द्यायचं, उस्तवारी कशी करायची, याची मला समजूत दिली आणि शेतकऱ्याच्या छकड्यांतून मी माझ्या नव्या कामावर निघालें.

## २

खेड्यांतल्या एका शेतकऱ्याच्या छपरांत शिरतांना मला कसंसंच वाटलं. तिथं येणाऱ्या कुबट दर्पानं मला मळमळल्यासारखं व्हायला लागलं. कशाला आलों आपण असल्या ठिकाणीं असं मनांत आल्यावाचूनहि राहिलं नाही. पण

ज्या कामासाठी आपण आलों, तें काम न करतां किंवा अर्धवट सोडून पळ काढणं माझ्या स्वभावाला मानवण्यासारखं नव्हतं.

मी तिथं गेलें, तेव्हां बरीच रात्र झाली होती. आपला औषध आणायला गेलेला बाबा अजून कां आला नाही, म्हणून द्रुपदी आणि धाकटा अर्जुन घाबरीं होऊन बसलीं होतीं. दिवा लावायचं भानहि त्यांना नव्हतं. त्यांची बाळंतीण आई कोपऱ्यांतल्या खाटेवर कण्हत पडलेली होती. ती शुद्धीवर होती की नाही कुणास ठाऊक ? कारण आमचं बोलणं ऐकून तिनं आमची कसलीच दखल घेतलेली दिसली नाही.

दशरथनं घरांतला एकुलता एक दिवा—जस्ताच्या पत्र्याची चिमणी लावून मला आपल्या बायकोकडं नेत म्हटलं " द्रुपदे, बळीरामच्या म्हातारीकडं जाऊन थोडं ताजं दूध घेऊन ये. डाक्टरीणबाई आल्यात अन् त्यांना पाहिजे म्हणावं. "

मला प्रथम बाळंतिणीकडं लक्ष देणं अवश्य होतं. मी दशरथकडून पाणी तापवून घेऊन डॉक्टरनी सांगितल्याप्रमाणं उपचार केले. डॉक्टरनी दिलेलीं औषधं तिला दिलीं. द्रुपदीनं करून ठेवलेल्या भाकरी दशरथानं आणि मुलांनीं खाल्ल्या. माझ्यासाठी तांदूळ आणण्याची तयारी दशरथनं दाखविली पण आज उपास असल्याचं खोटंच सांगून मी दुधावर भागविण्याचं ठरविलं. मुलं निजलीं. दशरथ इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगत कांही वेळ बसला, पण दिवसभराच्या यातायातीनं आणि आधीच्या चार सहा दिवसांच्या जाग्रणानं त्याची कुडीहि आडवी झाली. झोपेनं त्याच्यावर आपला अंमल बसविला.

मीहि आडवी झालें, पण मला झोंप येईना. दर दोन तासांनी ताप पाहून त्याच्या चढउताराप्रमाणं औषध द्यायचं होतं. तें दडपण माझ्या मनावर असल्यामुळं मला झोप लागणं शक्यच नव्हतं. इतर वेळीं जमिनीला पाठ लागली की झोंप लागते पण कसली जबाबदारी असली की माझी झोंप कुठं पळून जाते कुणास ठाऊक ! मध्यरात्रीचा सुमार झाला असेल. कौसल्येचा ताप खूपच वाढला. तिची शुद्धहि उडाल्यासारखी वाटली. मी घाबरलें. तिचं कांही बरंवाईट झालं तर ? या भीतीनं माझी छाती धडधडायला लागली. त्याच वेळीं घुबडाचा घूत्कार माझ्या कानांवर आला. असल्या शकुनापशकुनांवर विश्वास ठेवणं हा

वेडेपणा आहे हें रावजींनीं मला पटविलेलं असलं, तरी त्या वेळीं त्या घूत्कारानं माझी भीति बळावली हें खोटं नाही. पण भीतीनं हातपाय गाळले म्हणून तरी काय उपयोग होता ? संकटंच माणलाला धीट बनवितात हें खरं. मी कौसल्येच्या कपाळावर गार पाण्याची घडी ठेवली. तिला औषध पाजलं.

दशरथाचं दैव चांगलं म्हणा, द्रुपदी अर्जुनची पुण्याई सबळ म्हणा, की माझा हातगुण म्हणा, पहाटेच्या सुमाराला कौसल्येचा ताप बराच उतरला, आणि ती थोडी हुषार झाल्यासारखी दिसूं लागली. मग मला धीर आला.

दशरथाला आपल्या बायकोच्या प्रकृतींतली ही सुधारणा पाहून आनंद वाटला. तो सद्‌गदित होऊन म्हणाला " बाई, वाचवा तिला, पोरांचा दुवा घ्या. "

आम्ही शहरचीं माणसं ढीगभर बोलतों. गोजिरवाणे गुलगुलीत शब्द पेरून आमची भाषा नटवण्याचा प्रयत्न करतों. पण त्यांत अंतःकरण नसल्यामुळं त्या भाषेचा परिणाम होत नाही. दशरथाच्या त्या वेळच्या मोजक्या शब्दांत त्याचं भावडं आणि हळुवार झालेलं अंतःकरण प्रकट होत होतं. त्या शब्दांनी मलाहि गहिवरल्यासारखं झालं.

रात्रीचा सगळा प्रकार लिहून मी दशरथाला डॉक्टर देवांकडं धाडलं. माझ्या जेवणाची व्यवस्था गांवच्या जोशांकडं करून मग जाईन असं तो म्हणाला. पण माझ्या जेवणाची व्यवस्था माझी मी पाहातें असं सांगून मी त्याची रवानगी केली.

कौसल्येचं तोंड धुतलं, तिला फिरून एकदां डुश दिला. थोडं दूध पाजलं. तिला अमळशानं थोडी झोंप लागली. द्रुपदी अर्जुन आपल्या रोजच्या दिनचर्येला लागलीं होतीं. एवढासा सहासात वर्षांचा पोर, पण शेणगोठा करतांना पाहून मला मौज वाटली. द्रुपदी तरी मोठी थोडीच होती ? पण तिनं विहिरीवरून चार पांच कळश्या पाणी आणलं. रात्रीचीं खरकटीं भांडीं उजळलीं. अधून मधून ती आईच्या खाटेवर डोकावून जाई. आईच्या आजारीपणामुळं ती भिऊन चूर झाली होती. तिला आपल्या मनांतील तगमग बोलून मात्र दाखवितां येत नव्हती.

" बाई तुम्ही कुठं जेवायच्या ? " तिनं मला विचारलं.

" तूं कुठं जेवणार आहेस ? " मी तिला विचारलं.

" कुठं म्हंजे हतंच की. आतां भाकरीच करणार मी. आणि वांग्याचं कोरड्यास बी. काल सांच्यापारीच वांगीं आणून ठेवल्यात. "

" मग तुझ्या कोरड्यास भाकरींतनं मला नाही का कांही मिळणार ? "

" माझी भाकरी तुमी खाणार ? "

" तुझ्याइथं पाहुणी आलेंय ना मी ? मग पाहुण्यानं जेवणखाण तुझ्या इथंच नको का करायला ? "

" पण तुमी बामण ! "

" कुणी सांगितलं तुम्हांला ? मी तुमच्यांतलीच आहे. आणि मी तुमच्यांतच जेवणार. जेऊं ना ? "

" खासं हुईल बाई तुमी आमच्यासंगट ज्येवाल तर. खरंच ज्येवणार तुम्ही ? "

" खरं खरं खरं. पण माझी एक अट आहे हं. स्वयंपाक मात्र माझा मी करणार. "

" त्ये कशापायी ? तुमी आईचं कित्ती केलंसा; सैपाक कशाला आणीक ? "

" मी सांगीन तसं ऐकायचीस म्हणे तूं. "

मी विहिरीवर जाऊन स्नान केलं आणि भाकरी करायला बसलें. द्रुपदी मला हाताशीं मदत करायला होती. मोठी चुणचुणीत पोर ! आम्हा शहरवासी पांढरपेशा मुलींचा कामाला पाय मागं. तसा प्रकार त्या पोरींत नव्हता.

" बाई, आईच्या जिवाला बरं वाटत असतं तर तिनं तुम्हाला इकडची काडी तिकडं करूं दिली नसती. कधी बरी होणार ती बाई ? "

" अग होईल चार दिवसांत ! " मी तिला धीर दिला.

" खरंच बरी होईल आई ? पल्याडली गौराबाई काल म्हणत होती असलं दुखणं भारी वंगाळ असतं म्हणून. त्या भिकूसाच्या बायकोला गतवर्षीं असलंच दुखणं झालं नी ती मेली म्हणे. माझी आई बरी होऊं दे हो बाई. लई चांगली हाय. "

" चांगली आहे ना तुझी आई द्रुपदी ? मग ती बरी होणारच. चांगल्या माणसांवर देवाची मर्जी असते. त्याचं दुखणं देव बरं करतो. "

" माझी आई बरी होईपर्यंत तुम्ही हितंच राहा हं बाई. पाया पडत्यें मी तुमच्या. "

दशरथाच्या कळकळीपेक्षा द्रुपदीच्या हळवेपणानं माझं मन अधिक सद्‌गदित झालं. तिनं सारखं असंच बोलत रहावं असं मला वाटलं.

डॉ. देव दरदिवसाआड येऊन औषधं देत व त्यांनी दिलेल्या सूचनेप्रमाणं मी कौसल्येची शुश्रूषा करीत राहिलें. पंधरा दिवसांत बाळंतीण धोक्यांतून पार पडली असं डॉक्टरनीं सांगितलं. दशरथच्या डोळ्यांत आनंदाचे अश्रु भरले. त्याचा गळाहि भरून आला. आवंढा गिळून तो म्हणाला " या माउलीच्या हातगुणानं माझ्या लेकरांची आई परत आली. "

" वेडा तर नाहीस ना तूं दशरथ ? डॉक्टरांच्या रूपानं देव भेटला कौसल्येला. देव तारी त्याला कोण मारी म्हणतात ना तें खरं झालं. मी काय करणार रे अडाणी बाई ? " मी म्हणालें.

त्यावर डॉक्टरनीं म्हटलं " दशरथ म्हणतो आहे तें खरं आहे गुजाताई. डॉक्टर नुसतं औषध देतो. पण रोग्याला औषधापेक्षाहि शुश्रुषेची खरी गरज असते. औषध एकपट तर शुश्रूषा दसपट गुणकारी असते. तुम्ही आपल्या शुश्रूषेनं कौसल्येला काळाच्या दाढेतून बाहेर काढलं. "

डॉक्टरांच्या या शिफारशीनं माझे श्रम सार्थकीं लागल्यासारखं मला वाटलं.

डॉक्टर परत निघाले तेव्हां मी विचारलं " आतां माझी गरज नाही ना इथं ? मी येतें आपल्याबरोबर. "

" तुम्ही नका जाऊं बाई इतक्यांत. " द्रौपदीनं आर्जवी स्वरांत म्हटलं.

अर्जुन माझ्या पायाला विळखा घालून राहिला. मी खरोखरच जायला निघालें असं त्याला वाटलं आणि मला अडवून धरण्यासाठीच त्यानं मला असं धरून ठेवलं होतं. त्याच्या बालबुद्धीला बोलायचं सुचत नव्हतं, तो आपलं मनोगत कृतीनं व्यक्त करीत होता कीं काय कोणास ठाऊक !

" बाई, लेकरांचं मन कशाला मोडतां ? " दशरथ म्हणाला आणि त्याला कौसल्येनं साथ दिली. " आणीक आठ रोज तरी तुमास्नी राहायला हवं बाई. मी चुलीपुढं जायला लागेपावतर मी तुमास्नी सोडायची नाही. तुमच्या हातचं

आम्हूत मी इकते रोज जेवलें. माझ्या हातच्या अंबीलकण्या जेवल्याबिगर मी नाय तुमास्नी जाऊं द्यायची. ”

माझा निरुपाय झाला. भोळ्या भाबड्यांचं तें प्रेम झिडकारून जाण्याचा धट्टपणा माझ्या मनाला नव्हता. मी राहिलें. अगदी चांगली पंधरा दिवस राहिलें आणखी दशरथच्या झोपडींत.

तिथल्या त्या महिनाभरांत मला आजपर्यंत दिसलं नव्हतं असं एक निराळंच जग पाहायला मिळालं. खेड्यांतले कुणबी मी कितीतरी पाहिले होते; पण ते जगतात कसे हें मात्र मला माहीत नव्हतं. त्यांची गरिबी उघडच दिसत होती, आणि ते आपल्या अडाणीपणानं गरीब राहातात अशी सगळ्या पांढरपेशांप्रमाणं माझीहि समजूत होती. पण ते अडाणी राहतातच कां, हा प्रश्न माझ्या मनांत या वेळीं उत्पन्न झाला. त्यांना बुद्धिच नसते म्हणावं तर तेंहि पटेना. द्रौपदी आणि अर्जुन हीं मुलं शिकवलं तर शिकतात, एवढंच नव्हे तर न शिकवतांनाहि शिकतात, असं मला दिसलं. मी दशरथाच्या झोपडीच्या दारांत रोज सकाळीं सडा घालून रांगोळी घालायची पद्धत ठेवली. स्वस्तिक, गोपद्म, कमळ, कासव, गोपुर, अशीं साधींच चित्रं मी काढायची. द्रौपदी आणि अर्जुन मोठ्या आवडीनं बघत बसत रांगोळी काढतांना. दोन तीन दिवस झाल्यावर द्रौपदी म्हणाली “ बाई, मी काढतें आज रांगोळी. ” आणि खरोखरच तिनं दोन तीन चित्रं अगदीं बरोबर काढून दाखविलीं ! नुसतं बघून शिकली ती. रांगोळीप्रमाणंच शिवायलाहि शिकली ती माझ्यापाशी. मी सकाळीं संध्याकाळीं तोंडानं कांहीबाही गाणीं बडबडायची, तर चार आठ दिवसांत अर्जुनसुद्धा त्यांतले कांही कांही चरण म्हणून दाखवायला लागला. मुलांची ही हुशारी बघून मी कौसल्येला म्हटलं “ मुलांना शाळेंत घाल. तीं शिकूं देत. ”

कौसल्या हसली आणि म्हणाली “ कुटली साळ नी बीळ घेऊन बसलां बाई ! यास्नी शाळेला पाठवून म्हसरं कोण राखील आणि जळण कोण गोळा करील ? ”

कुणब्याच्या मुलांना त्यांच्याच कोंडाळ्यांत कसं गिरक्या खात राहावं लागतं हें दशरथानं आणि कौसल्येनं मला दाखविलं. त्यांचं म्हणणं खरंच होतं. मला तें पटलं पण तें बरोबर आहे असं मात्र मला वाटलं नाही. कुठं कांहीतरी चुक-

तंय आणि चांगल्या बुद्धीचं मातेरं होतंय अशी चुटपूट माझ्या मनाला लागून राहिली. आजतागायतहि ती दूर झालेली नाही.

माझं तिथं राहणं दशरथ कौसल्येला आनंददायक वाटत असलं तरी आजूबाजूच्या त्याच्या गांवकऱ्यांत तो एक टीकेचा विषय व्हायला लागला आहे हें मला दिसून आलं. माझ्या बोलण्यावरून आणि कपड्यांवरून मी बामणीण दिसत होतें आणि कुणब्याच्या घरांत 'सवळं ववळं' सोडून ही बामणीण कशी राहिली हें कोडं त्यांना उलगडत नव्हतं. एका शनिवारीं संध्याकाळीं मी मारुतीला गेलें होतें. परत यायला अंधार झाला. देवळाबाहेरच्या पिंपळाच्या पारावर तीनचार गांवकरी गप्पा छाटीत बसले होते, त्यांना मी दिसलें नाहीं. त्यांच्या गप्पा माझ्याबद्दलच चालल्या आहेत हें मला कळलं आणि त्या ऐकण्याची माझी उत्सुकताहि बळावली. मी अडोश्याला राहून ऐकूं लागलें.

" दशरथच्या घरीं आलेली ती डागदरीण बरी ऱ्हायलीया इकडे रोज ! कवशी तर आतां चांगली बरी झालिया म्हणं ! "

" अन् डागदारीण असून फीबी मागत नाही म्हणं ! "

" नवलच हाय खरं ! शिकल्याली डागदरीण आणि बामणीण बी दिसतीया. पण कुणब्याच्या घरांतला भाकरी तुकडा गुमान खातीया ! च्या, कापी, बिसकुट, पाव असलं काय म्हटल्या काय बी लागत नाय तिला. "

" असली उपकारी माणसं दुनियेंत थोडींच असतात. नायतर हायती की हितलीं बामणं ! हा केसूभट. कुळवाड्याच्या सावलीलाबी भितुया. आपण मात्र संध्याबी करायचा नायी. कुणब्याकडनं शिधा नी दक्षणा घ्यायला याची तयारी हाय, पण कुणब्याच्या अडचणीच्या वक्ताला नाय यायचा कधी पुढं. या बामणिणीचं वाइच शिका केसूभट. "

तोंडांतली तंबाकूची पिचकारी मारून केसूभट म्हणाला " तुमच्यासारख्या खुळचटांना चांगलं बनवती आहे ती बया. अरे लेकांनो, खरी ब्राह्मणाची बाई असला भ्रष्टाकार कधीच करायची नाही. हें बाटगं प्रकरण दिसतंय. किरिस्ताव असेल आणि इथल्या गरीब कुळंबटांना आपल्या कळपांत ओढायचा डाव असेल बयाचा. लेको, हे किरिस्ताव मोठे हिकमती असतात. वाटेल त्या खटपटी लटपटी करून ते अर्धवट लोकांना बाटवतात. मी रामगांवला जाऊन नीट तपास

करणारच आहे हिचा. माझा हिशेब चुकायचा नाही. जर का ही किरिस्ताव ठरली तर दशरथाच्या घराला वाळींत टाकायला पाहिजे. ”

केसूभटानं सोडलेल्या या सापाला ते मैतर भ्यालेले दिसले. कारण ते पुढं कांही बोलेनात. मीहि मनांत चरकलें. माझ्यामुळं दशरथच्या वाट्याला गावकऱ्यांचा छळ आला तर! ही भीति मला चैन पडूं देईना. भीतीबरोबर मला एक नवलहि वाटायला लागलं. माझ्यासारख्या ब्राह्मणाच्या बाईनं मराठमोळ्याच्या घरांतलं होऊन राहिल्यावर त्यांना आनंद वाटला पाहिजे खरं म्हटलं तर. ब्राह्मणलोक आपणांवर वरचष्मा गाजवतात याची मराठा समाजाला चीड येते. पण ब्राह्मण अगदीं त्यांच्यांतला होऊन राहायला आला, तर तेंहि त्यांना मानवत नाही हें कसं? हें कोडं मला उलगडेना.

त्या रात्रीं मला झोप किती वेळ तरी लागेना. माझी अस्वस्थता कौसल्येला उमगलीच. ती म्हणाली “ बाई, कांहीतरी होतंय तुमास्नी आज. ”

“ कांही होत नाही मला. दुपारीं झोपलें होतें ना मी थोडीशी; त्यानं नाही लागत झोप लौकर. ” असं कांहीतरी सांगून मी वेळ मारून नेली.

दशरथला गांवकऱ्यांकडून कसला उपद्रव होणार नाही याची खबरदारी मला निघून जाण्यापूर्वी घ्यायलाच पाहिजे होती. शेवटीं एक युक्ति मला सुचली आणि ती साधलीहि.

दुसरे दिवशीं सकाळीं मी ‘ मला सत्यनारायणाची पूजा करायची आहे तेव्हां पोथी घेऊन या ’ असा द्रौपदीबरोबर केसूभटाला निरोप पाठविला. दशरथाकडून गांवकऱ्यांनाहि बोलावणं केलं. सत्यनारायणावर माझी भक्ति होती म्हणून नव्हे, तर आपल्याविषयीच्या शंकाकुशंकांचं निरसन करायला सत्यनारायण हें चांगलं साधन आहे, हें ओळखून मी त्याला शरण गेलें होतें. आणि तेवढ्यापुरतां तो मला पावला.

पूजा पोथी झाल्यावर मी मंडळींना उद्देशून म्हटलं “ आमची कौसल्याताई जिवावरच्या दुखण्यांतून बरी झाली म्हणून मी पूजा केली. तुम्ही साऱ्या मंडळींनी येऊन प्रसाद घेतऽा, यावरून दशरथावरलं तुमचं प्रेम दिसून आलं. त्याच्यावर तुम्हा साऱ्यांचा असाच लोभ सतत राहूं दे. दशरथदादा हा गरीब माणूस आहे. तुम्हा गांवकऱ्यांच्या ममतेवर तो आहे त्यांत आनंदानं दिवस

काढतो आहे. कुठली कोण मी, पण या सत्यनारायणाच्या कृपेनं दशरथासारख्या भावाची आणि कौशल्याताईसारख्या वहिणीची भेट झाली. पण माझ्या या भेटीमुळं दादाच्या सुखाच्या संसारांत संकट येईल की काय अशी मला भीति वाटायला लागली आहे. इथली कांही विघ्नसंतोषी माणसं मी भलत्याच जातीची बाई असून या भोळ्या भाबड्या माणसांना बाटवायला आलें आहे असं बालंट घेतात आणि दशरथाला वाळींत टाकायचा त्यांचा बेत चालला आहे असं मला कळलं आहे."

"किडं पडत्याल असं म्हणणाऱ्यांच्या तोंडांत" कौसल्या मधेच उसळली.

"कोन असं म्हणतुया त्याला येऊं द्या म्होरं, मंजे पायताणानं टक्कुरच सडकतों त्येचं" दशरथहि खवळला.

"तुम्ही स्वस्थ रहा दशरथदादा." मी त्यांना आवरलं आणि म्हटलं "अनोळखी माणसांबद्दल असा गैरसमज नेहमीच होतो, माझ्याबद्दल तसा झाला तर नवल नाही. अशा गैरसमजामुळं मला त्रास होईल ही भीति मला नाही. कारण मी काय, दोन दिवसांची सोबतीण. पण माझ्यामुळं या देवमाणसांना त्रास होऊं नये म्हणून तुम्हां सर्वांना मला सांगायचं आहे, की मी कोणी बाटगी बाई कोणाला बाटवायला आलेली नाही. मी अगदीं तुमच्या जातीची, धर्माची आहे, तुमचा देव तोच माझा देव आहे. या सत्यनारायणाची मी पूजा करतें यावरून तुमची खात्री पटेल. तुमच्या मनांत कोणी कांही भरवलं असेल तर तें काढून टाका."

"का केसूभट! बोला की आता, काल सांच्यापारीं काय म्हणत होतां?" रामजी शेलार म्हणाले.

"काय म्हननार ह्यो बामन? शिध्या दक्शनेनं ह्याचं तोंड केंव्हाच बंद पडलंय." हरबा भोसल्यानं भटजीवर हल्ला चढविला.

"ह्यो बामन असाच कलागत्या हाय. कुणास्नी काय सांगल, आणि कुणाचं भांडण लावल याचा नेम नाही. गौरीचं आणि म्हादाचं वाकडं यानंच आणलं. पटकी बी येत नाय असल्या बंगाळ माणसास्नी." म्हातारी आवडाबाई तोंड वाजवायला लागली. तिला थोपवून मी म्हटलं, "काय करायच्या आहेत या मोड्डी उकरून काढून? झालं गेलं गंगेला मिळालं. कुणी कुणाचं वाकडं करायला गेलं तर देव त्याचंच वाकडं करील. म्हणून आपण आपल्याकडून कुणाचं

येईल तितकं शेजाऱ्याचं बरं करायला बघावं. लोकाच्या घरावर दगड मारले तर आपल्या घरावरहि पडतात. या हातानं द्यावं, या हातानं घ्यावं, असा जगांतला कायदाच आहे. म्हणून तुम्हीच काय, पण कुठल्याहि गांवच्या गांवकऱ्यांनी आपापसांत वाकुडपणा आणण्यापेक्षा असलेला वाकुडपणा काढून गोडवा आणण्याचा प्रयत्न करावा. तुम्ही सर्वजण असे गोडीगुलाबीनं राहाल तर तुम्ही सुखी व्हाल. तुमचं सुख तुमच्याच हातांत आहे. ”

केसूभटाचा चेहरा पडला पण बाकीच्या मंडळींच्या मुद्रेवर माझ्या बोलण्यामुळं समाधान उमटलेलं दिसलं. माझ्या मनांत जी धाकधूक निर्माण झाली होती, ती पार पळाली.

“ मी उद्यां परत जाणार ” असं दशरथाला सांगितलं. कारण आता कौसल्या घरांत वावरूं लागली होती आणि गेले दोन दिवस मला चुलीपुढं न जाऊं देतां तिनंच भाकरी कोरड्यास केलं होतं. मी आणखी राहावं, नव्हे नेहमीचं तिथं राहावं असं त्यांना वाटत होतं. पण तसं उघड कसं म्हणायचं? कशाला राहायचं असं मी म्हटलं तर त्यांना कांही कारण सांगतां येण्यासारखं नव्हतं. पण त्या घरांत निर्माण झालेलं माझ्याविषयींचं अगत्य मला दुपारीं वेगळ्याच प्रकारें दिसून आलं.

भाकरी खाऊन मी आणि कौसल्या बोलत बसलों होतों. आपल्या आणि मुलांच्या प्रकृतीबद्दल कशी काळजी घ्यावी, लहानसहान दुखण्याला कोणचीं घरगुतीं औषधं करावीं, हें मी माझ्या माहितीप्रमाणं कौसल्येला सांगत होतें. इतक्यांत “ अयाइ गऽऽ! ” अशी द्रौपदीची किंकाळी आमच्या कानांवर आली आणि आम्ही दोघीहि घाबरून अंगणांत धावलों.

द्रौपदी आणि अर्जुनाचं भांडण झालं होतं. द्रौपदी हात चोळत आणि रडत उभी होती; आणि अर्जुनहि अपराधी चेहऱ्यानं तिच्याकडं पहात होता.

“ काय झालं ग ? ” मी द्रौपदीला कुरवाळून विचारलं.

“ अर्ज्या माझ्या हाताला चावला. ” द्रौपदी अधिकच मुसमुसून रडूं लागली.

“ ह्यो भाड्या असाच छळतो बघा बाई तिला. थांब धरा, त्येचं दांतच टाकतें आता पाडून, म्हणजे चावायचा नाही पुन्हा ” असं म्हणून कौसल्या

अर्जुनाच्या अंगावर धावली. मी तिला आवरलं आणि म्हटलं " तूं घरांत जा बघूं. माझं मी पाहून घेतें काय झालं आहे तें. "

अर्जुनाला मी जवळ घेतलं, चुचकारलं, आणि म्हटलं " अर्जुन आपल्या बहिणीला असं चावतात, मारतात होय शहाणीं मुलं? तुला मी शहाणा म्हणतें तें उगीचच होय? "

अर्जुन तोंड झाकून घेऊन रडायला लागला.

" उगा. सांग बघूं काय झालं तें? " मी विचारलं.

" बाई, ही द्रुपदी मला नाय नाय तें बोलली. "

" अरे पण बोलली काय तें सांग की? "

" म्हणाली 'तुमी उद्यां जाणार' मी म्हटलं 'बाई कधीच जायच्या नाहीत.' तर ती म्हणाली 'तुमी जाणारच.' मग मी चावलों बाई तिला. "

अर्जुनाचा हा खुलासा ऐकून मला हंसूं आलं आणि माझ्याविषयी त्या लेकरांच्या मनांत निर्माण झालेली ओढ पाहून धन्यता वाटली.

दुपारीं नवरा बायकोचं बोलणं माझ्या कानांवर सहजगत्या पडलं, त्यामुळं मला आनंद वाटला, पण वाईटहि वाटलं. मी त्यांच्यावर मोठे उपकार केले आहेत असं त्यांना वाटत होतं आणि त्यासाठी मला कांहीतरी दिल्यावाचून जाऊं देणं त्यांच्या जीवावर आलं होतं. त्यांची आठवण म्हणून त्यांची देणगी घेण्यांत मला आनंद वाटला असता, पण ती देणगी देण्यासाठी त्यांनी जें दिव्य करायचं योजलं होतं, तें ऐकतांच माझ्या मनांत कालवाकालव झाली.

" बाईस्नी एक चांगलं लुगडं घेऊं. " कौसल्या सांगत होती.

" त्यास्नी कायबी दिलं तरी थोडंच हाय. पण या वक्ताला पैसा कुटला आणायचा? काय तरी जित्राप इकायचं म्हटलं तर सुगी अजून लै दूर हाय. मला मोठं कोडं पडलंया. दादा पाटलाकडं धा रुपये उसने मागितले तर त्यो सवड नाय म्हणाला.. " दशरथनं आपली अडचण सांगितली.

त्यावर कौसल्या म्हणाली " आपली ही नड जल्मालाच लागलीया; पर या वक्ताला करायाच होवं त्यें कराया नको का? आतां असं करा. अर्ज्याच्या पायांतले वाळे काढून ठेवल्यात ते नेऊन इका. त्याचे तीन चार रुपये येत्याल आणि शेळी बी इकून टाका. तिला सातआठ रुपये कोण बी हरखत दील. आणा त्येचं लुगडं."

"तसंच कराया होवं!"

मुलाच्या पायांतले वाळे एवढंच त्या झोपडींतलं जड जवाहीर. आणि शेळी ही त्यांची कामधेनु. अर्जुन द्रौपदीच्या कोरड्या भाकरीला ओलावा यायचा तो त्या शेळीच्या दुधानं. माझ्या देणगीपायी आपल्या या सर्वस्वावर पाणी सोडायला ती नवराबायको सिद्ध झालीं! केवढं थोर मन त्यांचं! आम्ही सुखवस्तु माणसं लोकांना परोपरीनं राबवून घेतों. तो आपला हक्कच आहे असं मानतों. लोकांनी आपल्यासाठी कांही केलं, तर त्याची परत फेड करायची, निदान त्या बद्दल कृतज्ञता व्यक्त करायची कर्तव्यबुद्धिहि आपणाला नसते. त्यांतूनहि कृतज्ञता दाखवायची झालीच तर ती अशा रीतीनं दाखवायची की तिच्या ज़ाहिरातीनं आपल्या उदारपणाची जगांत वाहवा व्हावी. मला मानकर सावकारांची आठवण झाली. पोहायला गेलेल्या त्यांच्या एकुलत्या एका मुलाला एका गरीब माणसानं बुडून मरतांना वांचवलं. त्या बिचाऱ्यानं आपला जीव धोक्यांत घालून मानकरांच्या मुलाचे प्राण वांचविले. त्याच्या या शौर्याबद्दल त्याला कुठल्याशा एका संस्थेनं त्या वर्षीचं शौर्याचं बक्षीस दिलं. पण स्वतः मानकरांनी त्याचं काय चीज केलं? घसघशीत दोन रुपये ठेवले त्याच्या हातावर त्याला बोलावून आणून! आणि आपली ही देणगी ते आल्यागेल्याला सांगत असतात! मी एकदां त्यांना म्हणालें, "सावकार, तुमच्या बाळासाहेबांची किंमत घागरीइतकीच का हो? विहिरींत पडलेली घागर काढून ध्यायला पाणबुड्या दोन रुपये घेतो. तुम्ही बुडलेल्या मुलाला वर काढणाऱ्याला त्याहून काय जास्त दिलंत?"

सावकार ओशाळले आणि निघून गेले चकार शब्द न बोलतां. मानकर सावकर होते. त्यांच्या घरीं संपत्ति उदंड होती पण त्यांचं मन मोहरीएवढं बारीक होतं. दशरथ कौसल्येच्या संसारांत दारिद्य अठराविश्वे होतं पण त्यांचीं मनं डोंगरासारखीं भव्य वाटलीं मला. मी कांही केलं असलं, तरी तें भल्या माणसांसाठीं केलं, त्याचं सार्थक झालं एवढंच नव्हे, तर तें करण्याची संधि देवानं मला दिली या विचारानं माझा आनंद दुणावला.

पण त्यांच्या देणगीचा स्वीकार करणंहि माझ्या मनाला रुचेना. घेत नाही म्हटलं तर त्यांचीं मनं दुखावतील हेंहि संकटच होतं. काय करावं हें कोडं

मला उलगडेना. सदरा मुंडासं घालून आणि मोटकुळीं बांधून दशरथ शेळी सोडायला निघाला. इतक्यांत एक कल्पना चटकन् माझ्या मनांत चमकली.

मी बाहेर गेल्यासारखं केलं आणि परत येऊन अधीरेपणानं म्हटलं "हें पाहिलंस कौसल्याबाई काय होऊन बसलं तें !"

"काय झालं बाई !" कौसल्या घाबरून बोलली.

"घाबरण्यासारखं कांही नाही ग. पण उद्यापर्यंत तुझा पाहुणचार घेत बसायला मात्र मिळत नाही. डॉक्टरांचा माणूस ही चिठी देऊन गेला. असशील तशी निघून ये असा निरोप आहे त्यांचा. निघालंच पाहिजे मला आताच्या आता."

"उद्यांपर्यंत रहा, एका दिवसानं काय होतंय," असं नवराबायकोंनी परोपरीनं विनविलं पण डॉक्टरांच्या बोलावण्यापुढं मी कांहीं असलं तरी रहाणार नाही असं सांगितलं आणि मी माझी चादर पातळ गोळाहि केली. कुणाचीतरी गाडी आणून मी पोंचवितों असं दशरथ म्हणाला. पण नदीपलीकडं त्यांचा माणूस गाडी आणणारच आहे अशी दुसरी थाप देऊन मी निघालें. जातांना कांहीतरी द्यायचं पण माझ्या लगबगींत कौसल्येला कांहीहि करतां आलं नाही. तरी-देखील शेंगा आणि गुळाचा खडा तिनं बांधून दिलाच.

द्रौपदीच्या पाठीवर हात फिरविला, अर्जुनाला उचलून घेऊन मीं त्याचा पापा घेतला. कौसल्या पदरानं डोळे टिपूं लागली. माझाहि घसा दाटून आला. डोळे डबडबले. कुसवापर्यंत तो परिवार मला पोंचवायला आला.

"आतां परत जा कौसल्याबाई, मुलांना संभाळा हं."

"बाई अवचित चाललासां. खंडीभर उपकार करून जातायसां. तुम्हासाठी आमास्नी काय बी करूं दिलं नायसां. जिवाला लै लागून -हायलंय बगा" कौसल्येला पुढं बोलवेना.

"मुलींच वाटून घेऊं नको कांही. तुला ही बाई गरीब वाटली तरी ती तशी नाही बरं का. मी पुनः येईन आणि तुमच्याकडून हवा तितका पाहुणचार घेईन करून. द्रौपदीच्या लग्नाला तरी येणारच मी आणि त्या वेळीं लग्नाचं लुगडं नेसल्याशिवाय परत म्हणून जायची नाही. तेव्हा बघशील या बाईचा रट्टा कसा आहे तो."

मी निघालें. आपल्याला नवं जग पहायला मिळालं, आयत्या पिठावरल्या रांगोळ्या काढत बसण्यापेक्षा स्वतःचं असं कांहीतरी करून दाखवितां आलं याचं समाधान मला वाटत होतं. कष्ट करण्यांत और आनंद असतो याचा नवा प्रत्यय मला आला होता. रंजल्यांगांजलेल्यांनी जग भरलं आहे. त्यांचे क्लेश कमी करणं हें केवळ पैशानंच साधतं असं नाही. पैसा नसला तरी कळकळ आणि सेवेची हौस असल्यावर लोकांच्या जीवनांत आनंद घालणं शक्य आहे हा प्रत्यक्ष अनुभव मला आला.

कांही वेळ या आनंददायक विचारांत रंगून मी वाट चालत होतें. पण पुढं मला आक्का बापूंची आठवण झाली. न सांगतां व सवरतां मी निघून आलें होतें. आतां परत गेल्यावर त्यांचीं काय काय बोलणीं ऐकून घ्यावीं लागतील याबद्दलचं विचारचक्र माझ्या डोक्यांत फिरूं लागलं. आणि मला एक बारिकशी भीतिहि वाटूं लागली. मी दशरथसारख्या हलक्या (?) जातीच्या माणसाच्या घरीं राहून आलें, याची खंत त्या नवराबायकोंना वाटेल का? त्यांना मी बाटगी तर वाटणार नाही? आणि वाटून त्यांनी कपाळाला आठी घातली तर? तसं व्हायचं नाही फार करून. आक्का बापू हीं एवढ्या तेवढ्या निमित्तानं माणूस तोडणारीं नाहीत. पण तीं थोर मनाचीं असलीं, तरी सगळं जग कुठं आहे तसं? आजुबाजूच्या विघ्नसंतोषी लोकांनी त्यांच्या मनांत संशय, भीति उत्पन्न केली तर त्यांचा खंबीरपणा टिकून राहीलच याचा काय नेम? माझं वागणं माणुसकीचं होतं पण लोकविरुद्ध होतं. केसूभटाच्या मनांत नाही का तें डाचलं? दुसऱ्याच्या मनांतहि तशी मळमळ न निर्माण होईल कशावरून? आणि अशा कुणाच्या कारवाईनं आक्का बापूंचीं मनं माझ्याविषयी विटलीं तर मला दुसऱ्या कुणाचा तरी आसरा शोधावा लागणार.

या विचारानं मी थोडीशी दचकलें. दुसरा आसरा पहायची भीति वाटायचं खरं म्हटलं तर कांहीच कारण नव्हतं. आक्का बापूंच्या घरीं मी ठाणं दिलं तें काय माझं इनाम होतं म्हणून? योगायोगानंच मला ही जागा मिळाली. योगायोगानंच तिला पारखं व्हावं लागलं तर लागेना का! आपण या जगाच्या प्रवासाला निघालों तेव्हा भिकारी होऊनच निघालों. मग भीति कशासाठी? एक घर सुनं तर दहा घरीं भिक्षा अशा आशेनं भिकारी भटकतो. आपणहि

तसंच भटकूं. लाभलं आहे त्याहून अधिक सुखाची जागा मिळवून द्यायचं देवाच्या मनांत असेल, त्याचा तरी काय नेम? अशी मनाची समजूत मी एकीकडं घालत असलें तरी तें मन स्वस्थ होईना. आक्का बापूंनी मला दूर लोटलं तर बाळ नी कुसुम हीं छबकडींहि मला दुरावणार या कल्पनेनं मी दचकलें. बाळ, कुसुम, द्रौपदी आणि अर्जुन या पोरट्यांनी मला इतकी ओढ कशी लावली याचं माझं मलाच नवल वाटत होतं. ज्या परिवारापासून मी आपण होऊन दूर झालें होतें, त्या परिवारांत काय मुलं नव्हतीं? भाच्या पुतण्यांचा गजबजाट होता तिथं आणि त्यांतहि खेळकर गोजिरवाणीं मुलं होतीं. पण या चौकडीसारखीं तीं आपल्या काकूला, मामीला बिलगत नव्हतीं हें मात्र खरं. आईनं धोपटलं तर आणि खाऊची आशा दिसली तर तीं माझ्याकडं धाव घेत. पण माझ्या नव्या जगांतलीं हीं लेकरं भीति लोभापेक्षा मनाच्या हौसेनं मला बिलगत. आणि त्यांच्या याच लडिवाळपणाचा मला हव्यास वाटत होता. स्त्रीच्या अंतर्यामीं आई ठाण मांडून बसलेली असते, स्वतःच्या अपत्यांवर प्रेमाचा वर्षाव करायची संधि तिला लाभली नाही तरी दुसऱ्या कोणा लेकरांवर मायाममता करून ती आपल्या मनाची भूक भागविते असं रावजींनी दिलेल्या एका पुस्तकांत वाचलेलं मला आठवलं. त्या वेळीं मला तें नीटसं समजलं नव्हतं. त्यांतलं मर्म आतां उमगलं.

बाळ, कुसुमपासून दूर व्हावं लागलं तर? या कल्पनेला मी भ्यालें! नुसती भ्यालेंच नाही, तर माझे डोळे भरून आले या कल्पनेसरशी!

अशा कडूगोड विचारांच्या सोबतीनं प्रहरदीडप्रहर वाटचाल करून मी दिवेलागणीच्या सुमारास दिवेवाडींत येऊन पोंचलें. आक्कांच्या आधी डॉक्टरांना भेटावं, कौसल्येच्या प्रकृतीचा साद्यंत वृत्तान्त त्यांच्या कानांवर घालावा, म्हणून मी प्रथम त्यांच्या दवाखान्यांत गेलें. ते तिथं नव्हते. रोग्याला पाहायला गेलेत असं गड्यानं सांगितलं म्हणून मी बसलें. डॉक्टरांच्या टेबलावर ताजा ज्ञानप्रकाश होता तो मी घेतला, आणि पहिल्याच पानांवरली ठळक अक्षरांतली ओळ वाचतांक्षणीं माझ्या मनांत धस्स झालं!

'बिश्रामपूरचा रेल्वे अपघात! कित्येक उतारू ठार! असंख्य जखमी!! शुश्रूषापथकें रवाना. सहाय्यकांची जरूरी.' अशा मथळ्यांखालीं अपघाताची

हृदय पिळवटून काढणारी हकीकत दिली होती. ती वाचतांच माझ्या मनांत आलं " या आपद्ग्रस्तांना आपल्या हातून कांही साहाय्य होईल का ? "

ज्ञानप्रकाशमधील त्या हृदयद्रावक बातमीनं माझ्या मनांत चमकून गेलेली कल्पना म्हणजे अपघातांत सापडलेल्या हतभागी माणसांच्या सेवेला आपण धावून कां जाऊं नये? या प्रश्नाला नकार देण्यासारखी कोणतीच अडचण माझ्यापुढं नव्हती. मी ठरवून टाकलं कीं जायचं, ताबडतोब निघायचं.

डॉक्टर आल्यावर त्यांना हा माझा बेत सांगायचा, वाटखर्चासाठी त्यांच्याकडून पैसे मागून घ्यायचे आणि निघायचं असं मी ठरविलं. वाट पहात बसलें असतांना ज्ञानप्रकाशमधील अवांतर मजकुरावर माझी दृष्टि फिरूं लागली. आणि त्यांतल्या त्या विनंतीनं पुनः एकदां मला दचकायला झालं. ती विनंती अशी होती—

## विनंति

सौ. रुक्मिणीस—चार महिने वाट पाहिली. तूं आपल्या डोक्यांतलें वेड काढून टाकून घरीं येशील ही आशा सफल झाली नाही. मनांतला हीनगंड काढून टाकून तूं परत आलीस तर मला आणि घरच्या सर्वांना आनंद वाटेल. जगांत सर्वांग परिपूर्ण व्यक्ति कोणीच नाही आणि प्रत्येक व्यक्ति सर्व दोषपरिपूर्ण असते असेंहि नाही. निसर्गानें लादलेलें वैगुण्य हें वैगुण्यच मानतां कामा नये. मी कधी तसें मानलें नाही. मानणार नाही. तुझ्या सहवासांत मी पूर्ण सुखी होईन असा माझा विश्वास आहे. दुसरें कशासाठी नसलें तरी मला सुखी करण्यासाठी तरी तूं सत्वर परत ये. तुझी उत्कंठेने मार्गप्रतीक्षा करीत आहे—रावजी.

सौ. रुक्मिणीस केलेली ही विनंति! विनंति कसली, आज्ञा मला मोठी निकराची वाटली. कारण रुक्मिणी म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून मी स्वतःच होतें. ही कळकळीची आग्रहाची हाक कशाला माझ्या दृष्टीला पडली, असं मला वाटायला लागलं. रावजी सुखी व्हावे म्हणून जें मी करायला गेलें, तेंच त्यांच्या-

दुःखाला कारण होऊन बसलं यानं माझं मन उद्विग्न झालं. माझ्या सहवासांतच रावजी सुखी होतील हें त्यांचं म्हणणं मला अजूनहि खरं वाटेना. माझ्या ठिकाणच्या वैगुण्यामुळं माझ्या मनांत हीनगंड निर्माण झाला असेलहि. पण अत्यंत सालसपणामुळं रावजींच्या मनांतहि हें वेडच नाही का निर्माण झालं, असं मला वाटलं. पण त्यांचं हें वेड असो की दुसरं कांहीं असो, त्यांनी मला हाक मारली होती, त्या हाकेंत त्यांच्या हृदयाला पडणारा पीळहि उमटला होता. त्या त्यांच्या हाकेकडं दुर्लक्ष करायचं, रावजींच्या पदरांत निराशा बांधायची ? छे असं कसं करूं मी ? रावजींसारख्या गोड माणसाच्या जिण्यांत कडवटपणा भरूं ?

मग काय परत जाऊं त्यांच्याकडं ? परत जायचं होतं तर मुळांत आलीसच कां त्यांना टाकून, असं माझं मन दटावून विचारूं लागलं. मी चुकलें असं मला वाटेना आणि रावजींच्या हाकेला ओ न देणं रास्त आहे असंहि मला निश्चित म्हणवेना.

अशा अधांत्री अवस्थेंत मी तरंगत असतांना डॉक्टर आले. मला पाहतांच ते आनंदानं उद्‌गारले " देवानं धाडलं तुम्हांला गुजाताई. मी तुम्हांला निरोपच पाठविणार होतों आज. पण माणूस मिळाला नाही म्हणून थांबलों. एक मोठं कार्य वाट पहातंय तुमची. "

" कसलं काम निघालं आणीक ? " मी विचारलं.

टेबलावरचा ज्ञानप्रकाशचा अंक माझ्यापुढं करून डॉक्टर अपघाताच्या वृत्तान्तावर बोट ठेवून म्हणाले " हें वाचा. "

" मी वाचली आहे ती हकीकत. "

"मग ती वाचून तुम्हांला कांही वाटलं नाही ? खरं म्हटलं तर तुम्हां आम्हांला ती हाक आहे गुजाताई. माझ्या अंगांत तुमच्यासारखा तारुण्याचा दम असता, तर मी क्षणभरहि थांबलों नसतों. माझं घर, माझा धंदा यांचा मी मुळीसुद्धा विचार केला नसता. या गोष्टी सर्वांच्याच पाठीला लागल्या आहेत, पण त्यांतच गुरफटून राहिल्यावर जगाला काय उपयोग आपला ? आपण जगासाठी जगावं. गुजाताई, मी म्हातारा दुर्बळ झालों याची मला खरी खंत कधी वाटत असेल तर ती अशा प्रसंगीं. तुम्ही उमेदवार आहां. तुमच्यामागं दुसरा कसला व्याप नाही. जा धावून तुम्ही या हतभागी जीवांच्या साहाय्याला. जातां ? "

" हो आनंदानं " डॉक्टरांची तळमळ पाहतांच माझ्या कर्तव्यापासून मला बाजूस नेऊं पाहणारे विचार पार पळाले. मी एकदम रुकार देऊन टाकला.

" माझी खात्रीच होती तुम्ही नाही म्हणणार नाही याबद्दल " डॉक्टरांची चर्या आनंदानं खुलली.

विश्रामपूर आहे कुठं, तिथं जायचं कसं याची मला कांही म्हटल्या कांही माहिती नव्हती. डॉक्टरांनी मला तें सारं समजावून दिलं आणि पंचवीस रुपये माझ्यापुढं ठेवून म्हणाले " उठा, गाठोडं बांधलेलंच आहे. तडक अड्ड्यावर जा, म्हणेल तें भाडं देऊन टांगा करा आणि स्टेशन गाठा. लगबग केली तर पावणेनवाची गाडी सापडेल. वाटेल तें करून ती गाडी पकडा; नाहीतर सकाळपर्यंत थांबावं लागेल. आणि पुढल्या गाड्या रात्रीपर्यंत मिळायच्या नाहीत. म्हणजे उद्यांचा सारा दिवस वाया गेला. एकेक क्षण लाख मोलाचा आहे."

" निघतेंच मी आक्का बापूंना सांगून. अजून भेटलें नाही मी त्यांना. "

" मग जाऊन आल्यावर एकदम भेटा. मी उद्यां कळवीन त्यांना तुम्ही घाईघाईनं कुठं नी कां गेलां तें. "

डॉक्टरांच्या आज्ञेप्रमाणं मी निघालें आणि मला गाडीहि मिळाली. पुढचा सगळा प्रवासहि सुरळीतपणें पार पडला. मी विश्रामपूरच्या स्टेशनमास्तरला भेटलें. घायाळांच्या शुश्रुषेसाठी मी स्वयंसेविका म्हणून आलें आहे हें ऐकून त्यांनी माझं कौतुक केलं. आणि त्या छोट्या गांवीं तात्पुरत्या उघडलेल्या दवाखान्याकडं एका पोर्टरच्या सोबत माझी रवानगी केली.

थोडे नव्हे थोडके नव्हे, दीड दोनशे तरी जखमी लोक तिथं पडले होते. रेलवेचे, सरकारी आणि स्वयंसेवक म्हणून आलेले डॉक्टर त्यांचे जीव वाचविण्यासाठी झटत होते. कुणाचा पाय तुटलेला, तर कुणाचा हातच जागयावर नाहीं. कित्येकांच्या डोक्यावरील पट्ट्यांतून त्यांचं काय गमावलं आहे हेंच कळत नव्हतं. त्या दुर्दैवी मंडळींत पुरुष होते, स्त्रिया होत्या. पाऊणशेची हद्द ओलांडून गेलेले म्हातारे होते तर विशीच्या आंतल्या तरुण तरुणी होत्या. मुलं होतीं. तो देखावा पाहतांच मला भडभडून आलं.

माझ्याच काय, पण कोणाच्याहि मनाला पीळ पडणारा दुसराहि एक देखावा पलीकडच्या दालनांत दिसत होता. जखमी आणि मृत माणसांची अजाण लेकरं

तिथं ठेवलेलीं होतीं. आपण कुणाचा कोण हें सांगतांहि येत नव्हतं, इतकीं तीं लहान होतीं. " आई ग ऽऽ " म्हणून तीं टाहो फोडीत होतीं आणि त्यांना बाबा पुता करून उगी करतांना दोघातिघा स्वयंसेवक सेविकांच्या नाकीं नव येत होते !

डॉक्टर मंडळी भरपूर होती; पण परिचारकांचा मात्र तुटवडा होता. पांच-सात स्वयंसेवक आणि तीन चार स्वयंसेविका त्या पसाऱ्याच्या मानानं अगदींच अपुऱ्या होत्या. आजारी माणसांची शुश्रूषा करण्याची माहिती असलेल्या दाया तर अवघ्या दोघीच होत्या. धन्य त्यांची ! अष्टौप्रहर काम करण्यांत त्या कसूर करत नव्हत्या. घटकाभर बसल्या बसल्याच घेतां आली तर डुलकी घ्यायची व उभ्याउभ्याच चहापाव नाहीतर पुरीभाजी खाऊन भूक भागवायची. नर्स गजराबाई आणि डिसूझाबाईंची ती कर्तव्यतत्परता पाहून मी चकित झालें. त्यांच्याबद्दल मनांत अतीशय आदर निर्माण झाला.

" बाई, तुम्ही आलां फार चांगलं झालं. कोणतं काम कराल तुम्ही ? " गजराबाईंनीं मला विचारलं.

" असल्या कामांतली मला कांही म्हटल्या कांही माहिती नाही. पण तुम्ही सांगाल त्याप्रमाणं सांगाल तें काम मी करीन. अगदी हलक्यांतलं हलकंहि काम मला सांगायला तुम्ही संकोच करूं नका. "

माझ्या उत्तरानं गजराबाईंना समाधान वाटलं.

मी काम करूं लागलें. गजराबाई, डिसूझाबाई हाक मारतील तेव्हा मी तयार असायची व त्या सांगतील त्याबरहुकूम काम उरकायची. त्यामुळं त्या दोघींचीहि मी आवडती झालें. त्या अपघातामुळं अगणित माणसांच्या जन्माची हानि झाली असली तरी त्यांची सेवाशुश्रूषा करायची संधि मला मिळाली, सेवेंतला अनुपम आनंद मला अनुभवायला मिळाला, हें माझं भाग्य असं मला वाटल्यावाचून राहिलं नाही.

त्या सेवेंत मला दुसराहि एक फायदा झाला. रावजींच्या शिकवणीमुळं जातपातीच्या आणि सोवळ्या ओवळ्याच्या कल्पना माझ्या मनांत फारशा उरल्या नव्हत्या, आता तर त्या पुरतेपणी दूर झाल्या. त्या घायाळांच्या समुदायांत कोण कोणत्या जातीचा आहे हें कोणी पाहात नव्हतं. त्यांत सोवळे ब्राम्हण

होते, विस्तव धुवून घेणाऱ्या सोवळ्या बायका होत्या, शेठजी होते, भिकारी होते, मुसलमान होते, किरिस्तॉंव होते, महार होते. पण सगळ्यांचे बिछाने एका ओळींत होते, एका हातानं औषध पीत होते, एकाच चुलीवरलं अन्न त्यांच्या तोंडांत पडत होतं. माणूस हा इथून तिथून एक, याची खरीखुरी शिकवण तिथं मिळत होती. आमच्या देशाचं जातीजातीच्या, लहानमोठेपणाच्या वेडगळ समजुतीनं वाटोळं झालं, असं मोठीं माणसं म्हणतात आणि आपण सर्वजण समान आहों हें तत्व सर्वांना पटलं पाहिजे असं पढवतात. पण त्यांची ही शिकवण पालथ्या घड्यावर पाणी अशी वाया जाते. मला आतां असं वाटूं लागलं कीं आमच्यापैकीं प्रत्येकावर असल्या अपघातांत सांपडून सार्वजनिक इस्पितळांत पडून राहायची पाळी यावी. तिथं त्यांच्या डोक्यांतलं जातीपातीचं आणि शिवाशिवीचं वेड उतरेल.

संकटांत सांपडलेल्या त्या हतभागी जीवांच्या सहवासांत माणसाच्या जीवनांत योगायोगाचा विचित्रपणा किती प्रचंड असतो हें पाहायला मिळालं. माणूस आपल्या हातानं मरण कसं ओढवून घेतो, त्याचीं मनोराज्यं एका क्षणांत कशीं कोसळून पडतात याचं प्रत्यंतर आलं मला. डोळ्यावर पट्टी बांधलेला एक तरुण त्याचं तोंड धुवत असतांना मला म्हणाला "माझ्या लीलाचं कसं आहे हो ?" "छान आहे ना. तुम्ही मुळीच काळजी करूं नका त्यांची" मी उत्तर दिलं. डॉक्टरनी आणि नर्सबाईनी तिथल्या सर्वांना बजावून ठेवलं होतं की कोणत्याहि आजारी माणसाच्या मनाला धक्का बसेल असं कांहीहि सांगायचं नाही. उलट त्याला उत्साह वाटेल अशींच उत्तरं त्याच्या प्रश्नाला द्यायचीं. तो कोण आणि त्याची लीला कोण याची मला कांही म्हटल्या कांही माहिती नव्हती, पण मी खुशाल सांगून मोकळी झालें की "तुमची लीला अगदी छान आहे" म्हणून ! त्याच्या मुद्रेवर समाधान उमटलेलं मला दिसलं, तेव्हा डॉक्टरांच्या सांगण्याचा उद्देश मला पटला.

पण मला सांगायचं आहे तें योगायोगाच्या विचित्रपणाचं. त्या तरुणाचं नांव कांतीलाल असं होतं. तो आपल्या सासुरवाडीला गेला होता आणि आपल्या बायकोला घेऊन परत आपल्या घरीं निघाला होता. तो सरळ घरीं गेला असता तर या अपघातांत सांपडला नसता. पण जातां जातां देवदुर्गेच्या

स्वयंभू एकलिंगाचं दर्शन घेऊन जाण्याची त्याला इच्छा झाली आणि तेव-ढ्यासाठी वाकडी वाट करून तो या गाडींत बसला. एकलिंगजी त्याला असा पावला. आवडती बायको आणि एक डोळा गमवून बसला बिचारा!

हृदय पिळवटून सोडणारा दुसरा दुःखदायक योगायोग म्हणजे गौरीचा. नशीब, हो नशीबच म्हणायचं! तिला कसलीहि शारीरिक दुखापत झाली नव्हती. ती दिसायला अगदी धडधाकट दिसत होती. पण तिच्या मेंदूला जबरदस्त धक्का बसला होता. ती रडत नव्हती, हसत नव्हती, तोंडच उघडत नव्हती मुळीं! भकास नजरेनं कुठंतरी टक लावून पहात असायची! खाण्यापिण्याचीहि उमका नव्हती तिला. तोंडाला दुधाचा पेला किंवा भाताचा घास लावला तर तो घ्यायची. तोंड धुणं, अंग धुणं, साडी बदलणं या गोष्टी आम्ही तिच्याकडून करून घेत होतों. ती स्वतः बसल्या जागेवरून उठायचीहि नाही! तीन चार दिवस हें असं चाललं होतं. अपघाताच्या वेळेपासून तिचा क्षणभरहि डोळा लागला नव्हता त्या चार दिवसांत. एके दिवशीं ती आडवी झाली आणि तिला घटकाभर का होईना पण झोप लागली, तेव्हा डॉक्टर म्हणाले, " आत कांहीतरी आशा आहे ! '

आणि डॉक्टरांचा हा अंदाज खरा ठरला. हळुहळु तिची स्मरणशक्ति जागृत व्हायला लागली. तिनं मला विचारलं " विद्याधर अजून नाही का हो उठला ? "

" उठले आहेत ना . पण बाहेर गेले आहेत. लवकर येतों असं सांगितलंय त्यांनी जातांना. " कांहीतरी उत्साहवर्धक बोलायचं म्हणून मी बोललें. हा विद्याधर हिचा कोण हें मला आणि कुणालाच माहीत नव्हतं.

हळुहळु एकेक गोष्ट त्या बोलण्यांतून बाहेर निघूं लागली, आणि ती किती भयंकर आपत्तींत सांपडलेली आहे, हें कळून सर्वांचींच मनं विव्हळ होऊं लागलीं. आपणावर केवढा दुर्धर प्रसंग ओढवला आहे, याची उमका तिला जसजशी होऊं लागली तसतसा तिचा दुःखावेग अनावर होऊं लागला. तिचं सांत्वन करणं, तिला धीर देत राहाणं एवढंच आमच्या हातीं होतं, आणि तें आम्ही यथाशक्ति करीत होतों.

त्या हतभागी मुलीचं नांव गौरी. नांवाप्रमाणं गोरीपान आणि लाखांत उठून दिसेल असं रूप! ती बी. ए. पर्यंत शिकली होती. आणि घरचा कसला म्हणजे कसला आधार नसतांना अनाथ बालकाश्रमाच्या मदतीनं आणि स्कॉलरशिपांच्या आधारावर तिनं एवढी विद्या संपादन केली होती! निर्धन भिक्षुकाची ही मुलगी आणि तिचा हाहि आधार प्लेगनं तोडला होता. पण रूपाचा आणि शिक्षणाचा लाभ शेवटीं तिला मिळाला. विद्याधरासारख्या विद्वान्, संपन्न, हुद्देदार आणि हौशी नवऱ्याची ती बायको झाली.

दिल्लीला सेक्रेटरीएटमधे त्याला हुद्द्याची नोकरी होती. आणि आपल्या नव्या नवरीला घेऊन घर थाटण्यासाठी विद्याधर निघाला होता. पण घरीं पोंचण्यापूर्वीं हें असं होऊन बसलं. एकेक माणसं नष्टचर्य गळ्यांत बांधून घेऊन जन्माला येतात की काय कुणास ठाऊक? नाहीतर गौरीचं सौभाग्य असं औट घटकेचं कां ठरलं असतं?

गौरी माझ्या गळ्याला मिठी मारून रडायची आणि मला विचारायची "बाई, इथं इतकीं औषधं आहेत, त्यांत विष आहे का हो? द्या मला विषाचा डोस आणि पाठवा ही धिंडका जगाबाहेर. मी फुटक्या नशिबाची जन्माला आलेय ती आलेंय, पण माझ्या फुटक्या नशिबाची झळ विद्याधराला की हो लागली! काय पाप केलं होतं त्यानं माझ्याबरोबर लग्न करण्यापेक्षा?"

कसं करायचं गौरीचं सांत्वन? तिची ही करुण कहाणी ऐकून मला रडूं यायचं पण रडायचीसुद्धा सोय नव्हती. तिला धीर द्यायलाच पाहिजे होता. सहानुभूतीचे आणि समजुतीचे शब्द अशा वेळीं फारसे उपयोगी पडत नाहीत हें माहीत असूनसुद्धा मी म्हणालें "नशीब एकाद्याच्यामागं हात धुवून लागलं म्हणजे त्याच्यापुढ कुणाचं काय चालणार? पण धीर सोडूं नये माणसानं. नशिबावर मात करायची हिंमत धरली पाहिजे आपण. तुम्ही शिकलेल्या आहां. तुम्ही पुष्कळ मोठमोठ्या विद्वानांची पुस्तकं वाचलीं असतील. माझ्यासारख्या अडाणी बाईनं कशाला हवं तुम्हांला सांगायला? वणव्यांत सापडलेलं पाखरूंहि वाचतं. त्याला नवं रान सांपडतं. नवं घरटं मिळतं— आशा सोडतां कामा नये."

वणव्यांतल्या पांखराचं उदाहरण मला कसं सुचलं कुणास ठाऊक? खरं म्हटलं तर मी तोंडाला आलं तें बोलून गेलें होतें. पण त्या पाखराचं आणि त्याच्या नव्या घरट्याचं उदाहरण दिल्यावर माझ्या मनांत एकदम एक कल्पना चमकली. "रावजींचं घर, गौरीसाठीं नवं घरटं—होय किती बहार होईल तसं झालं तर!"

गौरीची काळजी तिची तिनंच घेणं अवश्य होतं. कारण तिला माहेरीं जसं कुणी नव्हतं तसं सासरींहि नव्हतं. विद्याधरहि मूळचा निराधार होता आणि स्वावलंबनानं विद्या संपादन करून त्यानं आपला जम बसवीत आणला होता. आपल्यासारखी हाल अपेष्टांत वाढलेली जोडीदारीण मिळविण्याची त्याची इच्छा गौरीच्या रूपानं पुरी झाली होती आणि तिच्यासह पुढचं भाग्यशाली जीवन उपभोगण्याची उत्कट इच्छा त्यानं मनांत बाळगली होती. पण दुर्दैवानं त्याच्या या इच्छेचाच नव्हे तर त्याचाहि चक्काचूर करून टाकला होता.

लग्नाच्या वेळीं अंगावर घातलेले हजार भराचे दागिने आणि विद्याधराची तेवढीच बँकेतील शिल्लक आतां गौरीला उरली होती. त्यावर तिनं जन्म काढायचा होता.

माझ्याशी आतां गौरीचं बरंच सूत जमलं होतं. मी तिला झालं गेलं विसरण्याबद्दल व नवा डाव मांडण्याबद्दल कधी उघड तर कधी आड पडद्यानं सूचना देत होतें. " रावजींकडं जा " असं तिला सांगावं असं मला वाटायचं पण एकदम एवढी उडी मारली आणि ती बरोबर न पडतां तोंडफोड झाली, तर गौरीची तीव्र निराशा होईल आणि कायमचंच वैराग्य तिच्या मनांत ठाण मांडून बसेल अशी मला भीति वाटली. शिवाय मी होऊन तिला रावजींकडं पाठविली, तर त्यांना माझा सुगावा लागेल आणि त्यांचं माझं नातं उमगल्यावर गौरीहि माघार घेईल या कल्पनेनं मी भ्यालें. म्हणून गौरीनं प्रथम ज्या अनाथ बालकाश्रमाच्या छायेंत ती आतापर्यंत राहिली, तिथंच पुनः जावं आणि कांहीतरी नव्या व्यवसायांत गुरफटून घेऊन आपल्यावर ओढवलेल्या आपत्तीचा विसर पाडावा असं मी तिला सुचवलं. तिलातरी दुसरं काय करण्यासारखं होतं? गौरी माझ्या सांगण्याप्रमाणं आश्रमांत जायला तयार झाली. स्टेशनमास्तरनीं सोबत देऊन तिची तिकडं रवानगी केली.

ज्या ज्या आपद्ग्रस्तांच्या नातलगांना तारा गेल्या ते तिसऱ्या चवथ्या दिवसांपासून येऊं लागले होते व हलण्यासारखी स्थिति झाल्यावर आपापल्या माणसाला घरीं घेऊन जात होते. पंधरा तीनवारांत बहुतेक घायाळांची निरवानिरव झाली. पांच सहा जणांचा कोणीच नातलग किंवा इष्टमित्र आला नाही कारण त्यांना त्यांचं नांव गांव सांगण्याचंहि ज्ञान राहिलेलं नव्हतं. त्यांचे मेंदू धक्क्यामुळं निकामी होऊन गेले होते. सरकारनं त्यांचा ताबा घेतला. मुंबईच्या कीं कुठल्याशा अपंगाश्रमांत त्यांची रवानगी केली.

राहातां राहातां चार अजाण लेकरं मात्र राहिलीं. त्यांची व्यवस्था कोणीं आणि कुठं करायची याची वाटाघाट इस्पितळांत सुरू होती. मॅजिस्ट्रेट, पोलीस येऊन चौकशा करीत होते. त्यांनी त्या पांचांतल्या तिघांच्या नातलगांना शोधून काढलं आणि मुलं त्यांनी नेलींहि. एक पांच सहा वर्षांची मुलगी आणि एक दोनअडीच वर्षांचा मुलगा राहिला. त्यांच्या आईबापांचा किंवा नातलगांचा कांहीच पत्ता लागेना. डिसूझा बाईच्या ओळखीची मिशनरी मंडळी त्यांना घ्यायला तयार होती, पण मुलं हिंदू आहेत हें त्यांच्या अंगावरील गोंदण्या टोचण्यावरून स्पष्ट दिसत होतं. आणि त्यांना ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या स्वाधीन करण्यापेक्षा त्यांना हिंदू पालक मिळालेले बरे असं अधिकाऱ्यांना आणि तिथं येणाजाणाऱ्या इतर मंडळींनाहि वाटत होतं. पण स्वतः त्यांचा स्वीकार करायला मात्र कोणीच पुढं येईना. त्या दोनहि मुलांच्या चर्येवर दृष्टि गेल्यापासून कां तें काय की, माझं मन त्यांच्याकडं ओढ घ्यायला लागलं होतं, आणि त्यांच्या व्यवस्थेबद्दल असा घोळ माजलेला पाहतांच " मी घेतें त्यांना संभाळायला, " असं सांगायचं माझ्या अगदीं ओठावर येत होतं. पण प्रत्येक वेळीं माझं मन मला दर्डावयाचं की " कशाच्या जोरावर तूं ही जोखीम पत्करणार ? तूं स्वतःच वावटळींतल्या पाचोळ्यासारखी अधांत्री तरंगते आहेस. दुसरे जीव कशाला आणखी बांधून घेते आहेस गळ्यांत? झालं सगळं ठीक तर बरं. नाही झालं तर आपल्याबरोबर दुसऱ्या दोन जीवांची नासाडी केल्याचं पाप मात्र पदरांत बांधून घेशील. "

पण जेव्हां मिशनऱ्यावांचून दुसरा कोणताच आसरा उरला नाही असं दिसूं लागलं तेव्हा मात्र मला राहवेना. मी मनांत म्हटलं हे मिशनरी तरी कशाच्या जोरावर ही जबाबदारी पत्करतात ? लोकांच्या औदार्यावर आणि आपल्या परि-

श्रमाच्या विश्वासावरच नाही का ? परिश्रम करायची हौस आणि हिंमत आपल्यापाशी आहे. आणि मला काय कोणी उदार सज्जन भेटायचेच नाहीत ? जोखीम येईपर्यंत अवघड वाटते. ती येऊन थडकली की तिची आवराआवर करावयाचे मार्गहि सांपडतात. ते कांही नाही. आपण या लेकरांची आई व्हायचं. आपल्या हातगुणानं त्यांच कल्याण व्हावं असा नेमानेम नसेल म्हणून तरी कशावरून ? मनानं असा कौल दिल्यावर मी इस्पितळाच्या, पोलिसांतल्या आणि रेल्वेच्या अधिकाऱ्यांना भेटलें. त्यांना माझी निर्धन परिस्थिति सांगितली. तरीपण ज्या स्वावलंबनावर मी दिवस काढतें त्याच स्वावलंबनावर या मुलांचाहि सांभाळ करायला मी तयार आहे असं सांगितलं. माझ्या शब्दांतल्या तळमळीचा त्यांच्यावर परिणाम झाला, माझ्या हिमतीबद्दल त्यांना विश्वास वाटला का कोणीकडून तरी आपल्या गळ्यांतील ब्याद दूर जाते तर जाईना का, अशी अंग झाडायची त्यांची वृत्ति बनली हें त्यांचं त्यांना ठाऊक पण त्यांनी माझं कौतुक केलं आणि मुलं माझ्या हवालीं केलीं. एवढंच नव्हे तर वर्गणी करून शंभर दीडशे रुपयेहि त्यांच्या तुरुतच्या खर्चासाठी जमवून दिले. एका गुजराथी शेठजींनी तर दरमहा दहा रुपये देण्याचं आश्वासन दिलं मिशनऱ्यांना मिळतात तसे उदार सज्जन आपणालाहि मिळतील, आपण त्यांच्यासारखं काम करायला मात्र पुढं सरसावलं पाहिजे, असं मला वाटत होतं तें खरं ठरलं. मी धीरानं मुलांना घेऊन मागं परतलें.

आक्का–कौसल्येच्या लेकरांनी माझ्या अंतर्यामींची आई जागृत केली होती. त्या आईला हीं दोन लेकरं लाभलीं आणि प्रसन्न मनानं ती आई गाडींत चढली. ही नवी दौलत घेऊन नव्यानंच निर्माण केलेल्या जगांत सौ. गुजाताई निघाल्या !

डॉ. देवांनीं माझं अतिशय आनंदानं स्वागत केलं. संकटकालीं जखमी माणसांच्या सेवेला मी धावून गेलें, याबद्दल त्यांना माझं कौतुक वाटत होतंच त्यांत मी दोन निराधार बालकांच्या संगोपनाची जबाबदारी पतकरली यानं भर पडली. कुवत नसतांना मी या भलत्या फंदांत कशाला पडलें, असं ते म्हणतील की काय, अशी मला धाकधुक वाटत होती पण तसं म्हणण्याऐवजी डॉक्टर म्हणाले—

" सुखं आणि दुःखं माणसाच्या अवतीभंवती फिरत असतात. त्यांपैकी उच-लायचं काय हें ज्याच्या त्याच्या दैवाप्रमाणं सुचतं. तुम्हांला सुख उचलायची बुद्धि झाली, यावरून ईश्वरी नेमानेम कांहीतरी मोठा असावा, असं वाटतं. गुजाताई, तुमच्या वाट्याला अपत्यसुख यायचंच होतं तें या लेकरांच्या रूपानं तुम्हांला मिळालं. हें सुख वाढून आलं असतांना तुम्ही तोंड फिरविलं असतं तर तुम्ही बळेबळे दुःख पदरांत बांधून घेतल्यासारखं झालं असतं. आणि या लेक-रांचं झालं तरी काय, त्यांच्यावर पोरकेपणाचं दुःख ओढवलं पण त्यामुळंच तुमच्या रूपानं मातृसुख त्यांच्यापुढं उभं राहिलं. तुम्ही एकमेकाला सुखी कर-ण्यासाठी एकमेकाजवळ आलां असंच मला तरी वाटतं. "

डॉक्टर देवांच्या मुखानं खरोखरीचा देवच आम्हांला आशीर्वाद देतो आहे असं मला वाटलं.

" बरं आतां पुढं कशी काय व्यवस्था करायचं योजलं आहे तुम्ही ? " डॉक्टरांनी विचारलं.

त्यावर मी म्हटलं " प्रथम आक्काबापूंना भेटतें, कोणत्या मुहूर्तावर मी त्यांच्या घराबाहेर पाऊल ठेवलं कुणास ठाऊक ! पण कांही ना कांही निमित्तानं त्यांची भेट दुरावतच चालली आहे. त्यांना कधी भेटेनसं झालं आहे मला. त्यांना मी खुळेपणा करून बसलें असं वाटतंय की काय हें पाहायचं आहे. "

मी जायला उठलें, तेव्हा डॉक्टर हसून म्हणाले " खरंच तुम्ही घराबाहेर पाऊल टाकलेला योग हा मंदयोग असला पाहिजे. कारण तुमच्या आक्का-बापूंची भेट तुम्हांला इतक्यांत होण्यासारखी नाही. तरीपण तुम्हाला अवघड वाटायला नको. अक्काबापूंच्या घराइतकाच डॉक्टर देवांच्या पर्णकुटीवरहि तुमचा हक्क आहे. तुम्ही इथं स्वस्थपणानं रहा. पुढं कशी व्यवस्था करायची, हें पाहूं आस्ते आस्ते. "

" पण आक्काबापूंची भेट आता कां व्हायची नाही ? "

" तुम्ही अधीर झालां आहां हें साहाजिकच आहे. पण सरकारी नोकरीं-तल्या माणसाची बैठक स्थिर थोडीच असते ? आज इथं तर उद्यां तिथं. बापूंना फाळणी पार्टीतून जिल्ह्याच्या सर्वे ऑफिसांत नेलंय. चार दिवसांमागंच ते नंदनगांवला गेले. आणि हो, तुम्हांला सांगायचं म्हणजे तुमच्या आक्का

मुद्दाम येऊन सांगून गेल्या जातांना की गुजाताई आल्याबरोबर पाठवून द्या तिला म्हणून."

आक्का बापू दूर गेल्यामुळं मला प्रथम थोडं अवघड वाटलं, पण त्यांचा हा निरोप ऐकून मला आनंदहि वाटला. आक्कांचं सख्य हें देखल्या देवा दंडवत अशा जातींतलं नसून त्यांत खरोखरीचा जिव्हाळा आहे, असं मला प्रत्यंतर आलं. प्रथम ढीगभर अगत्य दाखवायचं आणि मागाहून ओळखहि द्यायची नाही, अशीं फसवीं माणसं जगांत थोडीं थोडकीं नसतात. आक्का बापू त्यांपैकीं नाहीत याचा मला आनंद झाला आणि त्यांच्या भेटीबद्दलची माझी उत्कंठा अधिक तीव्र झाली. डॉक्टरना वाईट वाटेल म्हणून मी दोन दिवस त्यांच्याइथं राहिलें आणि तिसरे दिवशीं मुलांना घेऊन नंदनगांवला निघालें.

निघतांना मी डॉक्टरांना नमस्कार केला, तेव्हा डॉक्टरनी गहिंवरून म्हटलं, " गुजाताई देव तुझं आणि तुझ्या या लेकरांचं भलं करो एवढाच आशीर्वाद मी तुला देतों. तुम्हांला इथंच ठेवून घ्यावं असं मला वाटलं; पण माझातरी आता कितीसा भरंवसा आहे! हें पिकलं पान कधी गळून पडेल याचा भरवसा नाही. असल्या लिटपिटक्या आधारावर भिस्त ठेवण्यापेक्षा आक्काबापूंचा खंबीर आधार तूं जवळ करते आहेस तेंच हिताचं आहे. माझी लेक मला फार काळ लाभली नाही. तुझ्या रूपानं ती आली या आनंदांत राहण्याचा हव्यास मला वाटत होता, पण पुढच्या सोईवर दृष्टि ठेवून मला तो आवरलाच पाहिजे. जा खुशाल असां."

डॉक्टराना गहिंवर आला. त्यांना अधिक बोलवेना. मला आपली लेक मानण्याच्या त्यांच्या थोर मनामुळं त्यांच्याविषयी माझ्या अंतर्यामींहि भक्तिभाव निर्माण झाला. मला कांही बोलवेना. मी कसंबसं म्हटलं, " आपल्या मायेच्या सावलींत राहाण्यांत मलाहि आनंदच वाटला असता बाबा. पण या मुलांसाठी..."

" होय, या मुलांसाठी आपण आपलीं मनं मारलीं पाहिजेत. देवानं दिलेली ठेव जतन करण्यासाठी—गुजाताई, हे नीट जपून ने बरोबर. माझ्यापाशी अधिक द्यायला नाही ग. धंदा करतांना द्रव्यसंचय हें ध्येय मी ठेवलं नाही, याचं केव्हा मला वाईट वाटत असेल तर अशा वेळीं बघ. खऱ्या गरजवंतांना भरपूर देण्याचं सामर्थ्य माझ्या अंगीं माझ्या वेडेपणामुळं आलं नाही."

" पण बाबा, पैशापेक्षा मोलाचे शुभाशीर्वाद तुमच्यापाशी आहेत आणि ते तुम्ही दिल्यावर कर्मदरिद्र्याचंहि कोटकल्याण होईल."

नंदनगांवला जातांना मी मनांत विचार करूं लागलें—मी सडी असतांना आक्कांनी ज्या आपुलकीनं माझं स्वागत केलं, तीच आपुलकी या दोन लेक-रांची जबाबदारी माझ्या शिरावर असतांनाहि दिसून येईल का? आणि जर तशी दिसली नाही, तर मी त्यांच्या घरांत बळेबळे ठाण मांडणं उचित होईल का? आक्काबापू हीं थोर मनाचीं माणसं आहेत, पण नुसत्या थोर मनानं जगांत निभाव लागत नाही. जगांत पैसा लागतो. बापूंची मिळकत बरी असली, तरी त्यांचा वाढता प्रपंच आहे, त्यांत माझाहि वाढलेला बोजा मी त्यांच्यावर कां लादावा? छे, असं नाही करतां कामा. आपली आपण व्यवस्था लावून घेतली पाहिजे. अडीअडचणीला त्यांची मदत मिळेल तेवढी पुरे झाली.

आक्कांनी माझं स्वागत पहिल्यासारख्याच अगत्यानं केलं. पोटावारी राब-णारी बाई या फायद्यावरच त्यांची दृष्टि नसून माझ्याविषयींचा जिव्हाळा त्यांच्या अंतर्यामीं आहे हें दिसून आल्यामुळं मला मोठं समाधान वाटलं. पण माझी सगळी हकीकत ऐकल्यावर त्यांच्या मनांत एक किंतु निर्माण झालेलाहि मला दिसला. माझी आशा आणि विश्वास ( मी माझ्या स्वीकृत मुलांचीं हीं नावं ठेवलीं होतीं ) हीं ब्राम्हणाचींच मुलं आहेत कशावरून? आणि तीं भलत्या जातीचीं असलीं तर लोकांचा बोल आणि रोषहि आपल्या वाट्याला येईल, अशी भीति आक्कांना वाटली. त्यांनी मला ती बोलून दाखविली नाही, पण नवराबायकोंचा संवाद सहजगत्या माझ्या कानांवर पडला त्यावरून मला हें उमगलं.

मी परसांत भांडीं घासतें आहे, असं समजून आक्का बापूंना म्हणत होत्या पण मी माजघरांतच वाळवून आणलेल्या कपड्यांच्या घड्या घालीत होतें, त्यामुळं नवराबायकोंचं बोलणं मला ऐकूं आलं.

" गुजाताई कांहीतरीच करून बसती! आपलं झालं थोडं न् पाव्हण्याचं घोडं पुढं असं म्हणतात त्यांतली गत! आशा विश्वासाचं लोढणं—"

" लोढणं कुणाच्या गळ्यांत नसतं? स्वतःचीं मुलं म्हणजे काय लोढणं नव्हे? हें लोढणं निसर्गानं गळ्यांत बांधलं काय आणि परिस्थितीमुळं गळ्यांत

बांधून घ्यावं लागलं काय, सारखंच. हीं लोढणीं मानलीं तर क्लेशकारक होतात, मानलीं तर आल्हाददायक होतात. मुलं म्हणजे लोढणं मानणं यासारखा करंटेपणा नाही. मुलांना भूषणं मानून मिरवणं आणि जतन करणं यांतच जीविताचं स्वारस्य आहे. यानंच जग शोभिवंत आणि वैभवशाली बनलं आहे. तूं म्हणतेस तसं मुलांना लोढणं म्हणून झिडकारलं तर—."

" तसं कुठं म्हणतेंय मी ? पण गुजाताईनं आणलेलीं हीं मुलं कुणाची कोण ? उद्यां तीं भलत्याचींच ठरलीं तर नसता वाईटपणा यायचा बापडीला. "

" गाढव लोक असतील ते देतील तिला वाईटपणा. शहाणे तिला केव्हाहि चांगलंच म्हणतील. मुलं कुणाचीं आहेत यापेक्षा ती निराधार पोरकीं आहेत, एवढंच पाहून गुजाताईनं त्यांना उचलून घेतलं. ही तिची माणुसकी सुज्ञ माणसाला प्रशंसनीय वाटेल. मलातरी गुजाताईबद्दल आदर वाटायला लाग-लाय पहिल्यापेक्षा. "

" आहेच माझी गुजाताई खरी थोर मनाची. पण आमच्या मनाला कांही गैर दिसलं नाही, तरी नतद्रष्ट लोक नसतीं खुसपटं काढून छळवाद मांडतील तिचा आणि तिच्या बरोबर आपलाहि. "

आक्कांची ही शंका ऐकून मी थोडीशी भ्यालें. पण कांही झालं तरी मला आता त्याला तोंड देणं भाग होतं. आपल्याला त्रास झाला तरी हरकत नाही, पण आपल्यापायी आक्काबापूंना त्रास होऊ देणं योग्य नव्हे, हा दुसरा विचारहि माझ्या डोक्यांत सुरू झाला आणि त्यासाठी वेगळं बिऱ्हाड थाटण्यापेक्षा दुसरा कोणताच मार्ग मला दिसेना.

दुसऱ्या बिऱ्हाडाच्या माझ्या बेतास आक्का एकदम मान्यता देतील हें शक्य नव्हतं. त्यांच्यावर खर्चाचा बोजा नको, हें कारण मी सांगितलं तर त्यांना तें कमीपणाचं वाटलं असतं. दोन लहान मुलांचा भार सोसण्याचं सामर्थ्य त्यांना नाही असं म्हटल्यासारखं झालं असतं. जातपातीच्या लोकापवादाचं भय मी दाखवलं असतं तर आपलं बोलणं चोरून ऐकल्याचा माझा वहीम त्यांना आला असता. मग कोणत्या निमित्तावर मी त्यांची मान्यता मिळवायची ? एक नव्हे, दोन नव्हे, चार दिवस विचार करीत होतें मी. अखेर एक युक्ति सुचली.

नंदन मुद्रणालयांत छापलेल्या कागदांच्या घड्या घालायचं काम पत्करायचं

आणि त्यासाठी छापखान्याजवळच राहिलं पाहिजे, या सबबीवर दुसरीकडे बिऱ्हाड मांडण्याची गोष्ट मी आक्कापुढं काढली. मला वाटलं होतं आक्कांना त्यावर कांही म्हणतां यायचं नाही. पण झालं उलटंच. आक्का म्हणाल्या " तुला ही असली उसाभर हवीच कशाला ? आणि यांत तुला मिळकत तरी कितीशी होणार ? पाच दहा रुपयांसाठी मी नाही बाई तुला दूर जाऊं द्यायची. आणि लागलेच तुला कधीं पैसे तर मी देईन. "

बापूंनींहि आपल्या सौ. चीच री ओढली. ते म्हणाले " आणि समज गुजा-ताई, हौस म्हणून तुला हें घड्यांचं काम करायचं असलं तर छापखानेवाला कागद इथं पाठवील आणि घड्या घेऊन जाईल आपल्या माणसांकडून. छापखा-नदारांची रीतच आहे ही. इथं घड्या घातल्यास तर आम्हीहि लागूं घड्या घालायला. आम्हांलाहि तेवढीच गंमत. "

ही माझी युक्ति वाया गेली. आणि दुसरी हुकमी युक्ति सुचेना तेव्हा माझ्या मनांतील खरी गोष्ट सांगून मोकळं व्हायचं मी ठरविलं. मी वेगळं बिऱ्हाड मांडत असलें, तरी आक्काबापूंचा लोभ टिकवून धरीन एवढंच नव्हे, तर वडीलकडीला त्यांचा आधार घेईनच घेईन, असा त्यांना निर्वाळा दिला. तरीहि त्यांना माझं म्हणणं पटेना. अखेरीस मी कांही असलं तरी वेगळं बिऱ्हाड करणारच, हें पाहून आक्का थोड्याशा घुश्श्यानंच म्हणाल्या " तुझी तूं मुखत्यारीण आहेस बाई. तुझ्यावर जोरा करणार आम्ही कोण ? "

आक्कांचा हा रोष तात्पुरता आहे आणि तो लवकरच दूर होईल, ही मला खात्री होती. मी शेजारच्या घरांतल्या दोन खोल्या घेऊन माझं बिऱ्हाड मांडलं. तरी तें नावापुरतंच होतं. माझं नी मुलांचं जेवण आणि झोपणं तेवढं वेगळं होई. बाकीच्या सगळ्या गोष्टी मिळून मिसळूनच चालल्या होत्या.

छापखान्यांतल्या कामाचं खोटंच निमित्त मी वेगळं बिऱ्हाड मांडण्यासाठी सांगितलं होतं पण आतां तें खरं करून दाखवावयालाच पाहिजे होतं. नाहीतर माझा लबाडपणा त्यांना उमगून आला असता. म्हणून मी नंदन मुद्रणालयाच्या मालकांकडं गेलें आणि घरबसल्या करतां येईल असं कांही काम देण्याबद्दल मागणी केली.

" आमचा छापखाना लहान, त्यांत पुस्तकाचं काम फार करून होत नाही,

आणि म्हणून घड्यांचं काम नसतंच." असं उत्तर मला मिळालं. तरीपण मालक बाळाभाऊ यांना माझ्या काम करण्याच्या हौसेचं कौतुक वाटलं. ते म्हणाले "तुमच्यासारख्या ब्राह्मण स्त्रिया अशीं कामं करायला पुढं होत नाहींत फार करून. तुम्ही आपण होऊन काम मागायला आलां याचं कौतुक वाटलं मला. मला स्वतःला तुमची ही हौस पुरवतां येत नसली, तरी अन्य प्रकारें मी तुम्हाला मदत करीन. तुम्ही पुनः एकदां सवडीप्रमाणं मला भेटा. तोंपर्यंत मी विचार करतों आणि तुम्हांला योग्य असं कांही काम आढळलं तर तुम्हांला सांगतों."

मला काम मिळालं नाही, म्हणून माझा थोडा हिरमोड झाला, तरी बाळाभाऊंच्या त्या सहानुभूतीनं मला समाधानहि वाटलं. जगांत वाईट माणसंच जास्त, दुसऱ्याला साहाय्य करण्याऐवजी दुसऱ्याच्या मार्गांत काटे पसरण्यांतच त्यांना आनंद वाटतो असं लोकांनी म्हटलेलं मी पुष्कळदां ऐकलं होतं. पण मला मात्र याच्या अगदीं उलट अनुभव येत होता. घरीं मला रावजींसारख्या थोर मनाच्या माणसाचा लोभ मिळाला. पण बाहेर पडल्यावर बापू, डॉक्टर देव, यांच्यासारखीं मायाळू माणसंच भेटलीं. आज बाळाभाऊ भेटले त्यांनीहि मला भीतिऐवजी विश्वासच दाखविला. सरळमार्गी माणसाला जगाची धाकधूक वाटायचं कारण नाही असा मला धीर आला.

दुसरेच दिवशीं एक मुलगा माझा शोध करीत आला आणि मला म्हणाला "आईनं बोलवलंय तुम्हांला."

"कुणाचा तूं ?"

"नंदनमुद्रणालयाच्या पारख्यांचा"

"बाळाभाऊंचा मुलगा तूं ?"

"नव्हे, ते माझे आजोबा."

"कशाला बोलवलंय मला तुझ्या आईनं ?"

"तें सांगितलं नाही तिनं! लवकर यायला सांग ? असं मात्र सांगितलंय."

"घर कुठं आहे तुमचं ?"

"छापखान्याच्या मागल्या बाजूलाच राहतों आम्ही."

" बरं येतेंच मी अंमळशानं. "

मी पारखीणबाईंना भेटलें. महिन्याच्या बाळंतीण होत्या त्या. त्यांनी मला महिनाभर आपल्याकडलं स्वैपाकाचं काम करतां का असं विचारलं. क्षणभर मी बाचकलें. असलीं कामं करणं हें हलकेपणाचं मानायची आपल्या मनाला लागलेली संवय माझ्या मनाला तरी कशी नसेल ? पण लगेच माझ्या मनांत आलं, काय झालं केलं म्हणून ? रावजींनी " कोणतंहि काम हलकं नाही, तें कशा प्रकारें केलं जातं यावरच त्याचा चांगलेपणा किंवा क्षुद्रपणा अवलंबून आहे " असं सांगितलेलं मला आठवलं आणि मी ' ठीक आहे ' असं म्हटलं. मी ठरलेल्या वेळीं येईन, शिधा तयार असेल त्याचा स्वयंपाक करून ठेवीन. अधिक थांबणार नाही. बाकीची उस्तवारी माझ्या हातून होण्यासारखी नाही. " असं म्हटलं. त्यांनी तें मान्य केलं. " या कामाबद्दल काय घ्याल तुम्ही ! " असं त्यांनी विचारलं " योग्य वाटेल तें द्या. तुम्ही कांही दिलंत तरी मला पुरेल " असं मी उत्तर दिलं.

सकाळीं दहाला आणि संध्याकाळीं साडेपांचला जायचं आणि तासाभरांत स्वयंपाक उरकायचा असा माझा क्रम सुरू झाला. अवांतर कामं करायचीं नाहीत असं मी सांगितलं असलं, आणि पारखीणबाई मला दुसरं तिसरं कांही सांगत नसल्या, तरी त्यांच्या मुलींच्या वेण्या, मुलांच्या आंघोळी, असलीं किरकोळ कामंहि त्यांतल्या त्यांत मी करीत असें. सकाळीं ताक करायचं, संध्याकाळीं विरजण घालायचीं, मुलांच्या मधल्या वेळच्या खाण्यासाठी कांहीतरी करून ठेवायचं या गोष्टी मी होऊन करूं लागलें.

" वैनी, मी माझ्या समजुतीप्रमाणं स्वयंपाक करतें, तुमच्या इथल्या चवीची मला कल्पना नाही. तिखट मीठ आरतं परतं होण्याचा संभव आहे. तसं कांही होत असलं तर सांगा हं. तसं करत जाईन मी. " मी प्रथमच सांगितलं.

त्यावर पारखीणबाई म्हणाल्या " तुम्ही माझी चांगली फजीति केलीत गुजाताई. तुमच्या आमटीची नी पातळ पोळ्यांची तारीफ चाललीय घरांत ' तुला यांची शिकवणी ठेवायला हवी ' असं म्हणायला झालं बरं का ! "

हें काम आपल्याकडून समाधानकारक होत असलेलं पाहून मला समाधान वाटलं, धीरहि आला.

पारखीणबाईंनी पुढं मेतकूट संपल्याची कुरकूर केली. एके दिवशीं दुपारीं जाऊन मी मेतकूट तयार करून दिलं. शेवयांची गोष्ट काढली त्याहि करून दिल्या. सांडगे पापडांची त्यांची अडचणहि मी निवारली. पारख्यांच्या घरीं माझ्याविषयीं ग्रह उत्तम होऊन बसला. पारखीणबाई एके दिवशीं म्हणाल्या "बरं कां गुजाताई, काल शेवडे वकीलांच्या भामाबाई आल्या होत्या. त्यांना तुम्ही केलेल्या शेवया दिसल्या. त्या त्यांना किती पण आवडल्या! त्या म्हणाल्या आपणाला अशा शेवया करून मिळाल्या तर मागतील तितके पैसे देऊं आपण." आणखी एकदा त्यांनी सांगितलं "हळबे मुनसबीणबाईंना तुमचं मेतकूट भारीभारी आवडलं. ती शिकलेली बाई. तिला मेतकूट नी पापड सांडग्यांतलं कांही येत नाही. मद्रासी नी गुजराथी पापड कुणाकडूनतरी कधीमधी आणवतात. मुनसबीणबाईंना तुम्ही पापडसांडगे करून दिले तर हौसेनं घेतील."

पारखीणबाईंनी हें सहज सांगितलं खरं, पण त्यानं मला एक नवी कल्पना सुचली. 'आज काल शहरांतल्या पांढरपेशा बायकांना नेहमीं लागणारे पण रोज न नडणारे पापड लोणच्यासारखे पदार्थ स्वतः बनवणं अडचणीचं होतं. पुष्कळांना ती दगदग वाटते. त्यांना हे पदार्थ आयते मिळाले तर हवे असतात अन् तसे मिळाले तर पैसा दोन पैसे अरतेपरते द्यायलाहि त्यांची तक्रार असणार नाही. आपण अशा प्रपंचोपयोगी पदार्थांचा पुरवठा केला तर आपलं काम होईल, लोकांचीहि सोय होईल. आपल्याला हें काम घरबसल्या करतां येईल. लोकांच्या घरीं जाऊन काम करण्यांत नाही म्हटलं तरी थोडा वेळ मुलं नजरेआड करावीं लागतात, ती अडचण या उद्योगांत नाही.

माझी ही कल्पना आक्कांना आणि बापूंनाहि पटली. पारखीणबाईंना मी बोललें त्यांनाहि हें आवडलं. त्यांनी आपल्या मामंजींना हें सांगितलं तेव्हां त्यांनाहि योग्य वाटला माझा बेत. एवढंच नव्हे तर माझं प्रपंच-वस्तु-भांडार सुरू झाल्याचीं हस्तपत्रकं छापून देण्याची सिद्धता त्यांनी दाखविली. पापड, सांडगे, मेतकूट, शेवया, गव्हले, मसाला असे जिन्नस मी तयार केले. कांचेच्या बरण्या आणून त्यांत ते भरले. कपाटांत या बरण्या शोभीवंत दिसतील अशा मांडून ठेवल्या. पंधरावीस रुपये मी पदरमोड केली होती, ती भरून निघते

की बूड लागते, याबद्दल मन शंका घेत होतं. बाळाभाऊंकडून मी हस्तपत्रकं छापून घेतलीं. जाहिरातीचा कुशलपणा माझ्या अंगीं कुठला? बाळाभाऊ त्यांत मुरलेले. त्यांनी हस्तपत्रक छापून काढलं—

## प्रपंच वस्तुभांडार

गृहिणींनो तुमची अडचण दूर झाली. मंडळी मिटक्या मारीत जेवतील. ते खूष होतील आणि तुमचीहि हौस पुरवितील.

**जादूगार पापड:**—या पापडाचा तुकडा तोंडांत जातांच स्वारीचा राग रुसवा पार पळेल, दर शेकडा १॥ रु.

**गंधर्व मेतकूट:**—बालगंधर्वांच्या गाण्याइतकाच आल्हाद या मेतकूटापासून मिळेल, पावशेर ८ आणे.

**जावई शेवई:**—जावईबुवा अवचित आले, तरी सासूबाईची तारांबळ व्हायला नको. आमची शेवई त्यांचें तोंड खात्रीनें गोड करील. पावशेर ८ आणे.

**देव गव्हले:**—केव्हाहि व्रत वैकल्यं करा. नैवेद्याला गव्हले तयार. पावशेर ७ आणे.

याशिवाय वरमाय सांडगे, व्याही लोणचीं, इत्यादि पदार्थ आमच्या भांडारांत माफक दराने मिळूं शकतील. मागणीप्रमाणे दुसरे पदार्थहि पुरविले जातील. खाद्यपदार्थ सोवळ्याचे असल्यामुळे आजीबाईनाहि चालतील. अनुभव घेऊन संतुष्ट व्हा.

**गुजाताई**

व्यवस्थापिका, प्र. व. भांडार.

बाळाभाऊंनी हस्तपत्रकं नुसतीं लिहूनच दिलीं नाहीत, तर छापून आपल्या नोकरांकडून घरोघरीं वाटलीं. माझ्या मनाला वाटणारी धास्ती दूर व्हायला वेळ लागला नाही. एकदोन दिवसांतच माझ्या बरण्या रिकाम्या होऊन गेल्या.

मागण्या वाढूं लागल्या आणि त्यांचा पुरवठा करतांना माझी त्रेधा उडायला लागली. माझ्या एकटीच्या हातून हें काम कसं काय निभावेल ही नवीच काळजी निर्माण झाली.

ह्या कामाच्या भरतीला दुसरंहि एक काम पुढं यायला लागलं. एके दिवशीं मुनसफांची मोटार माझ्या दारांत उभी राहिली. मुनसफीणबाई आंत आल्या. त्यांच्या महिला मंडळाचा वाढदिवस होता आणि त्यानिमित्त पार्टी होती. त्यासाठी फराळाचे जिन्नस करून द्याल का, असं त्यांनी विचारलं. जिन्नस किती लागतील तेंहि त्यांनी सांगितलं. इतकं मोठं काम करायचं म्हणजे खूपच दमचक्की होती. पण मी तें पतकरलं. पैशापेक्षा थोरामोठ्यांच्या बायकांत आपली प्रसिद्धि होईल हा फायदा मला विशेष वाटला.

ओळखींतून ओळख वाढते आणि कामांतून काम वाढत जातं म्हणतात त्याचा मला अनुभव यायला लागला. महिला मंडळाच्या पार्टीचे मी करून दिलेले जिन्नस सर्वच सभासद बायकांना आवडले. आणि त्यामुळं कुणाच्या घरीं कसला समारंभ निघाला की माझ्याकडंच जिनसांची मागणी यायला लागली. कुणाच्या घरीं मुंज, कुणाच्या घरीं लग्न, तर कुणाच्या घरीं डोहाळे-जेवण. सराफीणबाईंच्या मुलीच्या लग्नांत मी करून दिलेले रुखवताचे जिन्नस फारच गाजले. ते सुबक आणि सुंदर करण्यासाठी मी खरोखरच मेहनत घेतली होती. कमळाच्या आकाराचे माझे चिरोटे आणि अंगुळापासून हातभर लांबीच्या रंगीबेरंगी करंज्या मी बनविल्या होत्या. वधूवरांच्या नांवाच्या अक्षरांच्या चकल्या कडबोळ्यांनी आणि मलमलीच्या घड्यासारख्या मांड्यांनी मी विहिणी करवल्यांना चकित केलं होतं. माझ्या त्या जिनसांचं प्रदर्शन व्याह्यांनी मंडपांत मांडलं आणि तो एक आल्यागेल्याच्या कौतुकाचा विषय झाला. सराफीणबाईनी मला ठरलेले पैसे तर दिलेच, पण इतर नातलगांबरोबर लग्नाचा आहेर दिला

या एकंदर प्रकारानं माझ्या मनांतली एक चिंता किंवा भीति म्हणा, दूर झाली. मी निराधार आहे आणि त्यांतच दुसऱ्या दोन जीवांची जोखीम पदरांत बांधून घेऊन बसलें आहे, आमचं कसं होणार, हीच ती भीति. पण ही भीति खोटी आहे, आपण आपला सांभाळ खात्रीनं करूं असा विश्वास मला वाटायला लागला. पण मी काळजींतून पूर्ण मुक्त झालें असं मात्र नाही.

ह्या बाहेरच्या उसाभरी करतांना आशा विश्वासकडं लक्ष द्यायला मला फारच थोडा वेळ मिळे. त्यांच्या खाण्यापिण्याची हेळसांड मी कधींहि केली नव्हती. त्यांच्या कपड्यालत्त्यांतहि मी दैन्य दिसूं दिलं नव्हतं. आणि मी कामांत गुंतलेली असलें, तरी त्यांना हसवाखेळवायला आक्का आणि मंडळी होती. आक्का खरोखर थोर मनाच्या. माझ्याइतकीच माझ्या या मुलांवरहि त्या माया करीत. एकादे वेळीं आपल्या बाळबेबीला विसरतील, पण खाऊ वाटतांना आशा विश्वासला विसरायच्या नाहीत. त्यांच्या आधारावर मला मुलांबद्दल निष्काळजी राहतां येत होतं.

पण खाण्या कपड्यापेक्षाहि मुलांना दुसरं कांही हवं असतं. आईच्या कुशींत शिरून अंजारून गोंजारून घ्यायला त्यांना पाहिजे असतं, आणि तें मिळालं नाही तर तीं दीनवाणीं होतात हें मला त्यांनीच शिकवलं.

एके दिवशीं काय झालं, सावळ्यांनी मागितलेल्या शेवया पोंचवून मी घरीं आलें, तों आशा दीनवाणा चेहरा करून सोप्यावर बसलेली दिसली. मी विचारलं " आशा कां बसलांत बाईसाहेब ? भूक लागली ? "

तिनं नकाराची मान हलवली,

" मग भांडलांत होय ? बेबीशीं का बाळशीं ? "

" नाही बरं का. आमचं होतं कां कधी भांडण ? "

" मग झालं काय तें तरी कळूं दे ? "

" किनई ताई——"

आशाला कांहीतरी सांगायचं होतं, पण सांगतां येईना. ती रडूं आवरीत आहे असं मला दिसलं.

मी आशाला जवळ घेतलं, तिचं तोंड कुरवाळलं, तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हटलं " काय झालं माझ्या बाबीला ? "

पोरीनं मला मिठी मारली. तिच्या चिमुकल्या हाताचा माझ्या गळ्याभोवती विळखा पडला. तिच्या त्या वेळच्या विळख्यांत मला आतांपर्यंत कधीहि जाणवलं नव्हतं असं कांहीतरी जाणवलं. तो विळखा तिनं अगदी करकचून मारला असला, तरी त्यांत मला गुदमरायला झालं नाहीं, उलट तो मला मनस्वी आल्हाददायक वाटला. दाटून आलेल्या आवाजानं आशा उद्गारली " ताई— ! "

" काय झालं बेटा, सांग ना ? "

" ताई, विश्वास किनई रुसलाय तुझ्यावर. तो म्हणाला ' ताई वैद्द आहे म्हणून.' मग मी एक चापटी मारली त्याला. तर तो माजघरांत फुरंगटून बसलाय. "

" म्हणजे ! स्वारी घरांत आहे ? काय झालं ग त्याला माझ्यावर रागवायला ? "

मी लगबगीनं आंत गेलें. त्याची केविलवाणी चर्या पाहून मन कलवलं. मी त्याला उचलून घेतलं आणि विचारलं " कां रुसवा आलाय राजेश्री ? मी वैद्द आहे होय ? "

आशेसारखीच विश्वासची ती मिठी मला गोड गोड वाटली.

" ताई ग ऽऽ " एवढा एकच शब्द उच्चारून लेकरूं हंबरलं. त्याला चुचकारून उगी करायला मला घटका लागली. त्याचा कड ओसरल्यावर त्याला मी विचारलं " तुला चेंडू आणून दिला नाही, म्हणून रागावलास ? बैस जरासा. आत्तां जाऊन घेऊन येतें बाजारांतून. "

मी त्याला खालीं ठेवूं लागतांच तो मला घट्ट धरून ठेवीत म्हणाला " मला चेंडू नको. असंच घेऊन बैस. "

" बसलेंच आहे की, पण रागवलास कशासाठी हें तरी सांग ? "

" उगीच रागावलों ग. किनई खेळतांना बाळ दुपारीं पडला, मी नाही हं त्याला पाडलं, आपणच पडला न् रडायला लागला. कांही लागलं नव्हतं ग त्याला. पण रडायला लागला. मग आक्कांनी त्याला जवळ घेतलं आणि मांडीवर थोपटींत गाणं म्हटलं. कित्ती गोड गाणं म्हणतात आक्का ! बाळसारखं मांडीवर पडून थोपटून घ्यावं असं वाटायला लागलं मला–नी मग तुझी आठवण—"

विश्वासला नीट सांगतां येईना, पण त्याला काय सांगायचं होतं तें मी समजलें. त्याला आई हवी होती. मी त्याची नुसती दाई होतें, त्याची सर्व तऱ्हेची शुश्रूषा करीत होतें, पण तेवढयावर त्याच्या बालमनाची भूक भागत नव्हती. हा उमज पडतांच मीं त्याचा मुका घेतला. लगेच त्याची चर्या टवटवली. त्याला मांडीवर आडवा घेऊन थोपटलं आणि आशेला म्हटलं " तूं बाहुलीचं गाणं म्हणतेस तें म्हण ग ! आमच्या राजाला आज गाणं हवंय म्हणे. "

" मला नको गाणं — ताईग तूं नुसती बोल. गोष्ट सांग. सांगतेस ? "

विश्वासचे ते लडिवाळ बोल, आणि माझ्या गालांना होणारा त्याच्या मऊ मऊ बोटांचा स्पर्श ! मलाहि कसल्यातरी अपूर्व सुखांत तरंगत असल्यासारखं वाटायला लागलं. माझ्या ठिकाणची आई जागी झाली होती काय कुणास ठाऊक !

जें सुख विश्वासला पाहिजे होतं तें आशाला तरी कसं नको असेल ? ती विश्वासहून दोन तीन वर्षांनी मोठी असेल आणि मुलींच्या जातीचा समजूतदारपणा तिला थोडा अधिक असल्यामुळं ती मनांतली रुखरुख मनांतच ठेवीत असेल. पण तिला मुळांत रुखरुखच वाटत नसेल असं कसं म्हणायचं ? तिच्या मनाचा अंदाज घेण्यासाठी मी म्हटलं " आशाबाळ, तूं ये ना जवळ ! "

किती हौसेनं आली पोर ! आणि मला अगदी बिलगून बसली. मी तिच्या अंगावरून हात फिरविला, तिचं तोंड कुरवाळलं, आणि विचारलं " अग हो, विसरलेंच विचारायचं ! कपाटांत खायला ठेवलं होतं तें खाल्लं कां ग ? "

" नाही ताई. विश्वासला मी द्यायला लागलें तर तो घेईनाच बघ. मग मींहि घेतलं नाही. अन् किनई ताई, आक्कांनी बेबी बाळबरोबर बोलवलं होतं तर हा येईनाच बघ. आतां कसा गुलगुल बोलतो आहे. पण मघाशी अगदीं फुरंगटून बसला होता ! असंच करतो ग हा सदान् कदा. तूं आल्यावर मात्र जातं याचं रुसणं न् फुगणं पार पळून. "

" आहेच माझा राजा तसा " असं म्हणून मी विश्वासचा मुका घेतला. आपलाहि तसा मुका घ्यावा, अशी उत्कंठा आशेच्या चर्येवर उमटल्याचा मला भास झाला. मी तिला आणखीन् जवळ ओढतांच तिनं माझ्या गळ्याला आपल्या नाजुक हाताचा विळखा घातला आणि माझ्या खांद्यावर मान अशा बेतानं ठेवली की तिचा गाल साहजीकच माझ्या ओठाजवळ यावा. मी तिचे पापे घेतले. तिच्या डोळ्यांत समाधानाचं पाणी चमकलं. मलाहि किती समाधान वाटलं त्या वेळीं !

त्या दिवसानंतर रोज घटका दोन घटकातरी आशा विश्वासाला जवळ घेऊन हसवाखेळावायचं असा मी नेमच ठरवून टाकला. त्यांचा गोड लडिवाळपणा पाहून एकीकडून मला सुख व्हायचं आणि एकीकडून माझ्या मनांत

कालवाकालव व्हायची. या लेकरांच्या आया असत्या तर त्यांनाहि नसतं कां हें सुख मिळालं ? आणि त्यांचं सुख हें खरोखरचं सुख. माझ्यासारखं जोडलेलं नातं नव्हे. आतड्याचा जिव्हाळा त्यांचा. पण बिचाऱ्या या सुखाला मुकल्या, आणि आपण मरून या पोरांनाहि मायेच्या सावलीला पारखं केलं ! मुलांना आज याची जाणीव नसली तरी उद्यां त्यांना खरा प्रकार कळला, तर तीं कष्टी झाल्यावांचून रहायचीं नाहीत.

माझ्या मनांत विचारांचा असा गोमकाला व्हायचा आणि आनंदांतहि उदासवाणं वाटायला लागायचं. पण एकंदरींत आशाविश्वासनी माझ्यांतली एक उणीव भरून काढली होती, आणि मी संतुष्ट झालें होतें. कष्ट करायला मला नवा हुरूप आला होता. जीवमान असेपर्यंत या लेकरांना त्यांचा पोरकेपणा जाणवूं द्यायचा नाही अशा उमेदीनं मी माझे उद्योग आवरीत होतें.

हळुहळू माझं काम माझ्या एकटीच्या हातून उरकण्याइतकं थोडं राहिलं नाही. मला कुणाचीतरी मदत घेणं भागच झालं, तेव्हा माझ्या मनांत विचार यायला लागला, " आपल्यांत कितीतरी बायका निराधार म्हणून हालवनवासांत दिवस कंठताहेत. अशा स्त्रियांचा संघ जमवून उद्योग वाढविला तर त्यांची सोय होईल, आपलीहि होईल. स्वार्थ नि परमार्थ एकदमच साधत असेल तर कां साधूं नये ? "

नंदनगावांत भिक्षा मागून दिवस काढणारी तुळसाबाई नांवाची एक उतार वय झालेली बाई होती. उजाडतांच नदीला अंग धुवायला चाललेली आणि अंग धुऊन आल्यावर देवदेवळांत पूजा आरत्या करीत फिरत असलेली दिसायची. अकराच्या सुमाराला मधुकरीला निघायची ती. अशी भिक्षा मागण्यांपेक्षा तिला हक्कानं पोट भरायची संधि मिळाली तर ती आनंदानं तयार होईल, असं मला वाटलं. पण मला वेगळाच अनुभव आला. मी पोटाला घालीन, धडुतं पांघरुणं पुरवीन, घरांत ठेवून घेईन, बसल्या बसल्या होईल तेवढं काम करावं म्हणजे झालं, असं मी तिला विचारालं. तिनं कसलाहि विचार न करतां म्हटलं " नको ग बाई मला तो व्याप. देवानं खासं चालवलंय माझं. त्यानं जन्म दिलाय, तो सांभाळेल मला मरेपावतर ! "

तुळसाबाईच्या या उत्तराचं मला नवल वाटलं आणि देवाची जादू माणसाच्या

मनाला कशी भारून टाकते याची गंमतहि वाटली. भीक मागायला लावतो ती सुद्धां देवाची कृपाच वाटत होती म्हातारीला. आणि ही कृपा हातची सोडायला ती तयार नव्हती! भीक मागणं लाजिरवाणं म्हणतात, पण तुळसाबाईला तसं कां बरं वाटत नाही हें मला समजेना. पण थोडा विचार केल्यावर तोहि उलगडा झाला. एखादी हलकी गोष्ट सुरवातीला लाजिरवाणी वाटली, तरी संवयीनं तिचंच भूषण वाटायला लागतं. आमच्या गांवच्या बाबू कोळ्याची आठवण झाली मला. सातदा तुरुंगांत जाऊन आल्याची शरम वाटण्याऐवजी तो मोठा पराक्रमच वाटतो त्याला!

"बाबू आता म्हातारा झालास, चोरीची खोड सोड ना!" असं रावजींनी त्याला एकदा म्हटलं, तर त्यानं उत्तर दिलं, "राव तुरुंगाचं भय शेळपटांना. सातदा तुरुंगांत गेलों तसा आठव्यांदा जाईन. तुरुंगांत जाणं हें मर्दाचं काम."

बाबूला चोरी करणं म्हणजे मर्दुमकी वाटते, तशीच भीक मागणं ही तुळसाबाईला देवाची कृपा वाटते. कामधंदा न करतां आणि कसली जबाबदारी न घेतां जगायची चटक हेंच तुळसाबाईच्या नकाराचं खरं कारण आहे अशी मी मनाची समजूत घातली.

पण तुळसाबाईनं मला एक दुसरा अनुभव आणून दिला. माझं आमंत्रण नाकारण्याचं ती आपण होऊन गांवांत समर्थन करीत फिरत होती. "ना आई-बापाचा ठिकाणा, ना जातकुळींचा पत्ता, अशीं पोरं बाळगणारी ही बया. हिला ना देव ना धर्म. अशा भ्रष्टाकारांत कशाला शिरूं आणि नरकाची धनीण होऊं? गेल्या जल्मीं कोणतं पाप केलं, तें या जल्मांत फेडत बसलेंय, आणि या जल्मांत नवं पाप करून पुढच्या जल्माची नासाडी कशाला करून ठेवूं?"

तुळसाबाईचं हें म्हणणं मला कळलं, तेव्हां मी कपाळाला हात लावला. दुसरं काय करणार?

पहिल्या पावलींच अशी ठेच लागल्यामुळं मी निराश झालें. आपण होऊन कुणाचं बरं करायला गेलं, तरी तें अंगाशीं येतं. त्यापेक्षा त्या फंदांत न पडलेलंच बरं, असं मला वाटायला लागलं. तरीपण गरजू स्त्रियांचा संघ करून मोठ्या प्रमाणावर उद्योग चालविण्याची कल्पना माझ्या मनांतून दूर होईना. तुळसाबाईसारख्या हट्टी, दुराग्रही आणि मरणाकडे डोळे लावून बसलेल्या बायका

सोडल्या तरी ज्यांच्यापुढं भलं मोठं आयुष्य आहे आणि परिस्थितीनं नाडल्या-मुळं तें कसं कंठायचं हा ज्यांना पेच पडला आहे, अशा स्त्रिया आपल्या समाजांत आहेत, त्यांना आशेचा मार्ग दाखविला तर त्या झिडकारणार नाहीत. बघावाच फिरून एकदा प्रयत्न करून, असं मला वाटायला लागलं. हा विचार फिरफिरून उचल खात होता. त्याला दुसरंहि एक कारण होतं.

घर सोडल्यापासून आतापर्यंत मी गोष्टी केल्या त्या घरच्याहून काय वेगळ्या होत्या? मी जगा बदलली तरी वेगळं असं फारसं कांही केलं नाही. वेगळं कांही-तरी करून दाखवावं, आपला भार दुसऱ्यावर न घालतां दुसऱ्याचा भार हलका करण्याची धडपड करावी, स्त्रीदेखील समाजाची सेवा करूं शकते, हें जगाला दाखवावं, असं कांहीतरी आपल्या मनांत होतं. पण बाहेर पडल्यासारखं तसं कांहीच आपण करून दाखाविलं नाही; ही रुखरुख मला चैन पडूं देत नव्हती. आणि ' तुझं असं कांही ना कांहीतरी कार्य करून दाखव,' असं माझं मन मला ताकीद देत होतं.

माणसाच्या मार्गांत जसे अवचित अडथळे येतात, तसंच या मार्गावर त्याला ध्यानीं मनीं नसलेले सोबतीहि मिळतात. वारूताईची सोबत मला मिळाली ती अशीच नाही का? मी लोकांची कामं घरबसल्या करतें, असं तिला कळलं. ती एक दिवस दुपारीं माझ्याकडं आली. नंदनगांवांत कुणाकडंतरी पाहुणी म्हणून ती आली होती. तिनं मला विचारलं "तुमच्या कामांत हातभार लावायला तुम्हाला कुणी हवं आहे का?"

"हो. हवंय तर. मी शोधतें आहे. पण बायका तयारच होत नाहीत."

"मी आलें तर घ्याल मला?"

"हो, काय हरकत आहे? पण तुमची पैशाची मागणी मला झेपली पाहिजे."

"मला एक दिडकीसुद्धा देऊं नका तुम्ही. मला तुमच्यापाशी ठेवून घ्या. पोटावरी राहीन मी."

वारूताईची हकीकत ऐकून मला भडभडून आलं. काम न करतांहि सांभाळ करावा, अशीच तिची अवस्था होती. वर्षभरसुद्धा संसारसौख्य तिच्या नशिबीं नव्हतं. दिराच्या घरची बटीक होऊन दिवस काढायचं तिच्या नशिबांत आलं होतं. जाऊ मरमर काम करून घेई, आणि शिळंपाकं खायला घाली. तेंहि गोड

बोलून नव्हे. स्त्रीला पुरुष छळतात असा त्यांच्याविरुद्ध डांगोरा पिटतात. पण बायकाहि बायकांचा छळ थोडा थोडका करीत नाहीत. वारुताईनं जाऊबाईंची एकेक करणी अशी सांगितली की तिच्यावर विश्वाससुद्धा बसायचा नाही कुणाचा. पण तिच्या सांगण्याबरोबर तिच्या अंतर्यामींचे जे कढ बाहेर पडत होते, ते प्रत्यक्ष पाहिल्यावर तिच्या सांगण्यांत लबाडी असेल, ती खोटंच नाटक करीत असेल, असा संशयसुद्धा मला आला नाही.

वारूताईंच्या अखेरच्या शब्दांनी तर तिच्याविषयींचा माझा कळवळा बळावला.

ती म्हणाली, " काय कर्म सांगायचं तुम्हांला बाई. मी गुरासारखं राबायला मागं घेतलं नाही. शिळ्या पाक्याला नाक मुरडलं नाही. जाऊबाईंच्या शब्दांचा मारहि मुरदाडपणानं सोसला, आणि पुढंहि सोसला असता, पण भाऊजींची भीति माझ्या सगळ्या घट्टपणाचं पाणी पाणी करायला लागली आहे. भाऊजी गांवांतले प्रतिष्ठित गृहस्थ आहेत. धार्मिक, सरळमार्गी, सदाचारी असं ते म्हणवून घेतात. स्नानसंध्या, पूजाअर्चा, संध्याकाळचा देवदर्शनाचा त्यांचा नेम एवढंच लोकांना दिसतं. पण त्यांचे अंधारांतले चाळे कुणाला दिसायला बसलेत ? काय सांगूं तुम्हाला बाई, काळ आला होता पण वेळ आली नव्हती म्हणून मी त्यांच्या हल्ल्यांतून बचावलें. खुसफुशीनं जागी झालें नी ओरडलें. जाऊबाई धावून आल्या आणि माझ्यावरलं संकट मागल्या पावलीं पसार झालं. ' रात्रीं बेरात्रीं ओरडत उठायला भूतबीत बडवलं की काय तरी ? ' असं तणतणल्या बाई. खरंच मला भूत-समंध बाधणार होता. पण सांगणार कशी ? आणि सांगून माझ्यावर विश्वास थोडाच बसणार कुणाचा ? मी गप्प बसलें. इतर वेळीं दावेदारणसारखी वाटणारी जाऊबाई मला त्या वेळीं मायमाउलीसारखी उपकारी वाटली. "

जास्त कसला विचार न करतां मी वारूताईंना ठेवून घेतलं. आठपंधरा दिवसांतच तिचं माझं जातक जमलं. पण वारूताईसारख्या तरुण विधवांच्या राशीला लागलेले पापग्रह तिला अजूनहि पीडा देतच राहिले. तिला परत आपल्या कोंडवाड्यांत अडकविण्याचा तिच्या वे. शा. सं. भाऊजींनी कधी प्रत्यक्ष तर कधी अप्रत्यक्ष तिऱ्हाइतामार्फत प्रयत्न चालविलाच होता. त्यांना तिची करुणा येत

होती म्हणून नव्हे, तर आपणासारख्या मान्यस्त माणसाची भावजय गांव सोडून मोलाचीं कामं करून पोट भरते, या ठपक्याचा त्यांना बाऊ वाटत होता. आपल्या पापाचा बभ्रा ही बया करील अशी धाकधूकहि त्यांना वाटल्यावाचून राहत नसेल.

पण वारूताई खंबीर राहिली. तिनं त्या सगळ्यांच्या प्रयत्नाला दाद दिली नाही. त्यांनी दाखविलेल्या आमिषांची भुरळ तिला पडली नाही. आर्जवानं जें काम साधत नाही तें भीति दाखवून साधण्याचा प्रयत्न माणूस करतो. वारू-ताईच्या भाऊजींनीहि तसा केला. घरचे दानदागिने चोरून नेल्याबद्दल तिच्यावर खटला करण्याची भुमका त्यांनी उठविली आणि अस्वलाआधी दरवेशाची आरोळी म्हणतात, त्याप्रमाणं तिचं घरांतलं वर्तनच ठीक नव्हतं अशी कंडी पिकविण्यासहि त्यांनी कमी केलं नाही.

या बागुलबुवाला मीहि भ्यालें. वाटलं, या नसत्या भानगडी कशाला घ्या ? वारूताईची मला कींव वाटत असली तरी तिच्यापायीं आपल्यावर कसलीं तोहमत आली तर ती निस्तरत बसायला वेळ आणि बळ आपणाला कुठं आहे ? धर्म करतांना कर्म उभं राहिलं तर घ्या काय ? पण माझ्या डळमळीत मनाला आक्का, बापू, बाळाभाऊ, पारखीणबाई या मंडळींनी धीर दिला. मुनसफीण बाईची आणि माझी आतां चांगली ओळख झाली होती. त्यांनाहि मी वारुताईला भेटविली आणि तिच्याच तोंडून त्यांनी तिची कर्मकथा ऐकली. त्यांनी आपल्या साहेबांना ती सांगितली वाटतं. सर्वच मंडळींनी मला आणि वारूताईला निर्धास्त रहायला सांगितलं. वारूताईच्या रूपानं मला एक कष्टाळु आणि कुशल मदतनीस मिळाली, एवढंच नव्हे, तर एक पाठची बहीण मिळाल्याचं समाधान मला वाटूं लागलं. आशा विश्वासना मावशी मिळाली. हीं छबकडीं होतींच तशी गोडवीं. वारुताईला त्यांनी बघतां बघतां आपला लळा लावला. तीहि त्यांची उस्तवारी उल्हासानं करायला लागली. एके दिवशीं मी तिला म्हटलं, " किती सोपस्कार करतेस ग पोरांचे ? अशानं लाडावून मात्र ठेवशील त्यांना. "

वारूताई विश्वासला तीट लावीत म्हणाली " कोण लाड करणार नाही ताई अशा गुलाब मोगऱ्यांचे ? तुम्ही तरी काय थोडी अपूर्वाई करतां यांची ? बघ-

तेंच की एकसारखी. आणि ताई, खरं सांगूं का तुम्हांला--" वारूताईला गहिं-वर आल्यासारखा झाला. तो आवरून ती म्हणाली, " ताई, आशा विश्वासनं माझ्या भगभगीत जन्माला खरोखरच टवटवी आणली आहे. जाऊबाईच्या पोरांचं मी खंडीभर करीत होतें पण आईबापाप्रमाणं तीं कार्टीहि मला बटीक म्हणूनच माझ्याकडून चाकरी करून घेत होतीं. मायेचा शब्द कधी निघायचाच नाही कुणाच्या तोंडांतून. खंडीभर खस्ता खाल्ल्याचं चीज तर व्हायचंच नाही, पण काडीची कसूर झाली तर घर डोक्यावर घ्यायचीं तीं. आशा विश्वास ' मावशी ' अशी गोड हाक मारतात, तशी ' काकू ' ही गोड हाक त्या पोरांनी मारली असती, तर तेवढ्यासाठीहि मीं जाऊबाईचा छळवाद आनंदानं सोसला असता. ताई खरंच सांगतें, आशा विश्वास ' मावशी ' म्हणून मला बिलगलीं म्हणजे किनई हरवलेलं कांहीतरी सापडलं असं मला वाटायला लागतं."

माझ्या सहवासांत वारूताईला सुख किती लागलं हें तिचं तिला माहीत. पण तिनं मला परोपरीनं सुखी केलं यांत शंका नाही. कष्ट तर तिच्या अंग-वळणींच पडले होते, म्हणून राबणुकीचं तिला कांहीच वाटत नसे. बघावं तेव्हा ती कांहीना कांही काम करत असायची. शेजारपाजारणी फावल्या वेळीं बसा-यला म्हणून येत. आणि त्यांच्याबरोबर घटका दोन घटका गोष्टी बोलत बसण्यांत आनंदच वाटायचा, पण अशा गोष्टी बोलत असतांनाहि वारूताईचे हात रिकामे नसायचे. कांही निवडाटिपायला घेऊन बसायची किंवा तिचं शिवणं विणणं चालूं असायचं. बायका म्हणायच्या ' स्वस्थ बसून चार गोष्टी बोला की! ' तर ती म्हणायची ' गोष्टी बोलायला हात का लागतात? माझे हात कामांत असले तरी तोंड मोकळं आहे गोष्टी बोलायला. तुमच्यापेक्षा मीच जास्त बोलतें आहे. '

वारूताईच्या या कामसू वृत्तीमुळं आमचं " प्रपंच वस्तु भांडार " किती-तरी जोरावलं. नुसत्या खाद्यपदार्थांऐवजी लोकरीच्या वस्तु, बाळबाळंतिणींना लागणारीं घरगुती औषधं, दुपटीं, अंगडीं, कुंच्या अशा वस्तु आम्ही तयार करून देऊं लागलों. त्यांनाहि चांगल्या मागण्या यायला लागल्या.

मला आणि शेजारपाजरणींना आवडणारा आणखी एक गुण वारूताईच्या अंगीं होता. तो म्हणजे तिचा गोड आवाज आणि पाठांतर. तिला जुनीं नवीं

कितीतरी गाणीं येत होतीं. आणि ती गाणीं म्हणूं लागली की किती घाई-गर्दीत असलं तरी ऐकत बसावंसं वाटे. बायका बसायला म्हणून येत असल्या, तरी त्यांची खरी इच्छा वारूताईनं गाणं म्हणावं हीच असे. विश्वासाला तर तिनं गाण्याचं व्यसनंच लावलं होतं. तिच्या कुशींत शिरून तिचं गाणं ऐकत झोपायचा त्याचा नित्यक्रम होऊन बसला. एकादा दिवस तिचं काम उरकायला दहा अकरा होत, तर तोंपर्यंत तो जागत बसे. मावशी मोकळी होईपर्यंत तो झोपायचं नांव काढूं देईनासा झाला. मी जवळ घेतलं, थोपटलं, तरी त्याचा डोळा म्हणून लागायचा नाही !

वारूताईचा गाडा मार्गाला लागला. एक गांजलेली बहीण सुखी झाली याचं मला मोठं समाधान वाटलं. तरी अशाच एका हतभागी मुलीची मला वरच्चेवर आठवण होई आणि तिनं माझं मन कासावीस होई. ती हतभागी मुलगी म्हणजे गौरी. संसारसुखाच्या वाढलेल्या ताटापुढं ती बसली पण घास तोंडांत घालायच्या आधीच दुर्दैवानं तें ताट ओढून नेलं ! काय करील आता ती ? विद्या, गुण, रूप सगळं कांही आहे. चांगल्या माणसाचं चांगलं होतं म्हणतात, मग कां अशी वाताहत झाली पोरीची ? तिला सुखी करण्यासाठी मला कांहीच का करतां येणार नाही ?

या विचारांनी माझं मन अस्वस्थ होऊं लागलं. आणि गौरीची पहिल्यांदा माहिती कळली तेव्हा जो एक विचार माझ्या मनांत चमकून गेला होता, तो बळावायला लागला. गौरीची आणि रावजींची जोडी कशी सुंदर दिसेल ? दोन अनुरूप माणसं एकत्र येतील. सुखाचा संसार करतील. करावाच आपण प्रयत्न.

प्रयत्न करायचा निश्चय होई, पण तो कसा करायचा हें मात्र मला सुचत नव्हतं. गौरीची आणि रावजींची भेट करून देणं फारसं कठीण नव्हतं. आणि असा जोडीदार मिळत असतांना गौरी त्याला झिडकारील हेंहि मला शक्य वाटत नव्हतं. पण रावजीच तिचा स्वीकार करायला कसे सिद्ध होतील ही गोष्ट मला कठीण—जवळ जवळ अशक्य—वाटत होती. या विषयावर त्यांचं माझं अनेकदा बोलणं झालं होतं आणि माझ्या आर्जवांचा, रुसव्या फुगव्याचा, उपाशी रहाण्याचा उपयोग झाला नव्हता.

त्यांचं एकच म्हणणं, " माझी काळजी करण्यापेक्षा तूं आपली काळजी घे.

स्वतःला क्षुद्र समजण्याचा विकार तुझ्या मनाला जडला आहे तो काढून टाक. माणसाचं मोल त्याच्या रूपावर किंवा त्यानं मिळविलेल्या पदव्यावर नसतं. त्याच्या अंतर्यामीं माणुसकी ज्या प्रमाणांत असेल, त्यावर त्याचा चांगलेवाईट-पणा मोजायचा असतो. माणुसकीच्या मोजमापांत तूं अप्सरेइतकीच सुंदर आणि पदवीवालीपेक्षा विदुषी ठरशील. तुझ्यांत मला कसलंहि वैगुण्य दिसत नाही. तुला जो कमीपणा वाटतो तोच निसर्गानं माझ्या अंगीं चिटकविला असता, आणि माझ्या ठिकाणीं तुझ्या दृष्टीनं असणारं वैभव तुला लाभलं असतं, तर तूं मला झिडकारलं असतंस काय ?"

रावजींना बोलण्यांत अडविणं महाकठीण कर्म आहे. माझ्यासारख्या अडाणी बायकोचं राहूं दे, पण त्यांच्या बरोबरीनं शिकलेल्या माणसांनीहि वादविवादांत त्यांना शरणचिठ्ठी दिलेली मीं पाहिली होती. त्यांचे विचार पक्के आणि विचारा-प्रमाणं आचरण करण्याचा खंबीरपणाहि त्यांच्या अंगीं असल्याचा प्रत्यय मला आलेला होता. अस्पृश्यता ही माणसांच्या खुळेपणामुळं बोकाळली आहे, माण-साला माणसाचा विटाळ होऊंच शकत नाहीं हें आपलं म्हणणं रावजींनी हरि-जनाच्या मुलाला घरीं ठेवून घेऊन आचरून दाखविलं होतं. त्यापायी त्यांना भाऊबंदांचा आणि गांवकऱ्यांचा थोडाथोडका छळ सोसावा लागला नाही. पण त्यांनी पुढं टाकलेलं पाऊल मागं घेतलं नाही. रावजींच्या या खंबीरपणाचं मला इतर बाबतींत कौतुक वाटत असलं, तरी आपल्या जीवितांतला उणेपणाहि त्यांनी हट्टानं सहन करीत राहावं हें मला पटत नव्हतं. त्यांच्या डोक्यांतलं हें वेड झटकून टाकणं सरळ मार्गानं शक्य नसलं तर थोडीफार लबाडी करायलाहि हरकत नाही, असं मला वाटूं लागलं. रावजी सुखी झाले पाहिजेत, त्यांचं जीवन सुखमय झाल्याखेरीज त्यांच्या विद्वत्तेचा, त्यांच्या कर्तृ-त्वाचा प्रकाश पडणार नाही असं मला वाटत होतं. त्यांच्या गुणांची कुचंबणा दूर करून त्यांचा विकास करण्यासाठी मी थोडीशी लबाडी केली तर तें पाप न ठरतां पुण्यच ठरेल, असं माझ्या मनानं मला सांगितलं, आणि मी त्यांना पुढील प्रमाणं पत्र लिहिलं——

मी लिहिलेलं पत्र त्यांना खरं वाटावं याबद्दल मला खबरदारी घ्यायला हवी होती. मी घरून निघतांना रावजींनी कॉलेजांत असतांना मला लिहिलेली

पत्रं मी बरोबर आणलीं होतीं. तीं पत्रं म्हणजे माझ्या आनंदाचा ठेवा. एकटे-पणीं त्या पत्रांचं वाचन म्हणजे माझा ब्रह्मानंद. आज इतके दिवस झाले तरी आणि मी त्यांचीं इतकीं पारायणं केलीं तरी त्यांतला ताजेपणा आणि गोडवा तिळभरसुद्धा कमी झाल्यासारखं वाटत नाही. बापू ज्ञानेश्वरी वाचतात. ते आक्कांना सांगतात, ' प्रत्येक पारायणाला नवा आनंद द्यायचं सामर्थ्य ज्ञानेश्व-रींत आहे. ' रावजींचीं पत्रं हीं मला बापूंच्या ज्ञानेश्वरीसारखींच वाटतात. माझ्या या भाबड्या भाविकपणाला तुम्ही हंसाल पण मला त्याचं कांही वाटा-यचं नाही.

या माझ्या ठेव्यांतल्या एक दोन पत्रांचा लोभ मला या वेळीं सोडावा लागला. माझ्या पत्रांवर रावजींचा विश्वास बसण्यासाठी हाच एक मार्ग मला दिसला. मी पत्र तयार केलं—

काशी

अनेक आशीर्वाद. आमच्या बरबर यात्रेला आलेल्या रुखमीणबाईला वाखा झाला. आणि आम्ही आमच्याकडनं पुष्कळ इलाज केले तरी फळ आलं नाही. रुखमीणबाई परवा शीवरात्रीला आणि प्रदोशाचे वेळीं देवाच्या घरीं गेली. काशी क्षेत्रांत मरण येणं आणि गंगेत हाडं पडणं हें मोठं भाग्य रुखमीणबाईला लाभलं. तुमचा पत्ता मरतांना तिनं सांगितला आणि हे दोन कागद तुमच्याकडं धाडायला सांगितलं म्हणून पाठविले आहेत. योगा-योगानं आमची तिची गांठ पडली पण तिची सोबत फार वेळ लाभली नाही. तिच्यासारखी प्रेमळ आणीक आमा म्हाताऱ्याकोताऱ्यांना संभाळून नेणारी सोबतीण आमाला मिळाली होती पण देवाला तें बघवलं नाही. ती तुमची कोण हें बरीक तिनें सांगितलं नाही पण बहीण आसेल. कारण तुमचं लगीन झालेलं बघून मग डोळे मिटले आसते तर बरं झालं असतं असं ती मरायच्या आधी म्हणत होती. तुमाला तिच्या मरणाबद्दल दुःख होईल पण या नेमानेमाच्या गोष्टी. माणसाच्या हातीं काय आहे ? मनाची समजूत घालून घेतली पाहिजे.

गंगाबाई

या पत्रावर मी दोन तीन दिवसांमागली तारीख घातली. भाषा आणि अक्षर गंगाबाईचं दिसावं अशी खबरदारी घेतली आणि पोष्टाच्या छापावरून तें कुठून टाकलं हें उमगूं नये म्हणून मी तें स्टेशनवर जाऊन मेल गाडीच्या डब्याच्या टपालपेटींत टाकलं.

माझ्याकडून मी प्रयत्न केला. त्याला फळ येतं कीं तो निष्फळ ठरतो हें मला पहावयाचं होतं. पण त्या वेळीं तरी माझं मन खूप खूप हलकं झालं हें मात्र खरं.

आता दुसरा एक प्रयत्न असाच नजरेआड राहून मला करायचा होता. गौरीची गोष्ट मागं सांगितलीच आहे. ती रावजींना उत्तम जोडीदारीण होईल, असं माझ्या मनानं घेतलं होतं. आणि तीं दोघं एकमेकांना दिसतील, एकत्र येतील, असं कांहीतरी मला करायचं होतं. काय करायचं हें मात्र मला सुचत नव्हतं.

कांहीतरी करायचं म्हणून मी गौरी ज्या अनाथ बालिकाश्रमाच्या आश्रयास गेली होती, तिथल्या व्यवस्थापकांच्या नांवानं एक पत्र टाकलं. त्यांत गौरी-बद्दलची अपघातानंतरची परिस्थिति काय आहे ती कळल्यास समाधान वाटेल, अशी विनंति केली. हीं चौकशी करण्यांत माझा कसलाहि विशेष असा उद्देश नाही, तिचा क्षेमसमाचार कळावा एवढा एकच उद्देश आहे असं मी लिहिलं. आठवड्यानं या पत्राचं उत्तरहि आलं. त्या उत्तरानं माझ्या आशेवर विरजण पडल्यासारखं झालं. व्यवस्थापकांनी लिहिलेल्या पत्राचा आशय असा होता-गौरीवर ओढवलेल्या आपत्तीनं तिच्या मनावर बसलेला धक्का फारच जबरदस्त आहे. ती अतिशय उदास आणि बधिरल्यासारखी झाली आहे. आश्रमानं तिला लहानाची मोठी केल्यामुळं तिची काळजी पुढंहि घेण्याची आश्रमाची सिद्धता आहे. तिच्यासाठी वैद्यकीय इलाज सर्व प्रकारचे केले, पण डॉक्टरांच्या मतें तिला कसलाहि शारीरिक विकार नसून तिच्या मनांत उत्साह निर्माण झाल्यावर ती आपोआप सुधारेल. आपल्या आपत्तीचा तिला विसर पडेल आणि दुसऱ्या गोष्टींत तिचं मन गुंतून राहील अशी कांहीतरी योजना करणं अवश्य होतं. आश्रमाच्या आश्रयदात्या श्रीमती हरकुंवर यांना गौरीची हकिकत कळल्यावर त्यांनी तिला आपल्याकडं नेलं आहे. हरद्वारकडं त्यांची खूप मोठी

इस्टेट आहे. आणि अनेक प्रकारच्या सार्वजनिक कार्यांत त्या पुढाकार घेतात. गौरीला अशा एकाद्या कार्यांत गुंतवून तिचं मन ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न त्या करणार आहेत. हरकुंवरबाई अत्यंत प्रेमळ आहेत आणि माणसाचं मन ओळखून त्याला रुचेल अशा कार्यासाठी त्याचा उपयोग करून घेण्याची हातोटी त्यांना आहे. त्यामुळं गौरी त्यांच्या आश्रयाला गेली हें चांगलंच झालं असं समाधान वाटतं. नुकत्याच आलेल्या त्यांच्या पत्रांत गौरीचा क्षेमसमाचार आहे आणि तिची मनोवृत्ति हळूहळू निवळूं लागल्याचंहि त्यांनी लिहिलं आहे. हरकुंवरबाई या चारसहा महिन्यांत परदेशच्या सफरीवर जाणार असून गौरीची सुधारणा समाधानकारक झाल्यास तिला आपली सोबतीण म्हणून नेण्याचा त्यांचा इरादाहि त्यांनी कळविला आहे. तूर्ततरी गौरीबद्दलची चिंता दूर झाली आहे.

रावजीगौरींना एकत्र आणण्याची माझी आशा या उत्तरानं दुरावली आणि माझी थोडी निराशा झाली. तरी गौरीला एक उत्तम आश्रयदात्री लाभली याचं मला समाधान वाटलं. कुणीकडून तरी तिचा जन्म सुखाचा व्हावा असं मला वाटत होतं आणि आपण योजण्यापेक्षा निराळ्या प्रकारानं तिचं अधिक कल्याण झालं तर तें उत्तमच, अशी मी मनाची समजूत घालून गौरीचा विषय मनांतून बाजूला सारला.

पण रावजींना पत्र लिहिण्याचा जो खटाटोप मी केला त्याचं काय? हा प्रश्न माझ्या मनांत अधिकाधिक उचल खाऊं लागला. आता तरी ते अनुरूप जोडीदारीण मिळवून सुखी होण्याचा प्रयत्न करतील का? की त्यांची संन्यस्त वृत्तीच बळावेल? योग्य अशी पत्नी त्यांना मिळणं सहज शक्य आहे आणि तशी कोणी आली तरी तिचा स्वीकार करण्याची उत्सुकता त्यांनी दाखविलीच नाही तर? असे एक ना अनेक प्रश्न माझ्या मनांत धुडगूस माजवूं लागले. विचारांच्या भोवऱ्यांत गिरक्या घेऊन मन थकलं की तें दैवावर भिस्त ठेवून मोकळं व्हायचा प्रयत्न करतं. माझं तरी तसं झालं. योगायोग असेल त्याप्रमाणं गोष्टी घडतात, आपल्या हातून होईल तेवढं आपण केलं आहे, पुढं काय घडेल तें पहायचं एवढंच आपल्याकडं आहे, अशी मनाची समजूत घालून मी माझ्या कामांत अधिकाधिक गुंतून राहायचा प्रयत्न करूं लागलें.

आशा विश्वासची आई आणि प्रपंचवस्तुभांडाराची व्यवस्थापक या दोन जबाबदाऱ्या मला गुंतवून ठेवायला पुरेशा होत्या. वारूताई आल्यापासून माझी शबणूक कमी झाली तशी वाढलीहि. कारण इतके दिवस खाद्यपदार्थांचा पुरवठा करणं एवढंच काम होतं, त्यांत आंता शोभेच्या वस्तूंची आणि लोकरीच्या वस्तूंची भर पडूं लागली. वारूताई या गोष्टी बनविण्यांत कुशल असल्यामुळं हीं कामं आम्हांला येऊन चिकटलीं. या कामामुळं आमचा वस्तुसंग्रह महिला वर्गांत लोकप्रिय झाला. त्याचा खूप बोलबाला होऊं लागला.

पण थोरामोठ्यांच्या बायकांत जशा आमच्या चाहत्या वाढूं लागल्या, तसाच आमचा हेवादावाहि मूळ धरूं लागला, असं हळूंहळूं आम्हांला दिसून येऊं लागलं ! शिकल्या सवरलेल्या आणि सर्व बाजूंनी संपन्न असलेल्या बायकांचं मन प्रतिष्ठेसाठी किती हपापलेलं असतं, त्यांच्या आपापसांतल्या मत्सराची झळ इतर बायकांना कशी भोवते, याचं प्रत्यंतर आम्हांला आलं. संक्रांतीच्या सणाचीच गोष्ट सांगतें म्हणजे समजेल तुम्हांला मी काय म्हणतें तें.

नंदनगांव भगिनी मंडळानं संक्रांतीनिमित्त हलव्याचं प्रदर्शन भरवण्याचं ठरविलं. स्थानिक बायकांप्रमाणं परगांवच्या स्त्रियांनीहि हलवा आणि हलव्याचे पदार्थ पाठवावे अशा जाहिराती दिल्या त्याच वेळीं सराफीणबाईंनी आपल्या नव्या जावयाला संक्रांतीचा सण करायचं ठरवलं आणि त्यासाठी परोपरीचा हलवा, हलव्याचा पांच पदरी हार, हलव्याची पोंची, अंगठ्या, असले कांही जिन्नस बनवून द्यायला सांगितले. वारूताईला सराफीणबाईसाठी करायचेच आहेत जिन्नस, तर त्यांचा आणखी एकेक संच करून तो प्रदर्शनांत कां ठेवूं नये ? तिलाहि ती कल्पना आवडली आणि आम्ही दोघी कामाला लागलों.

पंधरा दिवसांचाच अवधि होता आणि तेवढ्या वेळांत तो खटाटोप आवरावयाचा म्हणजे दुसरीं कामं अजीबात बाजूला ठेवण्यावांचून गत्यंतर नव्हतं. आणि म्हणूनच मामलेदारीणबाईंनी यावेळीं मागितलेले लोकरीचे दोन स्वेटर करून द्यायला होणार नाही असं आम्हांला सांगावं लागलं. दुसरं कसलं कारण सांगितलं असतं तरी त्यांना कांही वाटलं नसतं. पण सराफीणबाईंच्या हलव्यापुढं आम्हांला त्यांच्या मागणीची मातब्बरी वाटली नाहीं, असा त्यांनी आपला समज करून घेतला. सराफ हे पैशानं सावकार असले तरी आपण

मामलेदार म्हणजे अधिकारानं सरकार आहों असा त्यांचा तोरा. या आपल्या मोठेपणाचा अपमान आमच्यासारख्या मोलमजुरी करणाऱ्या बायांनी करावा, याची तर त्यांना चीड आलीच, पण ज्यांच्या जोरावर आम्ही हा मस्तवालपणा केला, त्या सराफीणबाईबद्दलहि त्या मनांतून जळफळूं लागल्या. त्यांची ही चीड आणि जळजळ एकदम उमगली नाही. पण वेळ येतांच त्यांनी आम्हांला हात दाखविला. त्यांत त्यांचेच दांत पडले ही गोष्ट वेगळी. मामलेदारीणबाईंचा आमच्यावरला रोष भडकायला आणखी एक निमित्त झालं.

हलव्याच्या प्रदर्शनांत शेंकडों जणींनी आपले जिन्नस ठेवले होते. आणि परीक्षक मंडळांत मामलेदारीणबाई होत्या. त्यांच्यापुढं नेहमीं गोंडा घोळणाऱ्या फडणीशीणबाईंनीहि आपला हलवा प्रदर्शनांत मांडला होता. त्यांचा नंबर लावून त्यांच्या तोंडपुजेपणाचं चीज करावं ही मामलेदारीणबाईंची इच्छा. त्याचप्रमाणं आमच्या जिनसांना रद्दी ठरवायचं हीहि त्यांची धडपड. आमच्या वस्तूंत विशेष असं कांही नाही, त्यांत नुसता खटाटोप आहे, कौशल्य नाही, असे शेरे त्यांनी देऊन पाहिले, पण बाकीच्या परीक्षकांनी त्याला मान तुकवली नाही, तेव्हा त्यांनी दुसरी सबब पुढे केली. ती म्हणजे हें प्रदर्शन संसारी बायकांच्या हस्त-कौशल्याला उत्तेजन देण्यासाठी आहे, मोलानं काम करणाऱ्या धंदेवाईकांसाठीं नाही, म्हणून आमच्या वस्तू बऱ्या असल्या तरी त्यांना वाटलं तर नुसतं प्रशंसापत्र द्यावं, पण बक्षीस फडणिशीण आणि नाडकर्णीबाईंना द्यावं ( नाड-कर्णीबाई या मामलेदारीणबाईंच्या नात्यांतल्या होत्या ) असं त्यांनीं सांगितलं. पण परीक्षक मंडळानं त्यांचं हें मतहि धुडकावलं आणि पहिलं बक्षीस आम्हाला, दुसरं जाधवीणबाईंना, व तिसरं मणिबेन शहांना दिलं. आमचा विजय झाला. मामलेदारीणबाईंचा पाडाव झाला.

पण या पाडावामुळं दुखवलेल्या मामलेदारीणबाईंनी संधि साधून आम्हांला डंख मारलाच. असल्या गोष्टी कोण कशाला मनांत ठेवतंय, ज्या वेळचं त्या वेळेपुरतं, अशी आपली आमची भाबडी समजूत. आणि जेव्हा प्रान्तसाहेबांना द्यायच्या पार्टीसाठी फराळाचं सामान करून देण्यासाठी आम्हाला त्यांचं बोलावणं आलं, तेव्हा तर आम्हांला वाटलं की मामलेदारीणबाईंचा आमच्या-

वर लोभ आहे. आम्ही दोघीहि त्यांच्या बंगल्यावर गेलों आणि त्यांनीं सांगितलेले चार जिन्नस करून देऊन परत आलों.

पण संध्याकाळीं फिरून त्यांचा शिपाई बोलवायला आला. मी आक्काकडं गेलें असल्यामुळं वारूताई एकटीच गेली. ती दिसतांच मामलेदारीणबाईचा तोफखाना सुरू झाला. स्वयंपाकघराच्या फडताळांतलं चांदीचं फुलपात्र चोरल्याचा आळ त्यांनी आमच्यावर घातला होता. आणि बऱ्या बोलानं आम्ही तें परत आणून दिलं नाही, तर आम्हांला कोतवालींत गुदरण्याची धमकीहि दिली त्यांनी!

वारूताईनं परोपरीनं सांगितलं पण मामलेदारीणबाईंनी आपलं म्हणणं सोडलं नाही उलट आमच्यासारख्या पोटभरू भिकारड्या बायांचीं हीं चोरटीं लक्षणं त्यांच्या नित्याच्या अनुभवाचीच असल्याचा त्यांनी निर्वाळा दिला आणि वरून साळसूदपणा दाखविणाऱ्या आमच्यासारख्या बाया आंतून पक्क्या बेरड असतात, असा ताशेरा झाडला. 'आम्हांला तुमच्या फुलपात्राचं कांही माहीत नाही, तुम्हाला काय करायचं असेल तें करून घ्या' असं सांगून वारूताई परत आली असली, तरी मनांतून ती इतकी घाबरली होती कीं मला पाहतांच 'आतां कसं करायचं हो ताई?' असं म्हणून मुसमुसून रडायला लागली!

तिच्या तोंडून सर्व हकीकत ऐकल्यावर माझ्या मनांतसुद्धा धस्स झालं. पण हातपाय गाळून बसल्यास वारुताई अधीकच घाबरेल म्हणून मी उसनं अवसान आणून म्हटलं, 'एवढंच ना? अग कर नाही त्याला डर कशाला? खोट्याच्या कपाळीं आपोआप सोटा बसेल. कांही काळजी करूं नको तूं.'

मी या म्हणी म्हणून मोकळी झालें, तरी असल्या म्हणींच्या अगदी उलटहि अनुभव जगांत येतात हें मला दिसत होतं. पावलोपावलीं लबाड्या करून मजेत राहिलेलीं माणसं मला दिसत होतीं आणि अगदी निरपराध माणसांनाहि खोड्यांत अडकण्याची पाळी आलेली मी पाहिली होती. म्हणून माझ्या मनांत या आलेल्या तोहमतीची धास्ती जास्त जास्तच बळावायला लागली. या लफड्यांतून सुटायचं कसं याचा मी विचार करूं लागलें.

मामलेदारीणबाईंच्या फडताळांत फुलपात्र होतंच कशावरून? आणि असलं तरी तें आम्ही चोरलं असं त्या कसं सिद्ध करणार? त्यांनी धाक घातल्याप्रमाणं

कोतवालीचे शिपाई येऊन आमच्या बिऱ्हाडाची त्यांनी झडती घेतली तरी त्यांना आमच्यापाशी नाहीच आहे तें फुलपात्र कसं सापडणार? अशा प्रकारानं मी माझी भीति दूर सारण्याचा प्रयत्न केला, पण ती दूर मात्र जाईना. उलट आम्ही कपाटापाशी वावरत होतों अशी साक्ष द्यायला नाडकर्णीण-बाई व फडणीशीणबाई आहेत. आमच्या घरीं झडतींत चोरीचा जिन्नस सांपडला नाही, तरी तो कुठंतरी लपवून ठेवला असेल असा संशय त्यांना घेतां येईलच. मग आतां यांतून पार पडायचं कसं? संकटं जशीं अवचित येतात तशीं त्यांतून सुटकाहि अवचित होते असा प्रकार कधी कधी होतो. तशी आताहि झाली. मामलेदारीणबाईंची ही कारवाई आक्का बापूंना आणि बाळाभाऊंना सांगून यावर इलाज काय करायचा, तें विचारून घ्यावं म्हणून मी बाहेर पडलें. दिवेलागणी होऊन गेली होती. अंधार पडला होता. मागून पुढून कोण चाललं आहे हें नीटसं दिसत नव्हतं. माझ्यापुढं दोघे गृहस्थ बोलत चालले होते. माझ्या कानांवर त्यांचे शब्द पडले—

" काय कामत, कुठं चालला लगबगीनं ? "

" नाडकर्ण्यांकडं चाललोंय. "

" आता रे कशासाठी ? आणि नाडकर्णी आले का मुंबईहून ? "

" आठ दिवस अवकाश आहे त्यांना यायला. नाडकर्णीवैनींचा जिन्नस पोंचवाला चाललोंय मी. "

" कसला जिन्नस आणला आहेस वैनींकडून ? "

" हें जुळ्याचं दुखणं आहे आबा. वैनीनं वरेरकराच्या मुलाला द्यायसाठी चांदीचं फुलपात्र आणलंय. आमच्या हिला त्याचसाठी अगदीं तस्संच फुलपात्र हवंय. म्हणून तो नमुना घेऊन गेलों होतों सराफांच्या दुकानीं. नवं फुलपात्र आणून घरांत ठेवलं आणि हें परत नेऊन देतोंय वैनीला. "

या संवादासरशी माझ्या मनांत शंका चमकली. नाडकर्णीबाई आणि चांदीचं फुलपात्र यांचा आपल्यावर येऊं पहाणाऱ्या संकटाशीं कांहीतरी संबंध आहे असा मला संशय आला. माझ्या मनांत एकदा एखादी गोष्ट आली की तिची कड कशी लावायची यावाचून माझ्या मनांत विचारच येईनासा होतो. काय

गुण आहे माझ्या मनाचा कोणास ठाऊक ! आताहि त्या बाईचं फुलपात्र पाहून आपल्या शंकेचं समाधान करून घ्यायचं असं माझ्या मनानं घेतलं. मी आक्कांच्या आणि बाळाभाऊंच्या घरची दिशा बदलून रेगेबाईच्याकडं मोर्चा वळविला.

रेग्यांचा आणि नाडकर्ण्यांचा शेजार आणि दाट परिचय असल्याचं माहीत होतं आणि रेगेबाईंची ओळख मलाहि चांगली झालेली होती. त्यांना माझ्या मनांतल्या संशयाचा वासहि न लागूं न देतां मी मुंजीच्या आहेराच्या गोष्टी सुरू केल्या आणि सहज विचारल्यासारखं विचारलं "तुम्हांलाहि आमंत्रण असेल वरेरकरांचं, काय द्यायचं ठरवलं आहे मुलाला ?"

"ही मोठी अवघड गोष्ट होऊन बसली आहे गुजाताई. आपल्या शक्तीप्रमाणं कांही जिन्नस घ्यावा तर तो कांही डोळ्यांत भरण्यासारखा येत नाही. त्यापेक्षा दहा रुपयांची नोटच हातांत ठेवणार आहे मी मुलाच्या."

"मग तुमच्या नाडकर्णीबाईंनीं फुलपात्र आणवलंय म्हणे आजे, तसलं आणवा की तुम्ही. पडतील फार तर रुपया दोन रुपये जास्त. पण रुपयापेक्षा जिन्नस बरा दिसायला."

रेगेबाईंना माझा विचार पटला आणि माझ्या अपेक्षेप्रमाणं त्यांनी पाहण्यासाठी फुलपात्र मागून आणायला आपल्या मुलीला पाठविलं. कुसुमनं आणलेलं फुलपात्र मीहि हातांत घेऊन खालून वरून पाहिलं, आणि मला पाहिजे होतं तें त्यांत मिळालं. फुलपात्राच्या तळावर A. S. S. अशी इंग्रजी अक्षरं ठोकलेलीं होतीं. मामलेदारांचं नांव आनंदराव शिवाजी आणि आडनांव सावईकर असल्याचं मला माहीत होतं आणि हीं अक्षरं त्या नांवाशीं जुळत होतीं. आम्ही फराळाचं करीत असतांना नाडकर्णीबाई फडताळांत वावरून गेल्याचं मला आठवलं आणि त्यांनी हा खेळ करून आमच्यावर बालंट आणलं अशी माझी खात्री झाली.

मग मी स्वस्थ बसलें नाही. मी बापूंना जाऊन सर्व हकीकत सांगितली. बापूंना माझं म्हणणं पटलं आणि ते कोटटोपी चढवून म्हणाले "चल गुजाताई."

"कुठं जायचं ?" मी विचारलं.

"चल म्हणतोंय तर चल." एवढंच त्यांनी उत्तर दिलं. मी मुकाट्यानं

त्यांच्या बरोबर निघालें. बापू आणि मी फौजदारांच्या घरीं गेलों. बापूंचं स्वागत फौजदारांनी अगत्यपूर्वक केलं त्यावरून दोघांचा चांगला स्नेह असल्याचं दिसून आलं. " कां आलां आहां बापू अशा वेळीं ? " फौजदारांनी विचारलं.

" चोर पकडून आणलाय तुमचे श्रम वाचविण्यासाठीं " बापूंनी उत्तर दिलं आणि झालेला सर्व प्रकार त्यांना सांगितला.

" तरी म्हटलं मामलेदारांच्या घरचं मला कां बोलावणं आलंय ! " फौजदार म्हणाले. आणि या अधिकाऱ्यांच्या घरचा कारभार कसा गाफील-पणाचा असतो, त्यांच्या बायका स्वतःच्या आचरटपणानं गरीब माणसांच्या गळ्याला कशी तात लावतात इत्यादि गोष्टी आपल्या पोलिशी शब्दांत सांगि-तल्या. आणि बापूंना आश्वासन दिलं--

" बापू, बाईंनी माझं काम सगळं करून टाकलंय. माझ्याकडं खरोखर हें प्रकरण आलंच तर आतां मी पाहून घेईन. तुम्ही निर्धास्त राहा. "

आम्ही घरीं आलों. माझ्या मनांतली भीति जाऊन आतां पुढं काय काय गंमत होते बद्दलची उत्सुकता वाढली.

दुसरे दिवशीं फौजदार मामलेदारांकडं गेले. मामलेदारीणबाईंनी जितक्या भडकपणानं आमचा चोरटेपणा सांगतां येईल तेवढा सांगितला. फौजदारांनी तो गंभीरपणानं ऐकून घेतला आणि ' तपास करतों ' असं आश्वासन देऊन त्यांचा निरोप घेतला.

" बरोबर अकरा वाजतां तुम्ही दोघी मामलेदारांच्या घरीं या. " असा त्यांचा आम्हांला निरोप आला. आम्ही बंगल्याच्या दारांत यायला आणि सायकलवरून फौजदार यायला एकच गांठ पडली. आम्ही मिळूनच बंगल्यांत गेलों. आम्हां तिघांना एकत्र आलेलं पाहून मामलेदारीणबाईंचा चेहरा हर्षानं फुलला. आम्हांला चोर म्हणून पकडून आणलं आहे अशी त्यांची समजूत.

" काय फौजदारसाहेब, लागला का कांही तपास ? "

" लागला तर. मुद्देमालसुद्धा मिळाला आहे. पण आरोपीवर केस भरा-यची की नाही हें रावसाहेबांना विचारायला आलों आहे. आहेत ना साहेब घरीं ? "

" आहेत की, आत्ता यायचं होईल जेवण उरकून ! "

फौजदारांनीं खिशांतून फुलपात्र काढून मामलेदारीणबाईंच्या हातीं दिलं आणि विचारलं, "आपलं चोरीला गेलेलं फुलपात्र हेंच का तें पहा बरं?"

बाईंनी भांडं खालूनवरून निरखून पाहून म्हटलं, "हेंच. शंकाच नाही त्याबद्दल. शाबास आहे हो तुमची! कशा चोऱ्या पकडतां तुम्ही! तुमचं तुम्हाला साधतं तें! पोलीसांच्या हुशारीबद्दल उगीचच शंका घेतात लोक."

"पण अशीं भांडीं हजारों असतील जगांत, हें भांडं आपलंच आहे याला पुरावा काय?" "हात्तिच्या! एवढंच ना? अहो, भांड्यावर नांव आहे ना आमचं. पाह्यलं नाहीत वाटतं? लोकांच्या भांड्यावर का घालूं आम्ही आमचं नांव? आणि हें फुलपात्र आम्हांला केव्हा कुणाकडून मिळालं हें सुद्धां सांगतें वाटलं तर. टिपरीचा तो चंदनमल पटेल आहे बघा, त्याचं कसलंस काम झालं दोन महिन्यामागं, तेव्हा त्यानं चांदीचं ताट पेढे भरून इकडं नजर केलं आणि नुसतं ताट देऊं नये म्हणून तांब्या भांडंहि दिलं दूध तूप भरून. तो तांब्या नी ताट सुद्धा आणून दाखवितें तुम्हाला पाहिजे तर."

बाईंना आपण भलतीच गोष्ट बोलत आहों याचंहि भान नव्हतं. पण हात पुसत बाहेर आलेल्या मामलेदारसाहेबांना सौभाग्यवतीचा तो अचरटपणा उमगला आणि तिला अधिक बोलूं न देतां ते म्हणाले, "काय मि. शेलार, तुम्ही इथं कसे या वेळीं? मला वाटलं तुम्ही चंदनवाडीला गेला असाल. तिथं दरवडा पडला असा सकाळीं रिपोर्ट आला आहे पाटलाचा."

"होय, माझ्याकडंहि वर्दी आलीय गुन्ह्याची आणि मीहि जाणारच आहे आता. जमादार पुढं गेलेत. हें हातचं काम पुरं करून जावं म्हणून मागं राहिलों आहे मी. आपल्या घरची चोरी म्हणजे खेड्यांतल्या दरोड्यापेक्षा महत्त्वाची—"

"आमच्या इथली चोरी? हें काय प्रकरण?" रावसाहेबांनी आश्चर्यानं विचारलं. मामलेदारीणबाईंनी चोरी केव्हा कशाची झाली, हें सांगून आमच्याकडं पाहून म्हटलं, "मेलं घरांत कुणाला पाऊल टाकूं द्यायचीसुद्धा सोय नाही राहिली आता. कुलपं घालायचीं तरी किती आणि कुठं?"

"हें पहा बाईसाहेब, आपण आपल्या नाडकर्णीबाईंना आणतां कां बोलावून? म्हणजे या भानगडीचा एका मिनिटांत उलगडा होईल."

" जारे राघु, घेऊन ये नाडकर्णीबाईला. हो, फिर्यादीला साक्षीदार हवाच."
बाईंचा शिपाई रवाना झाला.

" कशाला ही यातायात चालविली आहे? तुमचा जिन्नस तुम्हाला मिळाला. तुमचा अव्यवस्थितपणा अंगाशीं आला नाही यांतच आनंद माना. वाटेल तो पदार्थ वाटेल तिथं ठेवून दिला, म्हणजे असं व्हायचंच. आता पुढं नका घोळ घालूं. हे खटले निष्कारण वेळ खातात आणि आरोपीइतकाच फिर्यादीचा वेळ जातो साक्षी नी पुरावे करतांना."

" पण चोर सांपडला असून त्याला तसंच सोडून द्यायचं—"

मामलेदारीणबाई आमच्याकडं कुत्सित दृष्टीनं पाहून म्हणाल्या. फौजदार-साहेब हंसले. मलाहि हंसू आलं पण मी तें दाबलं. वारूताईला यांतलं कांही ठाऊक नव्हतं. आपल्या नशीबानं हें काय वाढून ठेवलं आहे अशा भीतियुक्त अवस्थेंत ती होती. वर मान करून पहायचा धीर तिला होत नव्हता. मरण पुढं उभं राहिलं असतं तरी ती इतकी भेदरली असती की नाही कुणास ठाऊक! गरीब पण सालस माणूस बेअब्रूला मरणापेक्षा कसं भितं हें वारूताईच्या त्या वेळच्या चर्येवरून चांगलं दिसून येत होतं.

मामलेदारीणबाईंचं बोलावणं आल्यावर अर्ध्या जेवणावरून धांवत येणाऱ्या नाडकर्णीबाई आतातरी विलंब कशाला लावतील? बाईसाहेबांचं बोलावणं म्हणजे त्यांचा ब्रह्मानंद. त्यापुढं नवऱ्याचं किंवा मुलांचं भानहि त्यांना रहायचं नाहीं. ओघाला आलं म्हणून सांगतें, टाइफॉईड झालेल्या नवऱ्याला घरांत तळमळत टाकून त्या मामलेदारीणबाईंना गांधीलमाशी चावली असं कळतांच फुंकर घालायला धावून आल्या! ह्या त्यांच्या प्रेमळपणाचं कौतुक काल खुद्द मामलेदारीणबाईंनीच आमच्यापुढं केलं होतं.

पण या वेळीं नाडकर्णीबाई जितक्या उल्हासानं धावत आल्या, तितक्या आम्हांला अन् फौजदारांना पाहून त्या घाबरल्यासारख्या दिसल्या.

" या नाडकर्णीबाई, तुमचीच वाट पहातों आहों आम्ही. बघितलंत ना नाडकर्णीबाई माणसांची खोटीं लक्षणं! मेला विश्वास तरी कुणावर आणि कसा ठेवायचा? हे फौजदारसाहेब हुषार म्हणून त्यांनी काढली चोरी बाहेर. हें माझं फुलपात्र तुम्ही पाहिलंच आहे नी काल फडताळांतून तें अवचित गडप झालं

हें देखील तुम्हांला ठाऊक आहे. आता चोर आहे, मुद्देमाल आहे अन् साक्षीदार आहे. बघून घ्या फौजदारसाहेब तुमचं तुम्ही. "

" पण—पण—मी—" नाडकर्णीबाईंची बोबडी वळली होती. तिला काय बोलायचं आणि कसं बोलायचं याची उमका होत नव्हती. ती तसंच अडत अडखळत बोलूं लागली—"तुमच्या पायाची शप्पत बाईसाहेब मी-मी कांही चोरायचं म्हणून नेलं नाही हें फुलपात्र—"

" तुम्ही नेलं होतं हें ? " मामलेदारीणबाईंच्या चेहऱ्यांवरील आश्चर्य आणि फजिती पाहून मला हसूं आवरेना.

" आणि मी काल इतकी ओरडलें तर एका अक्षरानं बोललां नाही तुम्ही आपण घेतलंय फुलपात्र म्हणून ! "

आतां मामलेदारीणबाईंच्या स्वरांत रागाचीहि छटा दिसूं लागली. मला आतां राहवेना. मी म्हटलं " आतातरी धडा घ्या मामलेदारीणबाई. घरांतली मोलाची वस्तु आधी उघड्यावर टाकायची आणि ती नाहीशी झाल्यावर विचार न करतां गरीब गुरिबांवर चोरीचा आळ घालायचा हें योग्य नव्हे. गरीब माणसं झालीं तरी त्यांचं मन दरिद्री नसतं. मोलाची अब्रू असते त्यांच्याजवळ. पण तुमच्यासारखीं माणसं त्या अब्रूवर उठतात. आमचं नशीब म्हणून आमचे धिंडवडे झाले नाहीत. तुम्ही आमचा गळा कापायला सुरी उगारली होती. पण देव तारणारा असल्यावर माणसाचं कांही चालत नाहीं बाईसाहेब. तुमच्या जिनसांची चोरी झाली ती बाहेरच्या पोटभरू माणसांनी केली नसून गळ्यांत गळा घालणाऱ्या घरच्या माणसानंच केली हें पाहून ठेवा. चोरीचा आळ कुळंबीण कामाठ्यावर घ्यायची चालच असते श्रीमंतांची. पण घरांत राजरोस वावरणाऱ्या उंदीर घुशींची दादहि नसते—"

मला आणखीहि खूपखूप बोलून घ्यावंसं वाटत होतं. माझ्या मनाचा संताप उडाला होता, आणि त्यामुळं माझ्या तोंडून शब्दच निघेनासा झाला. मामलेदारसाहेबांना सारा प्रकार उमगला. ते म्हणाले " बाई, कुणाच्याहि चुकीमुळं का होईना, पण तुम्हांला त्रास झाला याबद्दल मी क्षमा मागतों तुमची. शेलारसाहेब, या दोघी मैत्रिणींना टांगा करून त्यांच्या बिऱ्हाडीं पोंचवा. फुकट त्रास झाला बिचाऱ्यांना आमच्या मूर्खपणामुळं. "

आम्ही विजयी होऊन घरीं आलों, पण आमचं समाधान एवढ्यावरच थांबा· यचं नव्हतं. संध्याकाळीं सराफांचा माणूस दोन फुलपात्रं घेऊन आमचा शोध करीत आला. आम्ही घरीं नव्हतों. आमच्या विजयाची हकीकत आक्काबापूंना सांगायला त्यांच्या घरीं गेलों होतों. आमच्या बोलण्याला भारी रंग चढला होता. मामलेदारिणबाईंची खाशी खोड मोडल्याबद्दल आक्कांना हर्ष झाला होता, आणि तिच्या दुष्टपणाची चीडहि आली होती. त्याच वेळीं सराफांच्या माणसानं तीं फुलपात्रं आणून बापूंच्यापुढं ठेवलीं व म्हटलं "मामलेदारसाहेबांच्या ऑर्डरीप्रमाणं यांच्यासाठी हीं भांडीं आणलीं आहेत."

"आम्हांला नकोत तीं· त्यांची त्यांना द्या नेऊन परत." मी म्हणालें.

"पण त्यांनातरी आता यांचा काय उपयोग? भांड्यावर तुम्हा दोघींचीं नांवं घातलीं आहेत आणि भांड्यांत त्यांची चिठ्ठी आहे ती पहा" सराफांचा माणूस म्हणाला. बापूंनी चिठ्ठी काढून वाचली· चिठ्ठींत मामलेदारांनीं आपल्या बायकोची चूक कबूल केली होती आणि तिच्याबद्दल क्षमा मागून आम्हांला झालेल्या त्रासाबद्दल अल्पस्वल्प भरपाई म्हणून ही भेट पाठविली होती. आम्हांला चांदीच्या भांड्यांचा लोभ वाटला म्हणून नव्हे, तर मोठ्या माणसाचा शब्द झिडकारणं उचीत नव्हे असं बापूंचं म्हणणं पडलं. म्हणून आम्ही तीं भांडीं ठेवून घेतलीं आणि मामलेदारसाहेबांना पोहचविण्यासाठी आभाराची चिठ्ठीहि मी लिहून दिली.

"शर्यत जिंकणाऱ्याला म्हणे आतांशा पेले मिळतात. तुम्ही सुद्धां ही शर्यतच जिंकली गुजाताई; आणि तीसुद्धा मामलेदारणीसारख्या पट्टीच्या भिडूचा पाडाव करून! अशा शर्यतींचे हे पेले काचेच्या कपाटांत ठेवा लोकांना दाखवायला."

आक्कांच्या या बोलण्यावर आम्ही सगळीं पोटभर हसलों. बायकाच बायकांच्या दावेदारिणी कशा होतात याचा हा मासला सांगितला. याबरोबरच पुरुषी छळाचाहि एक प्रकार सांगतें. बारूताई यायच्या आधीची गोष्ट आहे. मी आक्कापासून निघून वेगळं बिऱ्हाड केल्यावर पांचसहा महिन्यांतच हा प्रकार घडला. कामधंद्याच्या निमित्तानं मला गांवांत फिरावं लागे. आणि टवाळ

लोकांची टीकाहि माझ्या कानांवर पडे. किंवा माझ्या कानांवर पडावी अशा हेतूनं वात्रट मंडळी आपलीं मुक्ताफळं उच्चारीत असत. गांवांत कोणी नवं माणूस आलं कीं त्याची टिंगल करायची हा पुष्कळांचा स्वभावच बनून गेलेला असतो. अशा टिंगलखोर माणसाचा निषेध करण्याऐवजी त्याला गमत्या किंवा विनोदी म्हणून गांवकरी त्याला प्रोत्साहन देतात. अशा शेफारलेल्या टवाळांच्या तावडींतून मीतरी कशी सुटेन ? माझा काळा वर्ण, कुरूप चर्या, इत्यादींच्या निमित्तानं ' आवस ' ' इजाट ' अशा पदव्या टवाळ कंपूनं मला बहाल केल्या होत्या. आणि मला सडकेवर पाहून न दिसल्याचा बहाणा करीत ते जवळच्या माणसाला म्हणत, " उद्यां पौर्णिमा तर आजच आवस कशी आली रे ? " किंवा " अलीकडं गांवांत इजाटं फार फिरतात नाही रे ? " हे बाण मलाच मारले आहेत हें मी ओळखत असें. पण मला त्याबद्दल राग आला तरी एक प्रकारचा आनंदहि वाटत असे. कारण माझ्या कुरूपपणामुळं पुरुषी नजरेंत माझ्याविषयी तिटकारा निर्माण होतो आहे, त्यांत माझा सुरक्षितपणा आहे असं समाधान मला वाटत होतं. पण त्या बाजूनंहि मी सुरक्षित नाही असा मला अनुभव आला.

माझ्या प्रपंच–वस्तु–संग्रहांतून वेगवेगळे पदार्थ नेण्यासाठी पुष्कळ माणसं माझ्याकडं येत. बहुतेक बायकाच येत किंवा मुलांमुलींना पाठवून हवा असलेला पदार्थ मागून नेत. मात्र पेन्शन घेऊन हरि हरि म्हणत बसलेले अप्पा बोळके स्वतः येत. दर दोन दिवसांनी कधी पापड, तर कधी मेतकूट मागायला ते येत. आणि जिन्नस घेतल्यावर उठून जाण्याऐवजी घटका अर्धी घटका इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसत. आशा विश्वासाला खाऊ खेळणंहि कधी कधी आणून देत. म्हातारा प्रेमळ आहे असं मला वाटलं आणि तो भाबडया स्वभावाचाहि आहे अशी माझी समजूत झाली. आपली बायको अशक्त आहे आणि तिला असले पदार्थ घरच्या घरीं बनवायला होत नाही व कधीकाळीं बनविले तरी त्यांत माझ्याइतका स्वादिष्टपणा येत नाही, असं ते म्हणत. माझ्या सुगरणपणाची ही प्रशंसा मला गोड वाटायची. आणि अशा अनेक कारणांनी अप्पा मला भले गृहस्थ वाटले. ते आपल्याबद्दल इतकं अगत्य दाखवितात, तसंच अगत्य आपणहि त्यांना दाखवावं असं मला वाटूं लागलं

आणि एकादे वेळीं मी त्यांना चहाहि देऊं लागलें. माझ्या या अगत्यशीलतेमुळं अप्पांची माझ्या घरीं रोज खेप होऊं लागली.

माझ्या घरीं रोज यायला सांपडेल असा दुसरा एक उपाय आप्पांनी योजला. मी तयार करीत असें, त्या जिन्नसांसाठी लागणारा मालमसाला मला स्वतःला बाजारांतून आणावा लागे. आप्पांनी हें बाजाराचं काम करण्याची सिद्धता दाखविली. त्यांनी खरेदिलेले जिन्नस उत्तम प्रकारचे असत एवढंच नव्हे, तर पै पैशानं स्वस्तहि असत. त्यामुळं आप्पांची ही मदत मला मोलाची वाटली. बाप मुलीसाठी खपतो, तसंच आप्पा आपल्यासाठी खपतात, असं वाटून असा आस्थेवाईक साहाय्यकर्ता मला दिल्याबद्दल मी देवाचे आभार मानूं लागलें.

पण प्रेमळपणाचा पिसारा उभारून माझ्याभोंवती नाचणारा हा मोर नसून डोमकावळा आहे असा मला हळुहळू संशय येऊं लागला आणि मी दचकलें. त्यांच्या शब्दांत भलतीच भावना सूचित होऊं लागली, त्यांच्या येण्याजाण्यांत आणि घरांत वावरण्यांत लगट भासूं लागली. ‘ अहो ’ वरून ‘ अग ’ पर्यंत सलगीहि त्यांच्या बोलण्यांत आली. त्यांना दटावावं, फार काय माझ्या घरीं येत जाऊं नका अशी ताकीद दऊन मोकळं व्हावं असं मला वाटलं. पण त्याच वेळीं पुढच्या मरणाची भीतिहि मला वाटली. म्हाताऱ्याला दुखवलं तर तो आपल्याबद्दल भलभलत्या कंड्या पिकवील. त्याच्या म्हातारपणामुळं आणि देवभोळेपणामुळं त्यानं गांवांत भलेपणा मिळविला आहे आणि त्यानं कांही सांगितलं तरी लोकांना त्याचंच म्हणणं खरं वाटून आपल्याबद्दलचं लोकमत कलुषित होईल. आपण तरुण आहों, आणि कुरूप असल्यामुळं आपल्याकड पुरुष पाहात नाहीत, त्यामुळं माझ्या वासना वखवखलेल्या असणार, अन् त्यांच्या आहारीं जाऊन आपणच म्हाताऱ्या का होईना पण आप्पांसारख्या देवमाणसावरं बलात्कार केला असणार असं लोक म्हणूं लागले तर घ्या काय? या चिमट्यांतून युक्तीनंच निसटलं पाहिजे हें मी ओळखलं आणि अशी युक्ति शोधूं लागलें.

हत्ती पकडायला फसवे खड्डे करावे लागतात. खड्ड्याचं तोंड मोहक हिरवळीनं झाकायचं आणि त्या हिरवळीच्या लोभानं आलेल्या गजराजांना खड्ड्यांत घालायचं हेंच तंत्र आप्पावर करायला पाहिजे, असं मला समजून चुकलं.

बायकोच्या जातीला आजतरी पुरुष हत्तीसारखाच प्रबळ आणि जीवघेऊ प्राणी आहे आणि त्याला अशाच उपायानं जखडबंद करण्यावाचून गत्यंतर नाही. यांत कपट करावं लागलं तरी स्वतःच्या सुरक्षितपणासाठीच कपट करावं लागणार आहे. निरुपद्रवी माणसाला कपटानं गोत्यांत घालणं पाप असलं तरी उपद्रवी माणसाशीं कपट करण्यांत गैर कांहीच नाही. विंचू डसायला आल्यावर अहिंसाव्रत पाळणं आत्मघातकीच ठरतं. माझ्या मनाला धीर आला या विचारानं, आणि मी माझ्या उद्योगाला लागलें.

आप्पांच्या लघळपणाबद्दल मी तिटकारा दाखवला नाही. त्यांचा डाव माझ्या लक्षांतच आला नाही असा भोळेपणाचा आव मी आणूं लागलें! ' तुम्ही किती मायाळू आहांत! माझ्यासारखीला सगळीं माणसं हिडीसफिडीस करतात पण तुम्ही किती अगत्य दाखवितां ' असं त्यांचं मी कौतुक सुरू केलं. आणि नुसत्या चहावर पाहुणचार न थांबवितां शिराहि दिला एकदोनदा.

या वरच्या हिरवळीला आप्पा फसले आहेत याचं प्रत्यंतर यायला वेळ लागला नाही. घरीं निवांतपण नाही, घटकाभरहि डोळा लागत नाही घरच्या आदळआपटींत, अशी कुरकूर करीत दुपारची वामकुक्षी करायला माझ्या बिऱ्हाडींच यायची इच्छा आप्पांनी प्रदर्शित केली. मी त्यांना कसलेहि आढेवेढे न घेतां रुकार दिला.

मी पूर्वतयारी आधीच करून ठेवली आणि आप्पा घरीं येतांच हंसतमुखानं त्यांचं स्वागत केलं.

" आज घरींच कशी तूं? मला वाटलं तूं या वेळीं कुठं तरी गेली असशील. आणि पोरटीं नाही दिसंत कुठं? "

" तुम्हांला निवांतपणा हवाय ना आप्पा? म्हणून मुलांना धाडलंय आक्कांच्या घरीं. आतां स्वस्थ पडा तुम्ही. मीहि जातें जोशांकडं त्यांचं मेतकूट द्यायचंय करून. चार दोन आणे मिळतील ते सोडा का? "

" चार दोन आण्याचीच कथा ना? ही अधेली घे आणि जाऊं नकोस तूं कुठं. बस इथंच. "

" पण घरांत माशा मारीत बसायचं कशाला? तुम्ही तर झोप घेणार. "

" झोप घ्यायला रात्र आहे लांबलचक. आता घटकाभर मजा करायची

सोडून झोप काढायला मी काय अरसिक आहे होय? गुजे, माझ्या मनांतलं सगळं ओळखलं आहेस तूं. उगीच ओढून चंद्रबळ नको आणूं. ये बैस अशी माझ्याजवळ. तुम्ही पोरी भारीच आढ्यतेखोर."

"इश्श आप्पा! लोक काय म्हणतील? आणि तुमच्या काकूंना कळलं तर त्या तुमची न् माझी काय शोभा करतील याचा कांही विचार?"

"सगळा विचार केलाय मी गुजे. लोकांना काय कळणार आमच्या घरच्या गोष्टी? आणि आमची जगदंबा तरी कशाला येतीय इंथ मरायला? आणि हें बघ गुजे, आजतरी त्या बयाबाईचं भय मुळीच नाही. ती आज गेली आहे शेजारगांवच्या पाताळेश्वराला. रात्रीची पालखी करून मग येणार आहे परत. बसूं दे ती पाताळेश्वराला प्रदक्षिणा घालत. आपण आपलं इथंच--हं ये जवळ, की मी येऊं तिथं?"

"पण आप्पा भय वाटतं मला. तुम्हांला म्हातारपणीं--"

"गुजे, पेन्शन घेतली न् केस पिकले म्हणून म्हातारा नको म्हणूं मला. तरण्या पोराइतकंच हें आहे अजून माझ्या अंगांत. अग माझी ती कैदाशीण जिवंत आहे म्हणून, नाहीतर फिरून लग्न करून नवा संसार रंगवून दाखवीन अजून. आहेस कुठं तूं--" असं बोलून आप्पा उठले आणि माझ्यावर चालूनच आले म्हणाना!

ते आता माझा हात धरणार तोंच, कॉटखाली छपून बसलेल्या काकूंनी मागून त्यांच्यावर झडप घातली आणि त्यांचं मानगूट पकडून गदगदा हलवीत म्हटलं, "लाज कोळून प्यायलां आहेत की काय तरी? ही कैदाशीण तुमच्या जन्माला लागली आहे, अशी मानगुटावर बसायला आहे म्हणून धडगत आहे तुमची, नाहीतर कुठं कसे दिवे लावाल याचा नेम नाही. देवदर्शनाचं नी स्नानसंध्येचं ढोंग करून असलीं पापं करतां—"

काकूंच्या त्या अवचित हल्ल्यानं आप्पांची कशी केविलवाणी अवस्था झाली असेल याची कल्पना करा तुम्हीच. त्यांनी रुमाल पुरता बांधावयाचीहि वाट न बघतां माझ्या घरांतून काढता पाय घेतला. काकूंनी डोळ्यांत पाणी आणून नवऱ्याच्या या अवलक्षणी आचरणाबद्दल माझी क्षमा मागितली आणि वेळींच दक्षता घेतल्याबद्दल मला धन्यवादहि दिले.

कसं कुणाला ठाऊक, पण आप्पांच्या फजितीचं गुपित षटकर्णी झालंच ! मी स्वतः याबद्दल अगदी जिव्हाळ्यांतल्या माणसापुढं अक्षरहि बोललें नव्हतें. माझं मन भीत होतं तें बोलायला. लोक टवाळी करायला हपापलेले असतात. आप्पांचं बिंग कळलं तरी आनंद, व त्यांच्याबरोबर माझंहि कांहीतरी खोटं-नाटं पिकवायला मिळालं तरीहि ठीक. लोकांना टिंगल करायला निमित्त मिळवून देऊं नये, अशी खबरदारी माझ्याकडून मी घेतलेली असली, तरी काकूंना तितका पोच राहिला नसावा. आपला भलेपणा उठून दिसावा म्हणून आपल्या त्यांचा वाईटपणा उघडा करण्याचा मोह त्यांना आवरतां आला नसेल दुसरं काय ? कसाहि असो. आप्पांच्या साळसूदपणाचा पापुद्रा फाटला अन् त्यांच्या आंतल्या पापीपणाबद्दल लोकांत कुजबूज सुरू झाली. लोकांचीं छिद्रं शोधायची हौस असलेलीं माणसं जिकडं तिकडं असतातच. माझ्या आसपास तरी तीं कशीं नसतील ? माझ्या एका म्हाताऱ्या शेजारणीला या प्रकाराची कुणकूण लागली वाटतं. तिची शहानिशा करून घेण्यासाठी ती माझ्याकडं येऊन म्हणाली, " काय गुजाताई, आज स्वतःश्या बाजारांत गेलां ? "

" मग कोण जाणार ? जिन्नस सरले होते-- "

" पण तुमचा बाजारहाट ते आप्पा पेणसलदार करतात ना ? ते कुठं दिसत नाहीत आताशा ? "

" नसतील आले. दुसरीं कामं असतील."

माझ्याकडून कांहीतरी निघेल ही म्हातारीची अपेक्षा माझ्या उत्तरानं निष्फळ ठरली. स्पष्टच विचारल्यावाचून मार्ग नाही, असं पाहून ती म्हणाली, " खरं कां हो गुजाताई त्या थेरड्याचं ऐकलं आहे तें ? काय मेल्याची वासना बघा ! बायाबापड्यांना जगांत रहाण्याची सोयच उरली नाही ! बायको कर्दन काळ उरावर आहे, तरी सुद्धा--गुजाताई, तुम्ही त्या मेल्याला तसंच सोडायला नको होतं बघा. गुजाताई नाही तर नाही दुसऱ्या पुजाताईंच्या राशीला लागेल तो. जित्याची खोड मेल्याशिवाय थोडीच सुटायला बसली आहे ? "

" तुम्ही कुणाबद्दल काय म्हणतां आहां तेंच ध्यानांत येत नाही माझ्या. तुम्ही कांहीतरी ऐकतां आणि कांहीतरी तर्क करतां. अहो, एक हात लाकडाची दहा हात ढलपी काढायची सवयच असते लोकांना. आणि मी म्हणतें, तुम्हांला

करायच्या काय असल्या चौकशा ? तुमचा देव देव चालतो तोच छान. रोज दहा माळा तरी होत असतील नाही तुमच्या जपाच्या ? आता अवसेनंतर भागवताचा सप्ताह होणार आहे म्हणे मुक्तेश्वराच्या देवळांत ! त्याला बसणार असालच."

माझ्याकडून पत्ता लागण्याची आशा नाहीशी पाहून म्हातारी चालती झाली, तरी पण लोकाचे डोळे नी जिभा कशा तिखट असतात याची नवी जाणीव मला झाली. पहिल्यांदा मला वाटायचं ज्याला त्याला स्वःतच्या काळज्या कट-कटी खूप आहेत. दुसऱ्याच्या उसाभरी करायला सवड कुणाला असणार ? पण आपलीं कामं बाजूस पडलींत तर पडेनात ? दुसऱ्याच्या कुलंगड्यांत लक्ष घाल-ण्यांत लोक आनंद मानतात हेंच खरं.

मामलेदारीणबाई आणि आप्पा हीं दोन माणसं वगळल्यास माझ्या स्वतंत्र जीवितयात्रेंत मला जीं माणसं भेटलीं ती चांगलींच भेटलीं. जग दुष्ट माण-सांनी भरलेलं आहे, हातांत पायपोस घेऊन सावधपणे वागलं पाहिजे, असा उपदेश कित्येक धूर्त आणि अनुभवी माणसं करतात. पण या उपदेशापेक्षा रावजींचे विचार मला अधिक बरे वाटतात. ते म्हणत असत, 'दुष्ट मनुष्य असा जगांत निपजतच नाही. परिस्थिती ही एखाद्याला दुष्ट बनविते. स्वभावतः सर्व माणसं सुष्टच असतात. आपण वाकडेपणा स्वीकारला नाही तर इतर लोकहि आपणाबरोबर सरळपणानं वागतील. जगाच्या हेटाळणीमुळं वैतागलेला एखादा माणूस पीडादायक होईलहि. पण तेवढ्यावरून जग भूतपिशाच्यांचं आणि राक्षसांचं आहे असं मानूं नये, आणि हताश तर मुळीच होऊं नये. जगा-कडं आशावादी दृष्टीनं पाहिलं म्हणजे त्यांत भरलेला रमणीयपणा अनुभवतां येतो. एखादं काटेरी झुडुप उगविलेलं दिसलं म्हणून सगळा फुलबाग टाकाऊ ठरत नाही. क्वचित् एखादा विंचू निघाला म्हणून सगळ्या घरभर विंचूच आहेत असं मानून त्याचा त्याग कोणी करतो का ?' रावजींचे हे विचार मला नेहमी आठवतात आणि मामलेदारीणबाई किंवा आप्पा यांच्यासारख्या विंच-वांची आठवणहि न होतां आक्का, बापू, बाळाभाऊ नी वारूताईसारख्या प्रेमळ नी उपकारी माणसांच्या आठवणींत मन आनंद पावतं. वाटचाल करायला धीरहि येतो.

तरीदेखील सावधपणानं वागण्याचा अनुभवी लोकांचा उपदेश अगदीच अनाठायीं नसतो असं केव्हा केव्हा पटतं. दुर्गाबाईच्या बाबतींत तर हा सावधपणा अवश्य होता असं मला आता वाटतं. आधी उमगलं असतं तर किती बरं झालं असतं !

माझ्या प्रपंच वस्तू भांडाराचा छान जम बसला. वारूताईची जोडगण मिळाल्यामुळं तर त्यांतला अपुरेपणा नाहीसा होऊन विपुलता निर्माण झाली. साहजिकच प्राप्तीचं मानहि वाढलं. कांही वरचीं कामं मोलानं करून घेऊनहि आमच्या प्राप्तींतून ऊर उरायला लागली. तीन चार वर्षांत आमच्यापाशी आमचं पोट भागून हजार दीड हजारांची माया उरली. आशा विश्वासच्या अंगांवर तोळामासा सोनंहि झालं. आशा आतां शाळेला जाऊं लागली होती. व तिचा गळा चांगला असल्यामुळं वारूताईनं तिचं गायनक्लासांतहि नांव घातलं होतं. थोडक्यांत सांगायचं म्हणजे पगारदारांच्या बायकांपेक्षा आम्ही अधिक सुखसमाधानांत होतों.

अशा स्थितींत दुर्गाबाईनं आमच्या घरांत पाऊल टाकलं. वारूताई निराधार विधवा म्हणून माझ्याकडं आली तर दुर्गाबाई नवऱ्यानं टाकलेली म्हणून. आपला नवरा छंदीफंदी कसा आहे, त्यानं एका थिल्लर पोरीशीं लग्न केलं आहे, ती आपला किती छळ करीत होती, व आपल्या गरीब स्वभावामुळं आपण किती यातना सोसल्या, याची दुर्गाबाईनं रडून भेकून सांगितलेली कहाणी ऐकून कुणाच्याहि मनाला पाझर फुटला असता. मला आणि वारूताईला तिची कींव आली, अन् आमच्या जवळ राहून तिला सुख लागत असलं तर लागेना का, अशा विचारानं तिला आम्ही थारा दिला. महिना दोन महिने ती अगदी छान राहिली. 'तुमचे माझ्यावर अगणित उपकार आहेत, तुम्ही दोघी मला आईबहिणीसारख्या लाभलां' असे तिचे उद्गार वारंवार निघायचे. आम्हालाहि धन्यता वाटायची ते ऐकून. कामहि अंग मोडून करायची ती. आशा विश्वासचं करण्यांत वारूताईप्रमाणं तिनं अगत्य दाखवलं. मला एक चांगली मैत्रिण लाभली असं समाधान तर वाटलंच, पण आशा विश्वासना आणखी एक प्रेमळ मावशी मिळाली हा लाभ मला अधिक मोलाचा वाटायला लागला.

पण दुर्गाबाईचा हा कामसूपणा, मायाळूपणा नाटकी होता असं हळुहळु

दिसून यायला लागलं. प्रथमतः डोकं दुखतं, पोट दुखतं, थंडीच वाजून आली, अशा दुसऱ्याला न उमगणाऱ्या सबबी काढून ती काम टाळूं लागली. आम्ही प्रथम फसलों आणि तिचे लाड आमच्याकडून होतील तितके पुरविले. डॉक्टर-कडून तपासणी करावी असंहि आम्हांला वाटलं, पण दुर्गाताईनंच नकार दिला. ती म्हणाली, 'असल्या किरकोळ दुखण्यासाठीं डॉक्टरकडं कशाला धावायचं ? ते श्रीमंती चोचले करायला आपण इनामदार, सावकार नी रावसाहेब, रावबहादुर थोडेच आहों ? सुंठीनं बरीं होतात आमचीं दुखणीं.' दुर्गाबाईला आम्ही घरगुती औषधं द्यायला लागलों. औषध दिल्यावर ती बरी झाल्याचं दाख-वायची, पण चार दिवसांनीं दुसरी कसलीतरी कुरकुर सुरू व्हायची तिची. म्हणून कमी खर्चाचं वैद्याचं औषध सुरू केलं. त्या औषधानं तिला नाही, तरी आम्हांला गुण आला.

वैद्याच्या औषधाला पथ्य कडक असतं. तिखट, तेलकट आणि तळलेले पदार्थ वर्ज्य असं वैद्य बजावून सांगत आणि त्यांनी जो काढा दिला होता तो कमालीचा कडु होता. त्यांतल्या एकेक जिनसाचं नांव ऐकूनच आमच्या अंगावर काटा यायचा आणि ओकारी आल्यासारखं वाटायचं. दुर्गाबाई तो मुकाट्यानं कशी घेते, याचं नवल वाटायचं आम्हांला. 'असला काढा घेववतो तरी कसा तुम्हाला' असं वारूताई म्हणालीसुद्धा. पण दुर्गाबाईनं उत्तर दिलं 'सांगतें कुणाला न घेऊन ? अंगांतली आग नी कळा सोसायला नको असतील तर कडु औषध हवंच की घ्यायला. अन् औषध म्हटलं की ते स्वादिष्ट कसं असेल ? वैद्य कडु काढ्याऐवजी तूपसाखर द्यायला लागले, तर सगळींच माणसं हौसेनं आजारी पडतील.' दुर्गाबाईच्या या समजूतदारपणालाहि आम्हीं फसलों.

नुसता मेतकूट भात आणि ताक असं तिचं पथ्य होतं. त्याबद्दल मात्र ती कधी कधी कंटाळलेली दिसायची. पण तिनं पथ्य पाळण्यांतहि कसूर केली नाही. इतकं सगळं असलं तरी तिच्या चिवट दुखण्याबद्दल संशय यायला लागला. आजारी आणि पथ्यावर राहिलेलं माणूस सुकल्यासारखं दिसतं, गळून गेलेलं दिसतं. पण दुर्गाबाईच्या चेहऱ्यावर तुकतुकीच दिसायला लागली. उठण्याबसण्यांत आणि घरांत वावरण्यांत मुळीसुद्धा शीणभागोटा दिसेना. एकादे वेळी आशा विश्वासबरोबर ती कविता म्हणायला लागली तर आवाज

अगदी ठणठणीत ! आजारी माणसाचं कसलंच लक्षण तिच्यामध्यें दिसेना ! वारूताईनं एकदा हलकेंच म्हटलं, " सोंगच आहे की काय आजारीपणाचं ? "

माझ्याहि मनांत ही शंका होती, तरीपण मी म्हटलं, " अग, आजारीपणाचं सोंग कोण करील ? कडु काढे घ्यायचे आणि आळणी आळणी जेवायचं सुखासुखी कोण पत्करील ? "

पण संशय उत्पन्न झाला की माणूस त्या दृष्टीनं पहायला लागतं. आणि तसं पाहिलं की कांही ना कांहीतरी दिसतंच. काढ्याची वाटी पुढं ठेवून वारूताई आंत कामाला गेली आणि कशालाशी लगेच परत आली. त्याच वेळीं दुर्गाबाईनं काढा कोपऱ्यांतल्या मोरींत ओतून वाटी उपडी घातल्यासारखं तिला दिसलं. तिनं म्हटलंसुद्धा तसं. पण दुर्गाबाईनं म्हटलं, " काढा कशी टाकीन मी ? वाटी विसळून पाणी टाकलं मी. की तेंसुद्धा पिऊं ? उद्यापासून तुम्हीच ओतीत चला माझ्या घशांत आपल्या हातानं. म्हणजे संशय घ्यायला नको आणि लबाडी बांधायला नको माझ्या गळ्यांत. घाणेरडीं औषधं ढोसून इकडं माझा जीव घाबरा होतोय, आणि वर तुमचीं हीं कुजकीं बोलणीं ! तुमच्या पदरांत येऊन पडलेंय, फुकटचं गिळायला घालतांय, काय बोलाल तें ऐकून घेतलंच पाहिजे मुरदाडपणानं. माझं धड असतं तर कशाला झालं असतं असं ? "

दुर्गाबाईनं गळा काढला. भीक नको पण कुत्रं आवर अशी तऱ्हा झाली वारूताईची ! मी समजुतीच्या गोष्टी सांगून तिला उगी केलं, तरीपण तिचं तोंड वाजतच होतं तासन् तास !

आणखी दोन दिवसांनी दुसराच एक प्रकार दिसला ! अलीकडं आशा विश्वासच्या मधल्या वेळच्या खाण्यासाठी करून ठेवलेले लाडू नी वड्या लौकर लौकर संपत. डबा उघडा राहिल्यामुळं मांजर बिंजर खात असेल किंवा मुलंच थोडं अधिक घेत असतील, असं आम्ही समजत होतों. पण त्या दिवशींच्या थालीपीठानं खरा प्रकार उघडकीला आणला. वारूताईनं आशानं दोनतिनदा मागितलं म्हणून मुद्दाम थालीपीठ लावलं, त्याचे चतकोर करून वर लोणी घालून झाकून ठेवलं, तीं मधल्या सुट्टींत आल्यावर खाण्यासाठी. वारूताई व मी गेलों कुठेशा कामाला. दुर्गाबाई पोटदुखीच्या हुकमी सबबीवर घरींच पडून राहिली. घरांत पूर्ण एकांत मिळाल्यावर तिनं झाकून ठेवलेल्या थालीपीठावर

हल्ला चढविला. ती थालीपीठावर ताव मारीत असतांना आशा विसरून राहिलेली वही नेण्याकरता अवचित घरीं आली. वही घेऊन ती मागल्यामागं शाळेंत जायची वास्तविक. पण स्वयंपाकघराचं दार कां उघडं दिसतं म्हणून आंत आली ती, व दुर्गाबाईचा तो स्वाहाकार पाहून उद्गारली, " अय्या ! मावशी तुम्ही ! अन् थालीपीठ खातांय ? "

दुर्गाबाई दचकली. आता तिला उडवाउडवी करणं शक्यच नव्हतं. तिनं डोळे वटारून आशाला शाळेंत पिटाळलं. ती पोरटी आम्हांला तो प्रकार सांगितल्याशिवाय राहणार नाही हें ओळखून आम्ही बाहेरून आल्यावर आपण होऊनच आम्हांला थालीपीठ खाल्ल्याचं तिनं सांगितलं. पोटांत एकाएकी कलकलल्यागत झालं म्हणून खाल्लं, नी पाणी प्यालें असं ती म्हणाली. मी म्हटलं, " खाल्लं तर खाल्लं. पण आतां बाधलं नाही म्हणजे मिळवलं. " पण वारूताईनं ही गोष्ट माझ्यासारखी मिटवून टाकली नाही. ती गालांतल्या गालांत हसत, डोळे मिचकावत म्हणाली, " वरचेवर कलबलतं वाटतं दुर्गाबाईच्या पोटांत ? तरी म्हटलं फडताळांतले जिन्नस—"

हा टोमणा वर्मी लागून दुर्गाबाई चवताळून उठली. " तर तर ग. तुझ्या लाडूवड्यांचे डबे मीच फस्त करतें. आग पेटलीय ना माझ्या पोटांत ! आपण अगदी वायुभक्षण करून जगत असतील ! " असं तोंडाला येईल तें बडबडायला लागली. तिचा त्या वेळचा आवेश बघून ती आजारानं दुर्बल झाली असेल असं कोणालाहि खरं वाटलं नसतं. वारूताईच्या एवढ्याशा बोलण्यावर दुर्गाबाईनं आकांडतांडव करायचं कांही कारण नव्हतं. तिचा हा आक्रस्ताळेपणा मला चमत्कारिक वाटला.

मी वारूताईला तिच्यापुढून दूर जायला सांगितलं आणि तिला म्हटलं, " दुर्गाबाई, उगीचच्या उगीच चिडायला काय झालं तुम्हाला ? बोलली असेल गमतीनं. एके ठिकाणीं राहणारीं माणसं करायचींच थट्टा एखादे वेळीं. खेळीमेळीनं रहायचं तर असं चालायचंच. "

" असली कसली मेली जीवघेऊ थट्टा ! आज चोरून खाल्ल्याचा आळ घेईल, उद्या दुसरं कांही चोरलं म्हणेल. मऊ लागलं की कोपरानं खणणारच

कुणी झालं तरी. आणि तुम्ही घ्या तिचा कैवार. मला नाही खपायचं हें. मी आपण होऊन कुणाच्या वाटेला जायची नाही आणि माझी कुणी कुरापत काढलेली मला खपायची नाही. सांगून ठेवतें तुम्हाला."

दुर्गाबाईची ही दटावणी ऐकून माझ्या जागीं दुसरी कुणी बायको असती, तर तिनं तिला तुझं आमचं जमायचं नाही, तूं आपला रस्ता सुधार, असं सांगून टाकलं असतं पण भिडस्त स्वभावामुळं मीच पडतं घेतलं.

तरीपण आपल्याविषयी आमचीं मनं साफ नाहीत आणि यापुढं आमच्यामध्ये राहून फार वेळ निभाव लागायचा नाही, असं दुर्गाबाईनं ताडलं अन् वेळ आली की चालतं व्हायचं या तयारीनंच ती वागूं लागली. आशा विश्वासला हिडीसफिडीस करायचं, वारूताईशीं वरून अबोला असल्याचं दाखवायचं पण आडून कुजके नासके टोमणे मारायचे, आम्ही घरांत काम काढलं की बाहेर भटकायला जायचं, असं तिनं चालविलं. वारूताईविषयी भलभलत्या कंड्याहि ती पिकवीत असे असा मला अनुभव आला. सराफीणबाई एके दिवशीं मला म्हणाल्या, "गुजाताई तुमची वारूताई दिसत नाही आताशा कुठं?"

"तिनं डझनभर स्वेटर नी डझनभर स्कार्फ करून द्यायचं पत्करलंय. त्यामुळं फावत नाही तिला कुठं जाययायला. दुसरीं कामंहि असतात. मिळेल तितका वेळ तिला हवाच असतो."

"खरं ना पण हें? की कांही दुसरंहि कारण आहे बाहेर न पडायला?" सराफीणबाईंच्या या विचारण्याच्या तऱ्हेनं मी चपापलें. त्यांच्या मनांत कांहीतरी डांचत तर नसेल ना, असं मला वाटलं. पण मी होऊन त्याबद्दल कांही विचारलं नाही.

पण सराफीणबाईंना मी कांही विचारलं नाहीं, तरी दुसऱ्या एका गंगाकाकूंनी चार दिवसांनी मला वारूताईबद्दल विचारलंच. वस्त्रभांडाराचे वसंतराव मुंबईहून लोकरीच्या वस्तु आणण्यापेक्षा वारूताईच्याच कां घेतात, तिला ते इतके पैसे कां देतात, ती दिवे लागणीनंतरच त्यांच्या दुकानीं कां जाते, अशा चौकशा त्यांनी चालविल्या. खरं म्हटलं तर गंगाकाकूंची नी माझी नुसती तोंडओळख. त्यांनी आमच्या घरगुती गोष्टींत लक्ष घालण्याचं कांही कारण नव्हतं, आणि असल्या चौकश्या करतांना त्यांची दृष्टि गढूळलेली आहे हेंहि स्पष्ट उम-

गून येत होतं. मला सहसा राग येत नाही. पण गंगाकाकूंच्या चोंबडेपणाचा मला राग आल्यावाचून राहिला नाही. मी म्हटलं " काकू, कारणाशिवाय कोणी कोणाकडे जात नाही आणि फावेल तेव्हाच जातं. शिवाय व्यापाऱ्याला कोणाकडून माल खरेदी करायचा आणि त्याला किती किंमत द्यायची हें कळतं. त्यांच्या व्यवहारांत कशाला घालायचं तुम्ही आम्ही लक्ष ? आणि करायचं काय लक्ष घालून तरी ? तुमचीं कामं पुष्कळ आहेत आणि तुमचा देवदेवहि रगड आहे. तो पुण्याईचा उद्योग सोडून हा मसण्या हेंच कां करतो न् ती मसणी तेंच कशाला करते या उसाभरी कशाला करतां ? "

माझ्या या उत्तरानं गंगाकाकूंच्या नाकाला मिरच्या झोंबल्या. त्या फणकारल्या " मी हो कुणाच्या लफड्यांत लक्ष घालूं ? घालीनात गाढवांचा गोंधळ ? करतील ते भोगतील. पण उद्या पंढरपूर आलं नशीबाला म्हणजे समजेल. "

गंगाकाकू आपल्या रस्त्यानं चालत्या झाल्या, पण माझ्या मनाची कालवाकालव करून. त्यांनी हा असला घाणेरडा वहीम कां घ्यावा आणि घ्यावा तरी कशामुळं ? वारूताईबद्दल तिला माहिती- भलती सलती- मिळाली तरी कुणीकडून याचा उलगडा मला होईना. पण गंगाकाकू आणि दुर्गाबाई यांच्या अलीकडं वरचेवर गाठीभेटी होतात, ही माहिती मला लागली. आणि हें दुर्गाबाईचंच काम याची माझ्या मनाची खात्री होऊन चुकली. आता भीडभाड न ठेवतां दुर्गाबाईला घरांतून चालती हो असं सांगायचा निश्चय केला मी.

माझा निश्चय अमलांत आणण्याचं कारणच पडलं नाही. दुसरे दिवशीं आम्ही सकाळचीं कामंधामं उरकून जेवायला बसतांना दुर्गाबाईला हाक मारायला गेलों, तर ती घरीं नाही ! शेजारपाजारच्या तिच्या बैठकीच्या अड्ड्यांवर शोध केला, कुठंच तिचा पत्ता नाही ! आम्ही जेवून घेतलं. संध्याकाळ झाली तरीहि ती आली नाही. कुठं गेली, नी अशी न सांगतां न सवरतां कशी गेली या बुचकळ्यांत आम्ही पडलों. आम्हांला फार वेळ संशयांत रहावं लागलं नाही. रात्रीं हिशोबाचं टिप्पण करायला वारूताईनं कपाट उघडलं, तर त्यांतला पैशाचा तांब्या जाग्यावर नाही ! कालच वसूल केलेले दोन अडीचशे रुपये त्यांत होते. तांब्या नाहीसा झाला, तसं आणखीहि कांही गेलं कीं काय म्हणून दुसरं फडताळ उघडलं तेंहि मोकळं. आमच्यापाशी असून असून काय असायचंय ? तरी

पण आशा विश्वासच्या अंगावर जें किडुक मिडुक करून घातलं होतं, नी दोन चार चांदीचीं भांडीं घेऊन ठेवलीं होतीं, जीं चार पातळं पोलकीं बऱ्यांतलीं केलीं होतीं, तें सर्वच्या सर्व बेपत्ता ! दुर्गाबाईनं आम्हांला हात दाखविला. आम्ही साठवून ठेवलेली बहुतेक पुंजी नाहीशी झाली.

पोलीसांत वर्दी द्यावी, फौजदारसाहेब आपल्या ओळखीचे झालेच आहेत, ते दुर्गाबाईचा शोध करतील आणि आपला ऐवज परत मिळेल असं वारूताई म्हणाली. पण मला तिचा विचार पटला नाही. दुर्गाबाई न होऊन सांपडली तर पोलीस तिचा छळ करतील, तिच्या अब्रूचे धिंडवडे होतील, शिवाय साक्षी-पुराव्यापायी आपल्यालाहि हेलपाटे घ्यावे लागतील; त्यापेक्षा गेलं तें आपलं नव्हतंच म्हणून गेलं, असं म्हणावं नी गप्प बसावं असं मी ठरविलं. वारूताईला तें पटलं नाही. तिचं म्हणणं असं की आपण तिची गय केली, तरी ती दुसऱ्या कोणाला चटका लावल्याशिवाय रहायची नाही, आणि ते लोक बरं गप्प बसतील ? जित्याची खोड मेल्याशिवाय जायची नाही. एक चोरी पचली तरी सगळ्याच पचायच्या नाहीत. एखादी चोरी उघडकीला येणार आणि दुर्गाबाई खोड्यांत अडकणारच. मग दुसऱ्या लोकांच्या बचावाकरता आपणच तिच्यावर फिर्याद केली म्हणून बिघडलं काय ?

आपल्या मरणानं ती मेली तर मरूं दे. त्याला आपण निमित्त कशाला व्हावं असं मी म्हटल्यावर वारूताई गप्प बसली, तरी तिचं समाधान झालं असं मात्र नाही.

पुढं दोन वर्षं गेलीं. आम्ही दुर्गाबाईला विसरूनहि गेलों. पण एके दिवशीं पोलीस कचेरींतलं मला बोलवणं आलं. पोलिसाचं बोलावणं आलेलं पाहून धस्स झालं मनांत. जाणं भागच होतं म्हणून गेलें, जाऊन पाहातें तों दुर्गाबाई पोलिसांच्या पहाऱ्यांत बसलेली ! मला पहातांच खाली मान घातली तिनं. मला हकीकत कळली ती अशी, की आमच्याकडं चोरी करून पळाली ती दुर्गाबाई नरसोबाच्या वाडीला गेली. तिथं देवाच्या सेवेला आल्याचं तिनं आठ पंधरा दिवस भासवलं. तिथंहि तिनं आमच्यासारख्याच एका भोळ्या बाईला भुरळ पाडली आणि तिच्या बिऱ्हाडांत तळ ठोकला. ती बाई पुजाऱ्यांच्या घरीं स्वयंपाकपाणी करून दिवस काढीत होती. दुर्गाबाई तिला थोडाफार हातभार लावी.

यांतहि तिनं त्या बाईला मदत करण्यापेक्षा आपलीच सोय पाहिली होती. पुजारी मंडळींकडं नवी यात्रेकरू मंडळी यायची आणि त्यांचे नैवेद्य असायचे. क्षेत्रांतल्या उपाध्यायाकडं नित्य पोळी असायची आणि गोड खायला सवकलेल्या दुर्गाबाईला पुजाऱ्यांच्या घरचं थोडं फार काम सोईस्करच वाटायचं.

दुर्गाबाईला किफायतीचं दुसरं एक साधन तिथं होतं. जे यात्रेकरू येत त्यांच्या राहाण्याची व्यवस्था पुजारी मंडळी आपल्या घरीं करीत. घरीं बाडबिस्तारा टाकून ती मंडळी घाटावर आणि देवाकडं गेलेली असायची. त्यांच्यामाघारी दुर्गाबाई त्यांचे खिसे चाचपून आठ चार आणे लांबवावयाची. वाडीच्या पेढ्यांची आणि कवठाच्या बर्फीची चट तिला लागली होती आणि ती तृप्त करण्यासाठी अशी हातचलाखी तिला करावी लागे.

शिकारीचा नाद लागलेल्या माणसांचं असं सांगतात. पाखरं आणि ससे मारण्यापासून सुरवात होते. नंतर वाघ हत्तीची शिकार केल्यावांचून त्यांना करमेनासं होतं. अशा शिकारींत जिवावर बेतण्याची भीति असते, पण हा पुढचा धोका त्याला दिसतच नाही. चोराचंहि असंच होतं. आठचार आण्याच्या भुरट्या चोऱ्या पचविल्यानंतर त्याला मोठा डल्ला मारायचा मोह होतो. त्याचा परिणाम पुढं काय होईल याचा विचार उरत नाही. दुर्गाबाईचं तसंच झालं.

बारीकसारीक चोऱ्या उमगल्या तरी त्यांचा तपास लावीत बसायला बाहेरगांवच्या यात्रेकरूंना वेळ नसतो. आपलीं धर्मकृत्यं उरकून परत जायची त्यांना घाई असते. त्यामुळं गेलं तर गेलं असं म्हणून ते गप्प बसतात. त्यांची ही चालढकल दुर्गाबाईसारख्या हाताळ माणसांना माहित असते. त्या जोरावर त्यांची उचलेगिरी अखंड चालू रहाते. या हातचलाखीची खोड बळावण्याला दुर्गाबाईला आणखी एक कारण होतं. तिला आपल्या खादाडपणाबरोबर दुसऱ्या एका मित्राचा खादाडपणा आणि गांजाचं व्यसन संभाळावं लागत होतं. क्षेत्रांत देवसेवेचं सोंग करून भाविक लोकांच्या जीवावर फुकट चरणारे ऐदी आणि व्यसनी लोक गोळा झालेले असतात. अवधूत गोसावी नांवाचा असाच एक दत्तभक्त वाडीला होता. पहाटे उठून कृष्णाबाईत बुडी मारायची, अंगभर भस्म चोपडायचं, चार प्रदक्षिणा घालायच्या, गांजाचे अड्डे पुजायचे आणि घाटावर वावरायचं. कुणाकडं महानैवेद्य आहे या वासावर राहून पुरुल्याची

सोय लावायची—नाही कुठं लग्गा लागला तर सत्तेची माधुकरी होतीच. तिसरे प्रहरीं पुन्हा गांजाचा अड्डा व संध्याकाळीं घाटावर चक्करा, असा त्याचा जीवनक्रम. अवधूत गोसाव्याला हीं देवसेवा चांगलीच मानवली होती. आणि त्याच्या अंगावर बाळसंहि चढलं होतं. दुर्गाबाई आणि अवधूत गोसावी हीं एका जातीचीं माणसं. त्यांचं सख्य जमण्यास वेळ लागला नाही. ही बाई आपल्या पुरती नादीं लागली आहे अशी खात्री पटल्यावर गोसावीबुवा तिच्याकडून आपली मिजास परोपरीनं पुरवून घ्यायला लागले. रोज पावली आधेलीभार गांजा आणि पावशेर आच्छेर पेढेबर्फीचा नैवेद्य दुर्गाबाईनं दिला पाहिजे, असा नेमच होऊन बसला. ही खंडणी भरण्यासाठी तिला हा चोरीचा धंदा चालू ठेवण्यावांचून दुसरा कोणता मार्ग होता?

एके दिवशीं एक मुंबईकर पाहुणे पुजाऱ्याकडं आले. उतारवयांत तिसऱ्या कुटुंबाला झालेल्या मुलाची मुंज दत्तापुढं करण्याचा त्यांचा नवस होता. तो फेडण्यासाठी ते आले होते. गृहस्थ चांगला संपन्न होता हें त्याच्या पोषाखावरून आणि बायको मुलाच्या अंगावरल्या सोन्यामोत्याच्या जिनसांवरून सहज दिसणारं होतं. महापूजा, महानैवेद्य, मुंज, मुंजीचं सहस्रभोजन, असे त्यांचे बेत होते. पुजारीबुवांनी नेहमीप्रमाणं त्या बाईला कामाला बोलावलं आणि तिच्याबरोबर दुर्गाबाईहि तिथं घुसली, आणि तिनं यजमानांचा डोळा चुकवून त्यांचं पैशाचं पाकिट लांबविलं. मोठं सावज दिसतंय, तेव्हां मोठं घबाड मारावं अशी तिला वासना झाली की काय कुणास ठाऊक? आणि या श्रीमंतांचं पाकिट पळविलं तरी ट्रंकेंत आणखी पैसे असतील, एवढ्या चोरीनं अडणार आहे थोडंच अशी तिनं आपल्या मनाची समजूत घातली असावी.

एवढ्या चोरीनं त्यांचं नडणार नसलं तरी ही चोरी लक्षांत न घेण्याइतकी किरकोळ नव्हती. चांगले हजार आठशे रुपये होते त्या पाकिटांत. शिवाय येतांयेतांच खरेदी केलेलं मुंजामुलाचं पवित्रक पुडी करून त्यांत ठेवलं होतं. नुसते पैसे गेल्याबद्दल ते गृहस्थ गप्प बसले असते एकादे वेळीं. पण त्या पवित्रकाची चोरी त्यांना मुळीच खपण्यासारखी नव्हती. त्यांच्या गुरुजींनी सांगितल्याप्रमाणं तितक्या माशांचं आणि तितक्या खड्यांचं तें त्यांनी करवून घेतलं होतं आणि मुंजीच्या मुहूर्तावर तें मुलाच्या बोटांत चढवायचं होतं. त्याची

चोरी म्हणजे त्यांना मोठा अपशकून वाटला. त्यांनी खूप गवगवा केला. पुजारीहि अस्वस्थ झाले. पुजारीमंडळी खरखरमुंडेपणा करून यजमानाकडून देणग्या दक्षणा हव्या तेवढ्या काढतील पण अशी टगेगिरी कधींहि करायचे नाहीत. अशा टगेगिरीमुळं आपल्याकडं कुणी येणार नाही हें ते ओळखून असतात. आपल्या शहाजोगपणाला ते जीवापाड जपतात. आपल्या यजमानांच्या गवगव्यामुळं पुजारीबुवा अस्वस्थ झाले. त्यांनी जिथं जिथं म्हणून संशयाला जागा होती, तिथं तिथं शोध केला पण तो निष्फळ ठरल्यावर पोलीसांत वर्दी दिल्याशिवाय गत्यंतर उरलं नाही. पोलीस दयामाया कुणाची आणि कशासाठीं ठेवतील ? त्यांनी पुजाऱ्यापासून तों त्यांच्याकडं येणाऱ्या सर्वांच्या झडत्या घेतल्या. दुर्गाबाईच्या झडतींत मुद्देमाल सापडला. तो लांबवण्याची तिनं आपल्याकडून चलाखी केली होती. अवधूत गोसावी तो घेऊन फरारींहि झाला होता. पण दोन दणके देतांच दुर्गाबाईनं त्यांचं नांव सांगितलं आणि कोल्हापुरास पोलीसांनी अवधूत गोसाव्याला पकडलं. त्याच्याजवळ त्या चोरीबरोबर आमच्याकडील चोरीचेहि जिन्नस सांपडले. आम्हांला मामलेदारसाहेबांनी दिलेले चांदीचे पेले मुद्देमालांत होते म्हणून तें सगळं खटलं हजार मैलांवर आमच्यापर्यंत येऊन थडकलं होतं !

मी आमचे जिन्नस ओळखले. पुढं मला कोल्हापूरचा साक्षीचा हेलपाटा पडला. दुर्गाबाईला दोन वर्षांची शिक्षा झाली, असं मला कळलं तेव्हां मला वाईट वाटल्यावाचून राहिलं नाही. वारूताईला मात्र, झालं हें छान झालं, असं समाधान वाटलं.

अडल्यानडलेल्या भगिनीला शक्य तें साहाय्य करावं ही माझ्या मनांतली हौस, पण यांतहि आंधळेपणा उपयोगी नाही, असा धडा दुर्गाबाईनं मला शिकविला. केवळ कनवाळूपणा असून चालत नाही, सावधपणाहि पाहिजे, याची जाणीव मला झाली. वाईटांतून चांगलं काढायचं तर मला हा मोठा लाभच झाला असं म्हणतां येईल.

# ३

मी आतापर्यंत आशा आणि विश्वास या लेकरांची जोड माझ्या जीवनांत कशी मिळाली एवढंच सांगितलं. त्यांनी मला आणि वारूताईला हवंहवंसं वाटणारं एक सुख प्राप्त करून दिलं हेंहि मी सांगितलं. आम्ही दोघी दिसायपुरत्या स्वतःच्या उदरनिर्वाहासाठी कष्टसायास करीत असलों, तरी त्या दोन लेकरांचं कांही कमी पडूं द्यायचं नाही हींच आमच्या मनाला खरी आंच होती. आपण कुणीतरी निराधार आहों आणि आपणांवर लोकांच्या दयेवर दिवस कंठायची पाळी आली आहे असं त्यांना चुकूनसुद्धा वाटतां कामा नये अशी दक्षता आम्हांला घ्यायची होती. अशा शंकाकुशंका घेण्याइतकी त्यांना बुद्धि आज नसली, तरी वाढत्या वयाबरोबर त्यांना ती येणारच. आणि म्हणून ती जाणीव त्यांच्या मनांत निर्माणच होऊं द्यायची नाही, अशा सावधगिरीनं आम्ही त्यांची जोपासना करीत होतों. माझ्या आणि वारूताईच्या या धडपडीला आक्का बापू, आणि बाळाभाऊंसारख्या कनवाळु माणसांचीहि चांगली साथ मिळत होती. आपल्या मुलांत आणि गुजाताईच्या या लेकरांत त्यांनी कधीं भेदभाव दर्शविला नाही. मी कामाच्या गर्दीत असलेली दिसलें तर आपल्या बेबीबरोबर आक्का आशाची वेणीफणी करीत, तिच्या बरोबर तिला न्हाऊं घालीत. घरीं कांही गोडधोड असलं किंवा बापूंनी कांही खेळ खाऊ आणला, तर आशा विश्वासला दिला का असं विचारल्यावाचून बापू राहायचे नाहीत. विश्वास एकदा जिन्यावरून पडला आणि त्याच्या डोक्याला खोक फुटली, तर बाळाभाऊंना कळतांच ते धावून आले आणि त्यांनी त्याला दवाखान्यांत नेऊन पट्टी बांधून आणली. आठन् आठ दिवस ते त्याला दवाखान्यांत नेऊन आणत आणि जखम धुतांना आणि औषध लावतांना तो रडायचा, तर त्याला खाऊ घेऊन देत कांहीतरी. काळानं हिरावलं तरी त्या लेकरांना आईबापांचं सुख कमी पडत नाही, ही देवाची दया पाहून मला समाधान वाटत होतं.

पण जगांत सगळेच कांही सारखे नसतात. सज्जनांबरोबर दुर्जनाहि वावरतं

असतात आणि सज्जनांच्या प्रेमाबरोबर दुर्जनांचा छळहि प्रत्येकाच्या वाट्याला येतो. म्हणून कुणाच्या भलेपणानं हुरळून जाऊं नये आणि कुणाच्या वाकुडपणानं खचून जाऊं नये, ही रावजींची शिकवणहि मला उपयोगी पडत होती. बापूंच्या भलेपणाबरोबर आण्णादीक्षितांचा नतद्रष्टपणाहि मुलांच्या बाबतींत माझ्या एकदा प्रत्ययाला आला. मी कुठं दिसलें की दीक्षितांच्या कपाळाला आठ्या पडतात हें मी पाहिलं होतं. मी बाटगी आहे आणि लोकांच्या सोवळ्या घरांत भ्रष्टाकार कालवीत आहे असा माझ्याविरुद्ध ते गवगवा करीत असतात, हें मला माहित होतं आणि माझ्यावर ग्रामण्य करण्याचा त्यांनी खटाटोप चालविला होता,- हेंहि माझ्या कानांवर आलं होतं. पण प्रत्यक्ष आपल्यावर हल्ला होईपर्यंत आपण तिकडं लक्ष द्या कशाला, असं समजून मी चाललें होतें.

पण आण्णादीक्षितांच्या बाबतींत मी अगदी स्वस्थ बसलें होतें असं मात्र नाहीं. वरचा देखावा जरी धुवट सोवळा असला, तरी त्यांची करणी अमंगळ होती हें शोधान्तीं मला समजलं. आणि ऐकीव गोष्टीवर विश्वास न ठेवतां त्यांच्या पापाचे प्रत्यक्ष पुरावेहि मीं शोधून ठेवले होते दीक्षितांनी माझी कुरापत काढण्याचा आणि त्यांचे दात त्यांच्या घशांत घालण्याचा प्रसंग एकदा आलाच.

आक्कांच्या घरीं सत्यनारायणाचा बेत ठरला. त्यांचं उपाध्यायपण आण्णा दीक्षितांकडंच होतं. आक्कांच्या घरीं कोणतीहि लहान मोठी गोष्ट असली तरी तिथं मी असायचीच. आज स्वयंपाक माझ्याकडं होता. पूजा झाली. पोथी चालू झाली. दहावीस शेजारी पाजारी कथाप्रसादाला आले होते. तिसरा अध्याय होतांच दीक्षितांनी सूचना दिली, "नैवेद्य आणायला झालं बरं कां."

पोथी संपून ' हरये नमः ' होतांच मी नैवेद्याचं पान बाहेर घेऊन गेलें. मला पाहतांच दीक्षित कडाडले "या बाई इथं? आणि यांनी नैवेद्य आणला?"

मला पाहतांच दीक्षितांचं पित्त भडकणार याचं स्वप्न मला आधीं पडलंच होतं, आणि तसं भडकल्यावर द्यायची मात्राहि मी तयार ठेवली होती. मी समजून न समजल्याचा आव आणून म्हटलं, " मी नैवेद्य आणला तरी सोवळ्यानं आणलाय."

" चुलींत घाला तुमचं सोवळं. वाट्टेल त्याचीं काटीं गळ्यांत बांधून मिर-

वतां आहांत. म्हाराचीं आहेत की धेडाचीं आहेत याचा ठावठिकाणा नाही—आणि वर सांगती बया सोवळ्याच्या गोष्टी!"

"पण दीक्षित, ज्यांचा ठावठिकाणा माहीत नाही तीं मुलं म्हाराधेडाचींच आहेत असं कशासाठी मानतां तुम्ही? तीं तुमच्यासारख्या पवित्र माणसाचींच आहेत असं मी म्हणतें. कशावरून खोटं ठरवितां तें?"

"वकिली नको करूं माझ्यापुढं. पोरं कुणाचीं आहेत त्याबद्दलचा पुरावा पाहिजे मला."

"तुम्हांला त्यांची धडकी भरतेय तर तुम्हीच मिळवा की तो पुरावा. अनाथ लेकरांची कीव येण्याऐवजी त्यांची दावेदारी सुचतीय तुम्हांला. ब्राम्हणाच्या कनवाळूपणाचा काय पण उजेड पडतोय!"

"हें पहा गुजाताई तूं आंत जा. आणि बरं का दीक्षित दृष्टीआडच्या सृष्टींत कशाला लक्ष घालतां तुम्ही तरी?" बापूंनी वाद मिटवण्याच्या उद्देशानं म्हटलं.

"अहो बापू, तुम्ही भोळे आहां. अहो, ही दृष्टिआडची सृष्टिच महा भयंकर असते. ब्रम्हघोटाळा असतो त्यांत."

"खरंच ब्रम्हघोटाळा असतो त्यांत. हा ब्रम्हघोटाळा बघायचा आहे का तुम्हांला? तो दाखविला तर डोळे पांढरे होतील तुमचे. कशाला उगीच हात दाखवून अवलक्षण करून घेतां?"

दीक्षित मनांतून चपापले. पण मी उगीचच दम देतें अशी त्यांची समजूत झाली असावी. ते अवसान आणून म्हणाले, "माझे डोळे पांढरे होतात की तुझे होतात तें पाहूं म्हणे. तुझ्या निर्मळपणाचा पुरावा दे की काय द्यायचा असेल तो?"

"ठीक आहे. तुमचा हट्टच आहे तर माझीहि तयारी आहे." असं सांगून मी आंत चालती झालें. बापूंनी दीक्षितांची समजूत घातली आणि पुढं जेवणं सुरू झालीं. वाढायसवरायला मी दिसलें नाही, याचं दीक्षितांना समाधान वाटलं. जेवतांना आशा विश्वासच्या जातगोताबद्दलचे आपले कुतर्क त्यांनी बोलून दाखविले, एवढंच नव्हे, तर मी कोण कुठली याचा पत्ता नसल्यामुळं मीहि

कुणीतरी हीन जातीची बाई असून मी ब्राह्मण असल्याची थाप देऊन बापू आक्कांसारख्या भोळया लोकांना बनवीत असल्याचा संशयहि त्यांनी घेतल्याचं मला मागाहून समजलं.

जेवण उरकून मंडळी पान खात बसली होती. इतक्यांत मी तिथं हजर झालें. माझ्याबरोबर हिरा आणि विठाक्का होत्या. त्यांपैकी विठाक्कांना पुढं बोलवून मी म्हटलं, " विठाक्का ! हे भडजीमहाराज तुमच्या ओळखीचे आहेत ? "

" अग, या भटजीमहाराला मी कशी विसरेन ? यानं माझा पुरता गळा कापलाय. साऱ्या जगाला ठाऊक आहे याची कसाबकरणी. थोडे नव्हेत, पांच हजार रुपये लुबाडलेत माझे या मेल्यानं. माझं पोर खुळं. त्याची खोटी सही घेऊन माझी सगळीची सगळी पुंजी गडप केली आहे या चांडाळानं. आणि वर मिरवतोय सोवळा ब्राम्हण म्हणून. याच्या बायकोच्या हातांत गोठतोडे पडले ते श्राद्धपक्षाच्या चवलीपावलीवर येतात होय ? या विठाबाईसारख्या गरीब बायाबापड्यांना नाडून झालाय हा श्रीमंत. त्या सगुणाबाईला विचार म्हणजे तीहि सांगेल हा किती उफराटया काळजाचा आहे तें. "

आण्णादीक्षितांचा चेहरा काळाठिक्कर पडला विठाक्कांच्या या माऱ्यानं. तरीपण उसनं अवसान आणून ते म्हणाले, " तोंड बंद कर थेरडे. बेअब्रूची फिर्याद करीन तुझ्यावर. "

" कुनाला बेअब्रूचं भ्या दाखवतोस रे बामना ? " हिरा बाहेर येऊन गरजली. " तुला अब्रू असली तर तुझी बेअब्रू व्हायची. टक्कुरीवरचा क्यास न् क्यास तासून काढला च्येपलिनं शंभर मानसांच्याहुजीर. आमचं बापई ह्या भटाचा मुडदा पाडायाच निघाले होते. पर हातापायां पडून अन् हातांतली सोन्याची अंगठी दंडादाखल देऊन सुटून आला. पुन्हा बाईमाणसाच्या वाटेला जायचं नाही अशी जानवं हातांत धरून शप्पत घेतली तवा सुटला. आणि झाला परकार कुनाला सांगू नका म्हणून मिंत्या केल्या यानं म्हणून गप्प ऱ्हायलों आम्ही. म्हटलं याची अब्रू घ्यायला जाऊन आमच्या तुळशी-वरहि ठपका यायचा. पर जित्याची खोड मेल्याबिगर कुठली सुटायला ? असं नाय तसं. पर या गरीब बिचाऱ्या गुजाताईची कळ काढाया लागलाच.

गुजाताईनं मस्नी एकदां सहज म्हटलं तवा म्हटलं तिला की ह्यो भट तुझं नांव काढील तवा मला हाटक म्हणून."

हिराचा हा तोफखाना आणखीहि वाजत राहिला असता. पण या माऱ्यानं आण्णादीक्षित अगदी मेल्यापरी मेल्यासारखे होऊन गेलेले दिसले. तेव्हा मेलेल्याला आणखी कशाला मारायचं म्हणून मी हिराबाईला आवरलं.

" दीक्षित, मी निराधार लेकरांना संभाळण्यांत धर्म बुडवला की तुम्ही करूं नये त्या गोष्टी करून धर्म बुडविला, हें तुमचं तुम्हीच ठरवा. आपणाला माणसकीनं वागायला येत नसेल तर दुसऱ्याच्या माणुसकीला तरी उपद्रव देऊं नये हा धडा घ्या. माझ्यासारख्या गरीब बाईला उपद्रव देण्यांत तुमच्या-सारख्याचा पुरुषार्थ तरी कसला?" मी म्हणालें.

आण्णादीक्षित कांहींच न बोलतां निघून गेले. पूजेपुढील आणि पोथीपुढील पैसे गोळा करण्याची शुद्धहि त्यांना राहिली नाही!

अशासारख्या कांही गोष्टी सोडल्या तर आशा विश्वासच्या बाबतींत मला कसलाहि त्रास झाला नाही. सगळ्याच मुलांना येतात तशीं दुखणींबाणीं या मुलांनाहि आलीं. पण देवाच्या दयेनं तीं विकोपाला गेलीं नाहीत. नाही म्हणा-यला विश्वासच्या गोवरानं दोन दिवस माझ्या तोंडचं पाणी पळविलं. वाटलं पोर दगा देतंय की काय? डॉक्टरसुद्धा भ्यालेले दिसले. त्यांनी म्हटलं, "आपण आपल्याकडून प्रयत्नांची शिकस्त करायची. होणं जाणं देवाच्या हातांत." त्यांचं हें गुळमुळीत बोलणं ऐकून माझा धीर सुटल्यागत झाला. माझ्या डोळ्यां-तून आपोआप पाणी ठिबकायला लागलं. मंत्रातंत्राच्या नादाला मी कधी लागत नाही आणि नवसासायासाच्या भरीलाहि मी कधी पडत नाही. पण पोर डोळे फिरवायला लागलेलं बघून मला वाटलं, पलीकडल्या चंद्रामावशी मुलाच्या दुखण्यावर मंत्र घालतात त्यांना बोलवावं आणि कांहीतरी नवस बोलावा. पण तो बोलण्याआधीच विश्वासच्या प्रकृतींत उतार पडतोसा दिसला. खस्ता खाल्ल्या त्यांचं चीज झालं. लेकरूं बरं झालं. तो बरा झाल्याच्या आनंदाप्रीत्यर्थ अनाथ अर्भकालयाला पांच रुपये मदतीदाखल पाठविले.

आशानं मात्र कसला म्हटल्या कसलाहि त्रास मला दिला नाही. निकोप प्रकृतीची देणगी घेऊनच ती जन्माला आली आहे असं मला वाटायचं. विश्वास-

बद्दल माझ्या मनांत कमी प्रेम होतं असं नव्हे, पण त्यांतल्या त्यांत सरस निरस ठरवायचं झालं तर आशानं माझ्या मनाची अधिक पक्कड घेतली होती. तिचा लाडका चेहरा, गोड बोलणं, आणि सर्वांत मोठा समजूतदारपणा, या गुणांनीं ती पोर कुणाचीहि आवडती होण्यासारखीच होती. तिची बुद्धिहि चांगली. तिला शाळेंत घातल्यावर तिची प्रगति पाहून तिच्या बाई कौतुकाचे उद्गार काढायच्या. ते ऐकले म्हणजे मला मोठा हर्ष व्हायचा आणि मी मनांत म्हणायची, " पोरगी शिकेल तितकं शिकवायचं. ती शिकते म्हणेल तें शिकवायचं. प्रोफेसरीण, डॉक्टरीण करून तिला आपलं नांव काढायची संधि द्यायची. "

विश्वाससुद्धा बुद्धिनं वाईट नव्हता. पण त्याचं लक्ष शाळेंतल्या अभ्यासाकडं नसायचंच. पहिल्या दुसऱ्या इयत्तेंत तो चांगल्या प्रकारें पास झाला तिसऱ्या इयत्तेच्या परीक्षेंत त्यांचा नंबर सोळा सतरावा गेला. चवथींत तर गणितांत त्याला तीन मार्क कमी पडले. आणि तेवढे मोहब्बतीखातर घालून मास्तरांनी त्यावर पासाचा शिक्का मारला. अभ्यासापेक्षा खेळांत व इतर चाळ्यांतच त्याचं लक्ष अधिक असायचं हें आम्हांला दिसत होतं. मी त्याला बळेंबळें अभ्यासाला बसवायची, आणि कधी कधी दटावायचीसुद्धा. पण वारूताई रागवायची माझ्यावर. ती म्हणायची ' कां उगीच रागावतां त्याच्यावर ? लहानपणीं मुलं खेळकर असायचींच. उद्यां मोठा झाल्यावर त्याचं त्याला कळूं लागेल आणि तो आपोआप अभ्यास करील. ' विश्वासवर वारूताईचा फार जीव. त्याला कांही म्हटलेलं खपायचं नाही तिला.

पण कुणीतरी आपला कैवार घेतं एवढा धीर असल्यावर मुलं जास्तच शेफारतात व धाक दाखवणाऱ्याला दाद देत नाहीत. तसं व्हायला लागलं विश्वासचं. अभ्यासाची टंगळमंगळ आणि इतर चाळ्यांची त्याची ओढ वाढत चालली. वहीवर उदाहरणं सोडवण्याऐवजी चित्रं निघायला लागलीं. शब्द कविता घोकण्याऐवजी शाडूचे बैल, बाहुल्या करण्यांत तो गर्क होऊं लागला. त्याला कसलं नवं गमतीदार चित्र दिसलं की त्याची नक्कल आपल्या वहींत करायची हा त्याचा उद्योगच होऊन बसला ! ती नक्कल अगदी हुबेहूब उतरत असे असं नाही. पण ओळखायला येईल इतका हुबेहुबपणा त्यांत असा-

यचा हें मात्र खरं. एकदा त्यानं स्वेटर करीत बसलेल्या वारूताईचं म्हणून चित्र काढलं. खाली श्रीयुत वारूताई असं लिहिलं होतं! विश्वासचीं वह्या पुस्तकं जागच्याजागीं कधी ठेवलेलीं असायचीं नाहीत. खोलीभर पसरलेला असायचा बाजार आणि तो आशानं नाहीतर आम्ही कुणीतरी आवरून ठेवायचा! आशाला आवराआवर करतांना त्याचं तें चित्र दिसलं आणि त्याची तिला इतकी मौज वाटली की तिला हसूं आवरेना. ती विश्वासची चित्रमय वही घेऊन धावतच माझ्याकडं आली आणि म्हणाली "ताई, श्रीयुत मावशी पाहिल्या आहेस का तूं कधी?"

"म्हणजे काय ग तुझं विचारणं? मावशी आणि श्रीयुत?"

"हो हो. मावशी—वारूताई आणि श्रीयुत! नवी पदवी मिळालीय मावशीला!"

हें गौडबंगाल काय आहे याचा आम्हाला बोध झाला नाही, तरी हा विश्वासचा कांहीतरी पराक्रम असणार हें ओळखायला आम्हांला वेळ लागला नाही. "या राजेश्रींचा असेल कांहीतरी वात्रटपणा" असं म्हणून वारूताईनं वही आशाच्या हातून हिसकून घेतली आणि तें चित्र पाहून रागावण्याऐवजी हंसतच राहिली तीहि. मी तें चित्र पाहिल्यावर मलाहि हसूं आवरेना.

चित्र या दृष्टीनं तें खरोखरच गमतीदार निघालं होतं. चेहरा नव्हता साधला, पण बैठक बरोबर निघाली होती. विणकामांत गर्क असलेल्या स्त्रीची कल्पना त्या चित्रावरून चांगल्या प्रकारें येत होती. पण चित्राच्या बरेवाईटपणापेक्षा त्याखालच्या श्रीयुत या पदवीची मौज मला फार वाटली. विश्वासनं अडाणी-पणानं दिलेली ती पदवी पुढं पुष्कळदा आणि अजूनहि कधी कधी मी गमतीनं वापरीत आलें आहे. 'बरं का श्रीयुत' 'तुमचं काय म्हणणं आहे श्रीयुत' असं म्हटलं म्हणजे माझ्याबरोबर वारूताईहि हंसायची.

मुलांमधील उपजत प्रवृत्ति लक्षांत घेऊन पालकांनी आणि शिक्षकांनी त्यांची वाढ करावी असं शहाणीं माणसं म्हणतात. पण त्याप्रमाणं आचरण कितीजण करीत असतील कुणास ठाऊक! शाळेच्या एकच एक ठराविक चाकोरींत आपल्या मुलांना हाकत न्यायचं, त्या चाकोरींतून त्या मुलाची चाल सुरळीत

होत नाही, तें त्या वाटेवर ठेचकाळतं, पडतं, हें दिसत असूनसुद्धा हाणामारी करून त्या वाटेनंच त्याला दडपीत न्यायचं, असा प्रकार चोहोंकडं चाललेला असतो. त्यामुळं मुलांच्या जन्माची नासाडी होते हें दिसत असूनसुद्धा शहाण्या-सुरत्या माणसांचेहि डोळे उघडत नाहीत. विश्वासच्या बुद्धीचा कल पुस्तकी विद्येकडं नाही, त्याची बुद्धि कलावंताची आहे, हें मला दिसत होतं पण तें मला उमगलं मात्र नाही. त्यानं चित्र काढलं—आपल्या अक्कलेनं काढलं, यावरून त्याच्या ठिकाणीं चित्रकार छपून राहिला आहे याचा मला उमज पडायला हवा होता. त्यानं एकदा गणपति केला. आपल्या शाळेच्या गणेशोत्सवांत तो बसवावा अशी त्याला फारफार इच्छा होती. विश्वासचा गणपति गचाळ झाला होता असंहि नाही. तो अगदी उत्कृष्ट झाला होता असं नाही मी म्हणत, पण बरा झाला होता त्याच्या नवशिकेपणाच्या मानानं. त्याच्या मास्तरांनी शाळेच्या विद्यार्थ्याचा म्हणून तरी विश्वासचा गणपति बसवायला हवा होता. तो बसविला असता तर त्याला प्रोत्साहन मिळालं असतं, त्यानं अधिक आस्थेनं सराव वाढविला असता आणि पुढील वर्षी खरोखरच सुंदर गणेशमूर्ति आपल्या शाळेतील उत्सवाला करून दिली असती. पण मुलांतील कलागुणाला पालकांप्रमाणं शिक्षकांची अनास्था नडते ती अशी.

मींहि विश्वासच्या गणपतीचं त्याच्या हौसेप्रमाणं कौतुक केलं नाही. त्याच्या गणपतींत सुबकपणा नव्हता म्हणून नव्हे, पण देवदेवतांचीं नवरात्रं अन् अनुष्ठानं यावर माझी श्रद्धा नसल्यामुळं माझ्या बिऱ्हाडीं मी गणपतीचं स्तोम माजवीत नव्हतें. मी आजपर्यंत कधी गणपतीच काय पण दुसरा कोणताहि देव बसविला नव्हता. मग याच वर्षी कशाला ती उसाभर हवी, म्हणून घरीं गणपति बसवायची विश्वासची इच्छा मी दडपून टाकली. आपली श्रद्धा म्हणून नव्हे, पण मुलाची हौस म्हणून असे उत्सव समारंभ करायला काय हरकत होती मला ? मुलाची वेडीविद्री किंवा उपद्रवकारक हौस वडील माणसांनी पुरवूं नये हें ठीक आहे, पण गणपति बसवणं, त्याची पूजा आरति करून घेणं, खिरापत वाटणं, यांत मला कसला त्रास होता ? पण मला त्या वेळीं रावजींचे विचार आठवले. ते म्हणत असत—' देवभोळेपणा हा सुरवातीला साधा आणि गोजिरवाणा वाटतो. गजकर्णाचा आरंभ साध्या पुरळापासून होतो. पण तें पुरळ

खाजवतां खाजवतां पसरत जातं, जितकं खाजवावं तितकी मजाहि येते पण शेवटीं भगभग होऊन टिपं गाळायची पाळी येते. देवभोळेपणाचंहि असंच होतं. एकाबरोबर दुसरा मौज पहायला म्हणून पंढरीला जातो, ऐकायला गोड लागतं म्हणून भजन ऐकायला बसतो आणि भाबड्या लोकांचा तल्लीनपणा पाहून त्याचं मन आणि विचारशक्ति बधिर होऊन तोहि त्यांच्याबरोबर टाळ कुटायला लागतो. म्हणून विचारी माणसानं गंमत म्हणूनसुद्धा देवाच्या वाटेला जाऊं नये.'

रावजींच्या या शिकवणीप्रमाणं मी वागत आलें असल्यामुळं विश्वासची गणपति बसविण्याची इच्छा मी मनावर घेतली नाही. मी उलट त्याची थोडी थट्टाच केली. मी म्हटलं, " अरे, गणपति बसवायचा तो मोदकाचा नैवेद्य आणि पंचखाद्याची खिरापत मिळावी म्हणूनच ना ? मी गणपति न बसवतांच तुला एक दिवस पोटभर मोदक करून वाढतें, आणि डबाभर पंचखाद्य करून ठेवतें. हवं तितकं खा."

मोदक पंचखाद्याची विश्वासच्या मनांत कल्पनाहि नव्हती. त्याला आपल्या गणपतीचं कोडकौतुक केलेलं पहायचं होतं. तें मास्तरांप्रमाणं माझ्याकडूनहि झालं नाही. मोदक पंचखाद्याच्या आमिषानं त्याच्या तोंडाला पाणी सुटायच्याऐवजी माझ्या नकारामुळं त्याच्या तोंडावर कडवटपणाच उमटलेला मला दिसला. पण त्यांतलं मर्म उमगण्याऐवजीं मला वाटलं अजाणपणामुळं त्याला तसं वाटतं, जाईल विसरून थोड्या वेळांत आणि पुढं मोठा झाल्यावर मी करतेंय तें बरोबर आहे असं तोच म्हणेल.

विश्वासच्या हौसेवर असं विरजण मास्तरांच्याकडून आणि माझ्याकडून पडलं, तरी वारूताईनं त्याची इच्छा मान्य करायचं ठरवलं. ती म्हणाली ' ताईंना नको असलं तर नसेना, तूं नि मी मिळून गणपतीचा उत्सव करूं या.' सोप्यावरच्या कोनाड्याला सारवून रंग लावून तिनं जागा तयार केली. रात्रभर जागून वारूताईनं आणि विश्वासनं मखर बनविलं आणि गणेशचतुर्थीच्या दिवशीं विश्वासचा गणपति बसला. आशाहि त्यांच्या उत्सवांत सामील झाली. तिनं शिताफळं, डाळिंबं, कवठं, पेरू जमविले तोरण बांधायसाठीं. आणि देवापुढं छान रांगोळी काढली. सर्वांचाच उत्सव सुरू झाल्यावर मलातरी कसं स्वस्थ

बसवेल ? मी त्यांची थट्टा करीत करीत का होईना, त्यांच्या आरतिधुपारती आणि खिरापतींत भाग घ्यायला लागलें.

विश्वासचं शाळेंतल्या अभ्यासाकडलं दुर्लक्ष आणि चित्रकलेकडची ओढ दिवसेंदिवस वाढत चालली. तो आता इंग्रजी शाळेंत जाऊं लागला होता, परंतु एखाद्या विषयांत तरी तो नापास व्हायचाच. मास्तरांच्या वशिल्यानंच त्याला वरच्या वर्गांत चढवावा लागे. ड्राईंग मास्तरांचा मात्र तो आवडता झाला. ड्राईंगच्या परीक्षेला त्यांनी त्याला बसाविलं आणि त्या परीक्षेंत तो उत्तम प्रकारें पास झाला.

वारूताईकडून त्याच्या कलाप्रीतिला सहानुभूतीचं पाणी मिळत असलं तरी मला तो एक निरर्थक चाळा वाटत होता. मी त्याला प्रोत्साहन तर दिलं नाहीच पण वेळ प्रसंगीं त्याला रागंहि भरत असें. उशीचा अभ्रा भरायसाठी त्यानं आशाला वेलबुट्टी काढून दिली पण त्याचं कौतुक करण्याऐवजीं पांढरा सफेत अभ्रा शाईनं खराब केल्याबद्दल मी त्याला बोललें. ही माझी चूक झाली असं आतां मला कळतंय. पण आता त्याचा काय उपयोग आहे ?

विश्वास व्रात्य नाही. नुसत्या डोळ्याच्या दटावणीनं त्याचा हट्ट सुटतो असं मला समजून आलं होतं. एकेकांच्या मुलांचं पाहिलं म्हणजे त्यांच्यापेक्षा माझा विश्वास शंभरपट बरा असं मला वाटायचं. पण त्याच्या मनाच्या स्वाभाविक प्रवृत्तीला माझा विरोध मानवेना. ती त्या विरोधाविरुद्ध उचल खाऊं लागली. हें माझ्या वेळींच लक्षांत आलं नाही.

विश्वास आता पंधरा वर्षांचा झाला. पांचवीपर्यंत त्याचा गाडा ढकलत गेला. ड्रॉइंगच्या दुसऱ्या परीक्षेंत तो पास झाला. त्या परीक्षेसाठी तो शहरगांवीं गेला होता. तिथं म्हणे त्याला कोणी मूर्तिकार भेटले. कोणी शिकायला आला तर आपण आपली कला त्याला शिकवूं असं ते म्हणाले. विश्वासच्या मनाला त्यांची ओढ लागली. मला किंवा वारूताईला विचारलं तर आम्ही संमति देणार नाही हें त्याला माहित होतं. आपणाला त्यांच्याकडे जावसं वाटतं असं तो आशापाशीं बोलला होता, पण तिनंहि त्याचा विचार खुळेपणाचा ठरविला असं आम्हांला कळलं.

पण मूर्तिकार, चित्रकार होण्याची त्याची महत्वाकांक्षा अनावर झाली. एके दिवशीं कुणालाहि मागमूस लागूं न देतां फडताळांतले पंधरावीस रुपये घेऊन तो नाहीसा झाला. रात्रीं दहा वाजेपर्यंत तो घरीं आला नाही, तेव्हा आमच्या उरांत धडधडूं लागलं. जिथं जिथं म्हणून तो जाणं शक्य होतं तिथं तिथं आम्ही शोध केला पणं पत्ता नाही.

एक दोन म्हणतां पंधरा दिवस झाले, महिना उलटला, विश्वासचा पत्ता लागेना. तो कोणातरी शिल्पकाराकडे गेला असला पाहिजे हें आम्हांला कळलं; पण हे शिल्पकार कोण कुठल्या गांवचे तें आम्हांला कळेना. ड्रॉइंग मास्तरांनी आपल्या ओळखीच्या ठिकाणीं पत्रं लिहून चौकशी केली पण निराशाजनक उत्तरंच आलीं. पोर गेला. तो कुठंहि गेलेला असो, असेल तिथं सुखी असूं दे अशी आम्ही देवाला प्रार्थना करीत होतो.

आशेला आधारच दिसेना. विश्वासनं आमच्या मनावर केलेला आघात जबरदस्त होता. आम्ही हौसेनं लावलेला, प्रेमानं वाढवलेला वेल दैवानं उपटून नेला. मला कांही सुचेनासं झालं. ज्याच्यावर जीव जडला तें लाडकं लेकरूं नाहीसं झालं म्हणून तर मनांत कालवाकलव होत होतीच, पण आतापर्यंतच्या आपल्या जीवनाच्या यात्रेंत जीं जीं सुखाची साधनं निर्माण करून ठेवलीं आहेत, तींतरी आपणास निरंतर लाभतील का? या पोरटयाप्रमाणं तीहि दगा देतील या शंकेनं मी बावरून गेलें.

आशा आणि वारूताई यांच्या मनःस्थितीचं वर्णन मी कसं करूं? आशा आता जाणती झालेली असली, तरी अजाणहि होती. सोळा सतरा वर्षांची पोर ती. कळतं पण कळत नाही असं तिचं वय. सख्ख्या भावापेक्षा विश्वासवर तिची ममता तिळभरहि कमी नव्हती आणि असावी तरी कां? कळायला लागायच्या आधींपासून तीं लेकरं एके ठिकाणीं आलीं, एकाच छायेखाली नांदलीं. एकजीव झालीं. विश्वासनं वेळप्रसंगीं तिच्याशीं तुसडेपणा केला तरी तिनं त्याला कधी तोडलं नाही. उलट ती त्याला चुचकारून त्याचं मन धरून असायची. जेवतांना खातांना आधी विश्वासनं घेतलं की नाही हें पाहायची आणि मगच तिच्या घशाखाली घास उतरायचा. खेळाच्या नादांत एकादे वेळीं त्याला घरीं यायला रात्र झाली तर तो दिसेपर्यंत आशा सात वेळां दारापर्यंत

येरझारा घालायची. शाळेंतल्या त्याच्या व्रात्यपणाबद्दल, त्याच्या मठ्ठपणाबद्दल कुणी कांही कागाळी केली तर तीं दूषणं आपणालाच चिकटलीं असा ओशाळेपणा आशेच्या चर्येवर यायचा. विश्वास रुसण्यारागाच्या भरांत आशाशीं कधी तुसडेपणानं वागला, तरी त्याच्या अंतर्यामीं तिच्याविषयीचा जिव्हाळाच नव्हता असं मात्र नाही. ती घरांत दिसली नाही तर तो बेचैन होई. तुझं माझं जमेना आणि तुझ्यावाचून गमेना असा त्याचा प्रकार व्हायचा. आशाला एकदा ताप आला व तो चार दिवस उतरला नाही. मी आणि वारूताई काळजींत पडलों. विश्वासला सांगतां येत नव्हतं पण तोहि ताईच्या तापानं घाबरला होता. तो वारूताईला म्हणाला—

" मावशी, मी दुपारीं सुरगांवला जाऊन येऊं का ?"

" तें रे कशाला ?" वारूताईनं विचारलं.

" किनई मावशी, सुरगांवला एक म्हातारा अंगारा देतो. त्यानं दुखणीं जातात असं किशा शेलार म्हणत होता. डॉक्टरनासुद्धा जीं दुखणीं बरीं करतां येत नाहींत तीं दुखणीं तो म्हातारा अंगाऱ्यानं बरीं करतो, असं म्हणत होता तो. ताईला तो अंगारा आणून लावला तर तिचा ताप जाईल. मग जाऊं ?"

" बघूं आणखी दोन तीन दिवस औषध देऊन. ताप नाहीं उतरला तर–"

वारूताईनं अंगाऱ्याचं विश्वासचं वेड असं बाजूस सारलं. पण त्या वेडांतून आशाविषयीचा त्याचा जिव्हाळा प्रगट झाला तो तिला आणि मला मोठा गोड वाटला.

एकमेकांशीं अशी एकरूप झालेलीं तीं दोन लेकरं आज एकमेकापासून दूर झालीं. आशाच्या डोळ्याचं पाणी खळेना. आमच्या मनांत होणारी कालवाकालव कुणाला कशी सांगायची ? पण आशाची समजूत घालण्यांत आणि तिला धीर देण्यांत वारूताईची व माझी तारांबळ उडत होती !

वारूताई नी मी एकमेकींना सावरण्याची धडपड करीत होतों. विश्वासच्या आठवणीनं माझ्या डोळ्यांत पाणी उभं राहिलं की वारूताई म्हणायची, " पोरस्वभावामुळं तो निघून गेला असला तरी लवकरच येईल परत. त्यालातरी तुमच्यावाचून कसं चैन पडेल बाहेर ? मुळीच काळजी नका करूं तुम्ही. "

मला असा धीर देणारी वारूताई वेळ आली म्हणजे माझ्यापेक्षा दसपट

विव्हळ व्हायची. एके दिवशीं एका वकिलाकडली मागणी आली म्हणून आम्ही अनारसे करायला घातले. पहिला अनारसा कढईतून काढला मात्र-वारूताईनं गुडघ्यावर मान ठेवून मुसमुसून रडायला सुरवात केली.

" कां ग ? " मी घाबरून विचारलं.

वारूताई किती वेळ तरी बोलेनाच ! अखेर तिच्या अंतर्यामींच्या वेदना बाहेर पडल्या. ती म्हणाली " विश्वासला अनारसे किती आवडायचे ! दिवाळींत फराळाचं इतकं व्हायचं पण अनारशाशिवाय कांही म्हटल्या कांही आवडीनं खायचा नाही. परवांच म्हणाला होता, आतां अनारसे कधी करशील म्हणून. तें कांही घडलं नाही माझ्या हातून. "

सांगायची गोष्ट एवढीच की विश्वासचं निघून जाणं आम्हां तिघींनाहि कासावीस करीत होतं. कालगतीनं दुःखाचा विसर पडतो आणि मन दुसऱ्या विषयांत रमतं हें खरं असलं, तरी पहिलं दुःख समूळ ओसरतं असं मात्र नव्हे. विश्वासची आठवण आम्हांला हरघडी येत होती, आणि त्याच्या चिंतेनं मनाची कालवाकालवहि होत होती. आमचा जीवनक्रम वरकरणी मात्र सुसूत्र चालू झाला होता !

आपत्तीनं एकदां मन पोळलं म्हणजे तें भित्रं बनतं. विश्वास मनाला चटका लावून नाहीसा झाला, तेव्हांपासून आशा वारूताई यांच्याविषयींहि मला भीति वाटूं लागली. फार काय आक्का, बापू, बाळाभाऊ यांच्यासारखीं जीं माणसं मी जोडलीं त्यांच्या प्रेमाचा लाभ मला अखंड मिळत राहील की त्यांतहि गोता खावा लागेल, अशा विचारानं मन बावरूं लागलं. बोलूनचालून हें चिकटविलेलं नातं. आज तें अगदी घट्ट झाल्यासारखं वाटलं तरी उद्यां तें निखळून न पडेल म्हणून तरी कशावरून ? मी माया जोडली हा माझा खुळेपणा तर झाला नाही ? अशा एक ना अनेक विचारांचा-शंकांचा धुमाकूळ माझ्या मनांत सुरू असे.

पण त्या वेळींच माझं मन म्हणे, एक डाव हुकला म्हणून सर्वच डाव हुकतात असं कशावरून ? आणि तसे हुकूं दिले तर खेळणाऱ्याचं चातुर्य तें काय ? पहिला डाव कां हुकला, तो जिंकण्यासाठी कोणती सावधगिरी घ्यायला

हवी होती, हें ओळखून नव्या डावाला सुरुवात करायला पाहिजे. मी तशी करणार. मी यापुढं डाव गमवणार नाही.

विश्वासच्या बाबतींत माझ्या अंगाशी आलेली चूक मला उमगली होती. त्याच्या बुद्धीच्या नैसर्गिक कलाकडं मी डोळेझाक केली, फार काय त्याच्या कला-प्रीतीवर विरजण घालण्याचा खुळेपणा मी केला. ही चूक आशाच्या बाबतींत करायची नाही असं मी ठरवून टाकलं. आशा शाळेच्या अभ्यासांत रमलेली असली, आणि शाळेच्या परीक्षेंत ती पहिल्या नंबरला पास होऊन बक्षिसं मिळवीत असली, तरी तिच्या मनांतहि संगीताची आवड सूक्ष्म स्वरूपांत का होईना पण आहे, हें मला दिसून आलं होतं. वारूताईप्रमाणं तिचा आवाजहि गोड होता. वारूताई देवादिकांचीं जुनीं गाणीं जितकी गोड म्हणे, तितकाच गोडवा आशाच्या कवितागायनांत प्रत्ययास येई. त्या दोघी एकमेकींस आग्रह करून गाणीं म्हणायला लावायच्या आणि त्यांत रंगूनहि जायच्या.

मी आशाला गायन वादन शिकवायचं ठरविलं. गांवांत बराच बोलबाला झालेलं रसाळ संगीत विद्यालय होतं त्यांत आशाला पाठवावं असं मनांत आलं. आक्का बापूंना विचारून काय तें ठरवावं असं मी योजलं. पण माझा तो विचार बदलण्याला एक अवचित कारण घडलं. त्या विद्यालयांतली एक मुलगी तिथंच पेटी शिकायला येणाऱ्या एका तरुणाबरोबर पळून गेली असं माझ्या कानांवर आलं. खरं खोटं देवाला माहित, पण विषाची परीक्षा पहायचीच कशाला या विचारानं माझा पहिला बेत मी रद्द केला. तरी पण आशाला संगीत शिकवायचा माझा विचार मंदावला नाही. तपासांत राहिलं म्हणजे आज ना उद्या हवं असेल तें मिळतं. मला कंठे नांवाच्या एका कलावंताची माहिती लागली. कंठे बऱ्यापैकी गायक होते. वादनांत तर त्यांचा हातखंडाच होता. वयानं पस्तीस चाळीसचे असतील. परंतु त्यांच्यावर दैवाची अवकृपा झालेली होती. लहानपणींच कसलंसं दुखणं विकोपाला जाऊन त्यांना अंधत्व आलं होतं. अर्थातच लग्नकार्य झालेलं नव्हतं. आपल्या आईच्या आधारावर ते जगत होते. गायनवादनावर ते पैसे बरे मिळवीत असल्यामुळं त्यांना खाण्यापिण्याची ददात नव्हती. त्यांची प्रकृती निकोप होती आणि सरावामुळं गांवांत ठराविक ठिकाणीं ते अचूक ये जा करीत. एक अंधळेपणा सोडला तर कंठ्यांच्या जीवनांत कसली

कमतरता नव्हती. पण अंधळेपणा म्हणजे का लहानसहान वैगुण्य? जीवनांत आनंद निर्माण करणाऱ्या कितीतरी गोष्टींना त्यांना मुकावं लागलं होतं.

मी कंठे यांची भेट घेतली. त्यांच्या बोलण्यावरून ते भले माणूस आहेत असा माझा ग्रह झाला. ‘ माझ्या मुलीला गायनवादन शिकवाल का ’ असं मी विचारलं, तेव्हा ते हंसून म्हणाले, ‘ उपाशी माणसाला जेवाल का असं विचारण्यासारखंच आहे हें. हा तर माझा पोटाचा धंदा आहे आणि त्यापेक्षाहि माझ्या आवडीचा विषय आहे. मी त्याला नकार कसा देईन? ’

शिकवणीचं नक्की झालं. एक दोनदां सोबत मिळाल्यावर पुढं आपलं आपण माझ्या घरीं यायचं त्यांनी मान्य केलं. तासभर शिकवणीचे दहा रुपये ठरले. अंधळा शिक्षक बायकांना बिनधोक्याचा ही माझ्या दृष्टीनं दुसरी समाधानाची गोष्ट होती.

शिकवणी सुरू झाली. आशाला जें हवं होतं तें मिळालं. ती शाळेंतल्या अभ्यासाप्रमाणं या नव्या अभ्यासांतहि रंगूं लागली, प्रगति दाखवूं लागली. शिष्य शिकतो असं दिसल्यावर गुरूलाहि शिकविण्यांत उल्हास वाटूं लागतो. कंठेबुवा आशाला उल्हासानं शिकवूं लागले. ‘ आशाताई माझ्या शिकवणीचं चीज करील ’ असं त्यांनी पांच दहा वेळांतरी मला सांगितलं असेल. आशानं त्या वर्षीच्या शाळेंतलि वार्षिकोत्सवांत गायनाचंहि पहिलं बक्षीस मिळवलं हें पाहून तिच्यामाझ्यापेक्षा कंठेबुवांनाच खरी धन्यता वाटली.

आशा आता सोळा वर्षांची झाली होती. इंग्रजी सहावीची वार्षिक परीक्षा जवळ आली होती. त्या परीक्षेंत आपला पहिला नंबर सोडायचा नाही अशा निश्चयानं तिनं आपला अभ्यास चालविला होता. कंठेबुवापाशी गायनवादनाची तालीमहि ती मन लावून करीत होती. कारण पंधरा दिवसांनीच साहित्य सेवा मंडळातर्फे भावगीताच्या चढाओढी व्हायच्या होत्या व त्यांत भाग घेण्याबद्दल तिनं नांव दिलं होतं. कंठेबुवांनी तिच्यासाठी एक सुंदर भावगीत निवडलं होतं. तें भावगीत म्हणायला गोड, तसं अर्थानंहि रसाळ असल्यानं मोठं परिणामकारक वाटत असे. आशा तें सारखं गुणगुणत असायची आणि वारूताईनंहि ऐकून ऐकून मुखोद्गत केलं होतं तें. तीहि आपल्या मधुर आवाजानं सुरेख

म्हणायची. आशा एकदा म्हणालीसुद्धा ‘ मावशी, माझ्यापेक्षा तूंच चढाओढींत म्हण हें भावगीत. पहिलं बक्षीस तुला हमखास मिळेल.’

आशाचं म्हणणं मुळीच खोटं नव्हतं. ‘ दैव हें अत्यंत विघ्नसंतोषी आहे. सुखाच्या जीवाला रडविण्यांतच त्याला धन्यता वाटते. पण माणूस हा दैवापेक्षाहि सामर्थ्यवान आहे. प्रेमाचं अमृत तो प्याला आहे. त्यामुळं तो दुर्दैवानं लावलेल्या आगींतूनहि शाबूत राहतो एवढंच नव्हे तर नवं प्रेममय जीवन निर्माण करतो ’ असा त्या गीतांतला भावार्थ होता. वारूताई दुर्दैवाच्या तावडींत सुखाला वंचित झालेली असल्यानं त्या गीताशीं तिचं मन समरस होत होतं आणि त्यामुळं तिच्या गायनांत विशेष जिव्हाळा आणि गोडवा प्रतीत होत होता की काय कुणास ठाऊक !

शाळेप्रमाणं काव्यगायनांतहि आशेनं पहिला नंबर मिळविला. या यशानं तिच्यापेक्षा कंठेबुवांना आणि मला व वारूताईला अतिशय आनंद झाला. यांत दुसरी एक गोष्ट झाली ती म्हणजे आशाला काव्यगायनाचीं निमंत्रणं यायला लागलीं. ज्यांनीं चढाओढींत तिचं काव्यगायन ऐकलं होतं, अशा कांही रसिकांनी तिला घरीं बोलावून तिचीं भावगीतं ऐकलीं आणि तिला लहान मोठीं बक्षीसं दिलीं. स्थानिक लोकांत तिचं काव्यगायन लोकप्रिय झालं तें तिच्या स्वरमाधुर्यामुळं तर झालंच, पण तिच्या अभिनयामुळंहि तें प्रभावी वठलं होतं. तिच्या या अभिनयकौशल्यामुळं नाट्य-महोत्सवांत तिनं भूमिका करण्याबद्दल चालकांनी गळ घालायला प्रारंभ केला. नाटकांत भूमिका करणं मला गैर वाटत नसलं, तरी पुरुषांच्या मेळाव्यांत तरूण मुलींनी वावरणं मला सुरक्षित वाटत नव्हतं. नाट्य-महोत्सवांत गावांतील सभ्य स्त्री पुरुष नाट्य प्रयोग करणार होते आणि त्यांत भाग घेतांना कसला अनुचित प्रकार घडेल असा संशय घ्यायला जागा नव्हती. तरीदेखील माणसाच्या मनाचा भरंवसा काय ? स्त्रीविषयीं पुरुषाचं मन कोण्या वेळीं कशी उसळी घेईल याची धाकधुक वाटत होती. माझ्यासारख्या कुरूप स्त्रीकडंहि पुरुषाची कामुक दृष्टि वळते हा अनुभव मला आला होता. आणि म्हणूनच आशासारख्या रसरसलेल्या सुंदर मुलीची जपणूक अधिक दक्षतेनं केली पाहिजे असं माझं मन मला बजावत होतं. मी चालकांच्या मागणीला नकार दिला.

पण चालक निराश होऊन स्वस्थ बसणारे नव्हते. त्यांनी आपल्या महोत्सवांत आशेच्या कलागुणांचं प्रदर्शन करण्याचा आपला निर्धार दुसऱ्या मार्गानं तडीस नेला. त्यांनी भगिनी मंडळाला केवळ स्त्रियांचा असा नाट्यप्रयोग बसविण्याला सुचविलं व त्या प्रयोगांत आशाला प्रमुख भूमिका देण्याचा बेत आखला. कुलीन स्त्रियांबरोबर काम करण्याला नकार देणं कठीण झालं, द्यायचं कारणहि नव्हतं. शाळेच्या अभ्यासाची सबब सांगावयालासुद्धा वाव नव्हता, कारण हा नाट्य-महोत्सव उन्हाळ्याच्या सुट्टींतच व्हाचा होता.

भगिनी मंडळांत 'माईची माया' नाटक बसविलं होतं. आशाकडं माईसाहेबांच्या असहाय्य सावत्र मुलीची–पुष्पाची–भूमिका देण्यांत आली होती. कथानकाच्या दृष्टीनं ही भूमिका प्रमुख नसली, तरी तिचं स्वरूप करुणरम्य होतं. तिच्यासाठी एका कवीनं तीन सुंदर गाणीं रचून दिलीं होतीं व कंठेबुवांनीच तीं बसवून घेतलीं होतीं. तीं अत्यंत प्रभावी वठलीं. नाट्यमहोत्सवाच्या अध्यक्षांनी समारोपाच्या भाषणांत आशाच्या गायनाभिनयाबद्दल प्रशंसा करून स्वतःचं असं पंचवीस रुपयांचं बक्षीस तिला दिलं. इतर रसिकांनीहि तिला रोखीचीं आणि विविध वस्तूंचीं बक्षिसं दिलीं. वर्तमानपत्रांतून तिच्याविषयी प्रशंसापर मजकूर प्रसिद्ध झाला.

एकांतून दुसरं निघतं तसं या खेपेसतरी कसं न होईल? भगिनी मंडळाला स्वतःची इमारत नव्हती आणि त्यासाठी निधि जमावण्याचा मंडळाचा उद्योग आधीपासून चालूच होता. त्या निधीच्या मदतीसाठी या नाटकाचा प्रयोग करण्याचं त्यांनी ठरवलं आणि तो यशस्वी झालेला पाहून शेजारच्या दुसऱ्या शहरांतहि प्रयोग करण्याची कल्पना निघाली. एक नव्हे दोन नव्हे, सात आठ ठिकाणीं प्रयोग झाले आणि मंडळाचा उद्देश अपेक्षेपेक्षा अधिक फलद्रूप झाला. कांही आढ्यतेखोर आणि अहंमन्य बायका आपल्या कामामुळंच नाटक इतकं रंगतं असं मानत आणि म्हणत असल्या, तरी जाणतीं माणसं आशाच्या कामामुळंच प्रयोग चित्ताकर्षक होतो असं उघड उघड सांगत. कुणाच्या कामामुळं का होईना, हातीं घेतलेलं काम चांगलं वठलं आणि मंडळाच्या इमारतनिधींत घसघशीत भर पडली याचं मला समाधान वाटलं.

हा विषय संपला असं मी मनांत म्हणतें, इतक्यांत एके दिवशीं 'आमचे

प्रतिनिधि आपणांस एक-दोन दिवसांत येऊन भेटतील आणि आमच्या वतीनं ते जी विनंति करतील तिला आपण मान्यता द्याल अशी आशा आहे ' अशा आशयाचं एक पत्र भगिनीमंडळामार्फत मजकडे आलं. आशाच्या गाण्यांच्या ध्वनिमुद्रिका घेण्याबद्दलची ती मागणी होती. त्याबद्दल मोबदला भरपूर मिळणार होता. मी अशी संधि वाया कशी दवडीन ? ग्रामोफोननंतर नभोवाणीचंहि आमंत्रण आलं. आशाचं संगीत इतकं गाजेल असं ध्यानींमनींहि नव्हतं. पण ध्यानींमनीं नसलेल्या गोष्टीच आयुष्यांत घडतात. कित्येक सुखदायक घडतात, कित्येक जीवाचं पाणी पाणी करतात इतकाच फरक !

नभोवाणीचा कार्यक्रम उरकून आशा आणि वारूताई परत आल्याच्या दुसरे दिवशींची गोष्ट. आम्ही रुखवताच्या जिनसांची मागणी पुरी करायच्या तयारीला लागलों होतों. इतक्यांत बाळाभाऊंची दरवाजांतून हांक आली. मी पुढं होऊन पाहातें तों बाळाभाऊ आणि त्यांच्याबरोबर हिंदुस्थानी पोषाखांतील त्यांच्याच वयाचा एक गृहस्थ आलेले दिसले. त्यांच्यामागं एक ओझेवाला हमालहि आलेला दिसला. हें काय प्रकरण आहे अशा आश्चर्यानं मी त्यांच्याकडं पाहूं लागलें.

ओटीवर सतरंजी पसरून मी पाहुण्यांना बसण्याची विनंति केली. बसण्याआधी आलेल्या गृहस्थांनी माझ्यापुढं अगदी भुईवर डोकं ठेवून मला प्रणाम केला. मी अगदी बावरल्यासारखी झालें. माझा उडालेला गोंधळ पाहून बाळाभाऊ हंसून म्हणाले ' गुजाताई पाहुणे कोणी परके नाहीत, घरचेच आहेत. श्रीमान् शेठ चक्रपाणी सक्सेना म्हणतात यांना. हे आपल्या आशाचे सख्खे चुलते—'

" काय ! आशाचे हे काका !! "

" हां बेहेन. ", माझे आश्चर्योद्गार ऐकून चक्रपाणी शेठ हिंदींत बोलूं लागले. आपले बंधु बन्सीधर आणि त्यांची पत्नी एकाएकी कशीं बेपत्ता झालीं, आपण त्यांचा किती परोपरीनं तपास केला, शेवटीं रेल्वे-अपघातांत तीं ठार झाल्याचं कसं उमगून आलं, आणि त्यांची एकुलती एक छोकरी चंद्रमुखी माझ्या हातीं लागल्याचा पत्ता कसा लागला, इत्यादि इतिहास त्यांनी सांगितला. त्यांच्या बोलण्यांतली आस्था, प्रेमळपणा आणि मृतबंधूच्या तपासासाठी त्यांनी केलेले भगीरथ प्रयत्न ऐकून त्यांच्याविषयी शंका घेणं पाप ठरेल, असं

मला वाटूं लागलं. भाऊभावजय काळाच्या तडाख्यांत सांपडून नाहींशीं झाल्याबद्दल चक्रपाणी शेठ भडभडून रडले! तथापि त्यांची छोकरी तरी आज डोळाभर पहायला मिळाल्याबद्दल त्यांना दुःखांत सुख होत होतं. त्यांनी आशेला जवळ घेतलं. ' बेटा ' म्हणून तिच्या पाठीवर मायेचा हात फिरवतांना त्यांच्या गालांवर अश्रूच्या धारा ओघळल्या. त्यांचा घसा दाटून आला. ओझे-वाल्यानं ठेवलेल्या ट्रंकेंतून त्यांनी रेशमी साडी, खड्याचे बिलवर, इअररिंग इत्यादि अलंकार काढून आशाच्या हातीं दिले. आणि आपल्या जीवाचा हा कलिजा जीवाभावानं जतन केल्याबद्दल मला तोंडभर धन्यवाद देऊन माझ्या पुढंहि रेशमी लुगड्याची एक घडी ठेवून तिचा स्वीकार करण्याबद्दल हात जोडून मला विनंति केली.

हा सगळा प्रकार इतका अनपेक्षित आणि अवाचित होता की आम्हांला त्यांतील सत्यासत्यता, त्यांतली इष्टानिष्टता पडताळून पहाण्याला अवसरच मिळाला नाही. अखेर आपण आपल्या या मुलीला घेऊन जायला आलों आहों हें त्यांचं खरं हृद्गत बाहेर पडल्यावर माझ्या मनांत धस्स झालं! विश्वास तसा गेला, आशा अशी जाणार! वेल लावला, आशेनं जतन केला—आणि आतां —छे, विचारच करवेना मला. चक्रपाणिशेठना उत्तर काय द्यायचं हें मला समजेना. मी अगदी बधिर होऊन गेलें. बाळाभाऊंकडं मी भीति-युक्त चर्येनं पाहिलं.

बारूताईची चर्याहि माझ्याहून चिंताव्याकुळ झाली होती. मी फटदिशी ' होय' म्हणून जातें की काय, अशी तिला धास्ती पडली होती. बाळाभाऊ तरी कमी का गोंधळले होते? आशा हा आमचा प्राण होऊन बसलेली आहे हें त्यांना ठाऊक आणि तिला पाहुण्याच्या हातीं देणं म्हणजे आमच्या प्राणाचा लचका तोडणंच होय, हें त्यांना माहित होतं. भीति, चिंता यांनी आम्हांला ग्रासलं होतं आणि बाळाभाऊ किंकर्तव्यमूढ होऊन बसले होते.

चक्रपाणिशेठ जगांत वावरलेले अनुभवी गृहस्थ. त्यांना परिस्थितीचा अव-घडपणा उगमल्यावाचून कसा राहील? पसरलेली स्मशानशांतता त्यांनी मोडली. ते पहिल्याइतक्याच कळवळ्यानं म्हणाले ' तुम्हांला अवघड वाटावं हें स्वाभा-विक आहे. तुम्ही या मुलीला जन्म दिलेला नसला, तरी जन्मदात्या आईपेक्षाहि

अधिक माया तुम्ही इच्यावर केली आहे. तुमचा हा कलिजा तुमच्यापासून हिरावून नेणं म्हणजे क्रूरपणा आहे हें मला कळतं. मी खरोखर क्रूर नाही. पण माणूस स्वार्थी असतो तसा मात्र आहे. ईश्वरानं मला आणि माझ्या बायकोला पुत्रसुख दिलं नाही. पैसा गडगंच आहे. गाडीच्या घोड्यांना सोन्याचांदीच्या दागिन्यांनी मी नटावितों. पण इतक्या धनदौलतीला घरांत मूल नाही ! भावाचा संसार फुलला असता, त्याच्या मुलालेकरांनी घर नटलं असतं, पण देवानं ती आशाहि ठेवली नाही. तरी पण आम्ही व्यापारी लोक. निराश होणं हा आमचा बाणा नव्हे. म्हणूनच आज बारान्‌बारा वर्षं शोध करीत राहिलों. तुमचा पत्ता कळला. पाळण्यांत लोळणाऱ्या चंद्रमुखीचं आजचं हें चालतं बोलतं हंसरं नाचरं रूप पाहायला मिळालं. ओळखीओळखीनं या बालाभाईचं नांव कळलं. त्याच्याकडं आलों. तुमच्याकडं आलों. मी लक्षाधीश पण आज तुमच्याकडं भीक मागायला आलों. घाला एवढी भीक. विन्मुख पाठवूं नका मला.' चक्रपाणिशेठनी अक्षरशः पदर पसरला आमच्यापुढं !

आयुष्यांतला अत्यंत बिकट असा तो प्रसंग होता. पाहुण्यांना रुकार द्यायला मन धजत नव्हतं आणि त्यांना नकार देऊन वाटेला लावणंतरी कसं शक्य होतं ? जोडलेली माया तोडण्याची कल्पनाहि मनाला सहन होत नव्हती आणि मायेसाठी आशाला कवटाळून धरली तर तिच्यापुढं चालून आलेली सोन्याची संधि आम्ही वाया दवडली असं आमचं मन आम्हांला खात राहिलं असतं. उद्यां पोर जाणती झाली आणि आमच्या दरिद्रि जीवनांत तिच्या जीवनाची फुलबाग फुलवितां आली नाही, तर ती आम्हांला दोष देईल ही भीतिहि आमच्या मनांत डोकावत होती.

आमच्या मनाची ही ओढाताण चक्रपाणिशेठनी ओळखली आणि ते म्हणाले ' मी तुम्हांला मोठ्या संकटांत घातलं आहे, याची मलाहि जाणीव आहे. पण हें संकट तुम्हांला वाटतं तितकं बिकट नाही. ही चंद्रमुखी नात्यानं आमची बेटी आहे पण मनानं आणि मायेनं ती तुमची झाली आहे. ही आम्हांला जशी हवी आहे तशी तुम्हांलाहि हवी आहे. आणि ह्या दोनाहि गोष्टी साधण्याची एक युक्ति मी काढली आहे. चंद्रमुखीला मी नेणार ती एकटी नेणार नाही. तिच्याबरोबर मी तुम्हा सर्वांना घेऊन जाणार. आपण सगळेंच एकत्र राहूं. आम्ग्रा,

मथुरा, अलाहाबाद, लखनौ वाटेल तिथं राहूं. प्रत्येक ठिकाणीं आपलीं घरं आहेत. मग बोला केव्हा निघायचं ? इथं तरी तुमचं काय आहे ?'

रुकार नकार न देतांच आम्ही ती बैठक संपविली. तरीपण आशाची आशा सोडावी लागणार हें भाकित मला कळून चुकलं. बाळाभाऊ, बापू, आक्का सर्वांचंच म्हणणं आशाला तिच्या चुलत्याच्या हवाली करणं तिच्या हिताचं आहे असं पडलं. मरणाला रात्र आडवी म्हणतात तशी मी 'तिची परीक्षा होऊं दे, परमुलुखाच्या शाळेंत तिचा जम बसेपर्यंत तिचं वर्ष वाया जाईल' अशी सबब पुढं करून मॅट्रिक होईपर्यंत सहा महिने तिनं इथंच राहावं असं ठरवून मी चक्रपाणिशेठना निरोप दिला. जाण्यापूर्वी त्यांच्या वैभवाला साजेशा थाटामाटाची मेजवानी आम्ही त्यांना दिली.

आपल्यासारख्या निर्धन निराधार बायकोपेक्षा आशाला रक्तामांसाच्या संपन्न धर्मपित्याचा आश्रय लाभला, हें एकपरी बरंच झालं अशी मी मनाची समजूत घालीत होतें; पण तिला लाभणारा तो धर्मपिता नसून दावेदार होता असं प्रत्ययाला आलं !

डॉ. देवांनी बोलावल्यामुळं मी त्यांच्याकडं निघालें होतें. स्टेशनवर उतरून मोटार पहायला गेलें तर मोटार आली नव्हती. तिची वाट पहात बसणं भागच होतं इतक्यांत स्टेशनच्या फलाटावरून 'बाई,' अशी हांक आली. मी वळून पाहिलं. एक सतरा आठरा वर्षांची कुणब्याची मुलगी दीनवाण्या चर्येनं माझ्यापुढं उभी होती. चेहरा ओळखीचा वाटला, पण ओळख पटेना. माझी संशयित चर्या पाहून मुलगी म्हणाली, "बाई वळकलं नाही मला ?"

"पाहिल्यागत वाटतंय पण—" मी म्हणालें.

"द्रुपादि नव्हं का मी ?"

"कोण दशरथाची द्रौपदी ? कुठं निघाली आहेस ? दशरथ, कौसल्या, अर्जुन खुशाल आहेत ना ? लगीन होऊन सासरीं चालली आहेस वाटतं ?"

माझी प्रश्नांची सरबत्ती आणखीहि लांबली असती. पण दशरथकौसल्यांचं नांव काढतांच द्रौपदी गळा काढून रडायला लागली. मी तिला जवळ घेतलं, तिच्या पाठीवरून हात फिरविला. तिचा दुःखाचा कढ ओसरल्यावर तिनं आपली कर्मकथा मला सांगितली. दशरथ कौसल्यांनी आपली इहलोकीची

यात्रा संपविली होती. अर्जुन सावकाराच्या घरीं चाकरीला राहिला होता. द्रुपदीचं लग्न एका कुणब्याशीं झालं होतं. पण शेताच्या भांडणांत खून करून तो तुरुंगांत गेला होता. दहा वर्षंतरी तो परत यायची आशा नव्हती. कुठंतरी राबून पोट भरण्यावाचून द्रुपदीला गत्यंतर नव्हतं. खेडयापाडयांत मोलमजुरी केली तरी वाळली कोरडी भाकर मिळणार. असल्या तुकडयावर दिवस काढण्यापेक्षा मुंबईसारख्या शहरांत कामधाम मिळविल्यास पोटभर आणि चांगलं खायला प्यायला मिळेल, चांगलं लुगडं चोळी नेसायला सांपडेल, अशी आमिषं दाखवून द्रौपदीची कुणी काकी मामी तिला मुंबईस घेऊन चालली होती. तिला नेणाऱ्या त्या बाईकडं पाहून माझ्या मनांत चर्र झालं. विडयानं रंगलेलं तिचं तोंड, तिच्या वयाला न शोभणारा तिचा नट्टापट्टा, आणि तिच्या चर्येवरला तो बेगुमानपणा पाहून मला तिचं लक्षण कांही ठीक दिसलं नाही. द्रौपदीसारख्या आणखी दोन मुलींहि तिच्याबरोबर होत्या.

" कुठं नेतां आहां या मुलांना ? " मी त्या बाईला विचारलं.

" मुंबईला. "

" मुंबईला कशासाठी ? "

" काम मिळवून द्यायचं आणि यांच्या पोटापाण्याची सोय लावायची. यांना कुणी नाही म्हणून कुणीतरी यांची सोय पाहिजेच की करायला. "

" तुम्ही मुंबईला कुठं असतां ? काय करतां ? "

" गिरणींत मुकादम आहे मी. तीन रुपये रोज मिळतात मला. असल्या पांच पन्नास पोरींना कामाला लावलंय मी आतापर्यंत. मिळतील तितकीं माणसं हवींच असतात मुंबईत. "

" गरीबासाठी तुम्हाइतकी खटपट करणारीं माणसं फार थोडीं, पण या द्रौपदीला मी नेतें माझ्याबरोबर. मी हिला माझ्या घरीं काम देईन. हिच्या पोटापाण्याची व्यवस्था करीन. "

" छे छे. तें नांव काढूं नका. वाटेल त्याला देऊन टाकायला मी हिला घेऊन आलें होय ? "

" वाटेल त्याला असं कसं म्हणतां ? मी या मुलीच्या ओळखीची आहे.

हिच्या आईचं बाळंतपण मी केलंय. हिच्या घरीं मी राहिलें आहे. हिला मी संभाळीन. द्रौपदी येतेस का माझ्याबरोबर ? "

" खरंच का बाई न्याल मला ? देव पावल्यासारखं होईल बघा. मावशी, जातें मी बाईसंगट. "

" गप्प बस. तुला नाहीं मी आतां अशी सोडणार. "

" पण मी म्हणतें तुमचातरी असा आग्रह कां ? कुणीकडून हिच्या पोटाची सोय लावायची एवढाच ना तुमचा हेतु ? तो साधल्यावर तुमचं आयतं कामच झालं की ? "

" मी जाणार मावशी बाईकडं. माझी आई गावल्यावाणी झालंया मला. "

" मोठी निघाली रांड जायला. तुला लुगडं नेसवलं, लाडू चिवडा खायला घातला, मोटारचं भाडं भरलं, तें तुला देऊन टाकायला व्हय ग ? जा, गुमान बस जा तिकडं त्या हौशी रंगीपाशी. तुला जाग्यावरनं उठूं दिलं हेंच चुकलं माझं. "

त्या बाईच्या अवतारावरून तिच्या उद्देशाबद्दल संशय बळावला. त्या उलट्या काळजाच्या बाईशीं हुज्जत घालीत बसण्यांत अर्थ नव्हता. तिच्यावर दुसरं कोणतं अस्त्र सोडावं याचा मी विचार करीत असतांनाच दुसरा एक शेमलेवाला गृहस्थ विडी ओढत तिथं येऊन दाखल झाला.

" गुलाब, काय भानगड आहे ? "

" कसली भानगड आलीय ? असल्या सतराशे साठ भानगडींना पुरून उरलीया मी. "

पण तिच्या या बोलण्यापेक्षा त्या इसमानं माझं लक्ष अधिक वेधलं होतं. चक्रपाणि शेठ आणि तो इसम यांच्यामध्यें कितीपण साम्य होतं ! या इसमाचा तो मलमलीचा सदरा, काळं जाकिट, त्यावर गळ्यांतला काळा कंडा उतरून सुरवार, रेशमी शर्ट, जरीचं जाकिट, कनोजी टोपी घातली, डोळ्यांत सुरमा भरला तर चक्रपाणिशेठच सजला असता. आवाजाचा सारखेपणाहि माझ्या लक्षांत आला; आणि माझा संशय बळावण्याचं दुसरं एक लक्षण दिसलं तें म्हणजे चक्रपाणिशेठच्या उजव्या हाताचा अंगठा जसा जायबंदी होऊन

नखापाशी गाठाळल्यासारखा झाला होता, अगदी तसाच या इसमाचाहि झाला होता ! माणसासारखीं माणसं पुष्कळदा दिसतात आणि फसायला होतं, पण इतकं तंतोतंत साम्य कसं असूं शकेल ? मी धीर धरून विचारलं " तुम्ही ! तुम्ही चक्रपाणिशेठ— ! "

" कोण चक्रपाणि ! " एवढंच उत्तर देऊन तो इसम तेथून निघाला. जातां जातां त्यानं त्या बाईला नेत्रसंकेत केला, तो माझ्या नजरेस आल्यावाचून राहिला नाही. माझा संशय बळावला आणि आतां एकाऐवजी दोघां बद-माषांशीं सामना द्यायला लागणार हें मला कळून चुकलं.

पण मी डगमगलें नाही. तशी मी भित्री आहे. पण काय होतं काय की, प्रसंग पडल्यावर माझी भीति पळून जाते. आणि संकटाशीं झुंज घ्यायचं अवसान मला चढतं. द्रौपदीला यांच्या कचाटयांतून सोडवायचं आणि त्याबरोबर यांचं कारस्थान उघडकीला आणायचं असा माझा निश्चय झाला. मी तेथून निघालें.
" बाईऽऽ! मला टाकून नका हो जाऊं " ही द्रौपदीची करुण हाक ऐकूं आली. माझं मन कळवळलं. पण मी मागं वळूनहि पाहिलं नाही. त्यांचा नाद मी सोडला असा त्या बाईचा नि बुवाचा समज व्हावा या उद्देशानंच मी मन घट्ट केलं होतं.

मी स्टेशनमास्तरकडं गेलें आणि ती बाई आणि बुवा मुलीला जबरीनं पळवून नेत असल्याची वर्दी दिली. आपणांस या भानगडींत पडायचं कारण नाही, आपणाला आपले उद्योग पुष्कळ आहेत, अशा तऱ्हेची टोलवाटोलव त्यांनी केली आणि मलाहि नसत्या लफड्यांत लक्ष न घालण्याचा पोक्तपणाचा उपदेश केला. पण स्टेशनच्या आवारांत आलेल्या उतारूंचं संरक्षण करणं हें स्टेशनमास्तरचं कर्तव्य आहे व तें त्यांनी केलं नाही तर त्यांच्यावर हलगर्जी-पणाचा ठपका येईल अशाप्रकारे थोडं विनवणीचं तर थोडं धाकाचं असं माझं बोलणं ऐकून मास्तर चौकशी करायला तयार झाले. मास्तरांच्या ऑफिसच्या दारांतल्या बाकावर बसलेल्या एका गृहस्थाचं आमच्या बोलण्याकडं लक्ष होतं आणि मास्तरांची कुरबूर ऐकून तोहि माझ्या म्हणण्याला दुजोरा द्यायला आपण होऊन आंत आला. आम्हा दोघांच्या संयुक्त तक्रारीपुढं मास्तरांचं

कांही चालेना आणि कुरकुरत का होईना ते फलाटावर आमच्याबरोबर यायला निघाले.

पण फलाटावर जाऊन पाहातों तों तिथं कोण होतं? ती टोळी तिथून केव्हाच बेपत्ता झाली होती!

असल्या पळवापळवीच्या उद्योगांत निर्ढावलेलीं तीं माणसं! आपल्या कारस्थानाचा संशय आल्याचा वास लागतांच ती तिथंच बसून राहण्याचा गाफिलपणा कसा करतील? हें माझ्या आधीच लक्षांत यायला पाहिजे होतं. पण आता काय उपयोग? त्यांनी आमच्या हातावर तुरी दिल्या होत्या. स्टेशन मास्तराना आनंद वाटलेला दिसला. त्यांच्यामागं कसलं लफडं लागलं नाही. त्यांनी माझ्या भांडखोरपणाबद्दल (?) मलाच दोष दिला. मुकाट्यानं ऐकून घेण्यावाचून मला कांहीच करतां येत नव्हतं. आणि त्यांच्या बोलण्याकडं लक्षहि नव्हतं माझं. कारण द्रौपदीची सुटका कशी करायची ही एकच चिंता माझ्या मनाला व्यापून राहिली होती!

आता पुढं काय करायचं या कोड्यांत मी पडलें. मोटार गाठून डॉ. देवांकडं जावं आणि त्यांच्याकडून कांहीतरी खटपट करवावी असं एकदा मनांत आलं, पण प्रहर दोन प्रहर तरी वेळ जाणार आणि येवढ्या वेळांत ते लफंगे पुरते निसटतील सुद्धा. मुंबईच्या समुद्रांत एकदा मिसळून गेल्यावर त्यांना शोधून काढणं महाकर्म कठिण होईल म्हणून कांही धडपड केली तर आतांच केली पाहिजे हें माझं म्हणणं त्या दुसऱ्या गृहस्थांनाहि पटलं. ते म्हणाले-' घटकाभरांत ते लोक जाऊन जाऊन कितीसे दूर जाणार? असतील आसपास कुठंतरी. चला आपण काढूं त्यांना शोधून."

आम्ही प्रथम फलाटावर बसलेल्या आणि स्टेशनच्या आवारांत वावरणाऱ्या माणसांना खाणाखुणा सांगून हीं माणसं आतां एवढ्यांत कुठं गेलेलीं पाहिलीं का असा शोध सुरू केला. निश्चित असं कोणीच कांही सांगेना. पण एक बाप्या अन् चार आव्वा दोन टांगे ठरवून आतांच गावांतून कारलीला गेल्याची माहिती गावांतून आलेल्या एका माणसानं सांगितली. आम्हाला हवीं होतीं तीं माणसं हींच अशी आमची खात्री झाली आणि आपणहि त्यांच्याच पद्धतीनं त्यांचा पाठलाग करायचा असं ठरवून आम्ही गावांत टांगा शोधायला निघालों.

अडचणी जशा अवचित येतात तशी मदतहि अकल्पितपणे मिळते. मला या वेळी साहाय्य करण्यासाठी एक गृहस्थ स्वयंस्फूर्तीनं पुढं आले याचं मला नवल वाटतच होतं. त्यांत आणखी एक भर पडली. त्या गृहस्थांच्या ओळखीचे एक पोलीस अधिकारी मुंबईलाच नोकरी करीत होते. त्यांची टांग्याच्या तळा-वर गाठ पडली. त्यांना मित्राकडून सर्व हकीगत कळल्यावर ते म्हणाले–

" आता तुम्ही आपल्या वाटेनं जा. मी त्या टोळीला पाहून घेतों. "

माझी खात्री पटण्यासाठी ते म्हणाले " तुमची द्रौपदी चार दिवसांच्या आंत तुमच्या घरीं आणून पोचवितों. काळजी करूं नका. "

त्यांनी माझं नांव आणि पत्ता टिपून घेतला आणि त्यांच्या आश्वासनावर भरवसा ठेवून मी डॉ. देवांकडं निघून गेलें.

मी परत घरीं येऊन आमची नित्याची दिनचर्या सुरू झाली. आशाच्या प्रकरणांत आम्ही कसे फसत होतों याची हकीकत ऐकून बाळाभाऊ, आक्का, बापू नी वारूताई चकित झालीं आणि तिला तिच्या तोतया धर्मपित्याच्या स्वाधीन करण्याची घाई मी केली नाही याबद्दल मला धन्यवाद देऊं लागलीं. मी मात्र देवानंच तिच्यावरील आणि आमच्यावरील संकट निवारलं असं समजत होतें.

दोन तीन दिवसांतच एक मनुष्य द्रौपदीला माझ्याकडं पोचवून गेला. गुलाब आणि तिचा साथीदार यांना त्या पोलिस अधिकाऱ्यानं वाटेंतच पकडलं. बाकीच्या दोघी तिघी मुलींना माटुंग्याच्या का कुठल्याशा आश्रयनिवासांत पाठविण्यांत आलं असून गुलाबबाई आणि तिचा साथीदार यांच्यावर खटला घातला आहे असं त्या माणसानं सांगितलं. या खटल्यांत मला आणि बाळा-भाऊला मुंबईचे हेलपाटे घालावे लागले. पहिली खेप आरोपींना ओळखण्या-साठी झाली. आमच्यापुढून निरनिराळ्या वयाच्या आणि पोषाखाच्या माण-सांच्या रांगा उभ्या करण्यांत आल्या. स्त्रियांची आणि पुरुषांची रांग वेगळी होती. त्या रांगांतून मी गुलाबबाईला आणि तिच्या साथीदाराला म्हणजे चक्रपाणीला ओळखून काढलं. बाळाभाऊंनीहि चक्रपाणीला बिनचूक ओळखलं.

पुढं आमच्या साक्षी झाल्या. मुली पळवून त्यांचा वेश्याव्यवसायासाठी दुरुपयोग करण्याबद्दल दोघांनाहि लांब मुदतीच्या शिक्षा झाल्या. अशा घातकी माणसांना खासं प्रायःश्चित्त मिळालं याच्या आनंदापेक्षा माझ्या आशावरलं व द्रौपदीवरलं गंडांतर टळलं याचंच समाधान मला अधिक वाटत होतं.

माझ्या मुंबईच्या यात्रेंत मला दुसराहि एक अकल्पित लाभ झाला. बाळाभाऊंना आपल्या छापखान्यासाठी कांही खरेदी करायची होती म्हणून आमचा मुंबईचा मुक्काम दोन दिवस वाढला होता. मला तिथं राहाणं अवघड वाटत होतं. तिथंच काय, पण आपल्या आडवळणी अज्ञातवासाबाहेर पडतांना मला धाकधूक वाटायची. मागं दुर्गाबाईच्या प्रकरणांत कोल्हापूरला जावं लागलं तेव्हाहि मी भीतभीतच गेलें होतें. मला कोणी ओळखीचं घरचं माणूस भेटेल हीच माझी भीति. मुंबईसारख्या ठिकाणीं तर रावजी भेटतील हा धाक. म्हणून मी बाळाभाऊंबरोबर त्यांच्या नातलगाकडं उतरले होतें. त्यांच्या घरची मंडळी राणीचा बाग पहायला चला, धक्का बघायला चला, सिनेमाला चला, असा परोपरीनं आग्रह करीत, पण मी डोकं दुखण्यासारखी कसलीतरी सबब सांगून नकार देत असे. पण एका भगिनी समाजांत भरवलेल्या स्त्रियांच्या हस्तकौशल्याचं प्रदर्शन पाहायला मी गेलेंच. कांही नवा कलाकुसरीचा नमुना पहायला मिळाला तर वारूताईला सांगतां येईल. आपल्या प्रपंच वस्तु भांडारांतहि कांही नव्या पदार्थांची भर घालतां येईल अशा हेतूनं मी गेलें होतें. प्रदर्शन पाहून मी परत निघालें. इकडं तिकडं मी कुठंहि पाहात नव्हतें. पण माझ्याकडं दुसऱ्या नजरा वळण्याचं मी कशी चुकवूं शकणार ? अशा एका नजरेनं मला हेरलं आणि मी दाराबाहेर पाऊल टाकणार तोंच एक हसरी आनंदी स्त्री माझ्यापुढं आडवी होऊन म्हणाली, “ बाई मला ओळखलंत ? ”

मी चपापलें. पण माझा गोंधळ क्षणभरच टिकला, मी म्हटलं “ कोण ! गौरी ? ”

“ होय बाई. मी तुमची गौरीच आहे. ”

गौरीच्या कपाळावरील कुंकवाकडं मी निरखून पाहात आहे हें तिनं ओळखलं आणि हंसून म्हटलं—“ मी हा नवा प्रयोग केला आहे. चला माझ्या बिऱ्हाडीं. सगळं सांगतें तुम्हाला. ”

" बिऱ्हाडीं नको. मला लवकर जायचं आहे. लग्न करून सुखी झाला तुम्ही याचा किती पण आनंद झाला मला. माणसानं असंच आशावादी असलं पाहिजे. मी अभिनंदन करतें गौरीताई तुमचं. "

" हें असलं धावतं पळतं अभिनंदन मला नको आहे. तुम्ही माझ्या घरीं यायलाच पाहिजे. प्राणसंकटाच्या वेळीं तुम्ही माझ्या तोंडांत अमृत घातलंत. तुमच्या रूपानं माझी जन्मांत कधी पाहिली नव्हती ती आई त्या प्रसंगीं मला भेटली. आज फिरून तिचं दर्शन झालं. तिला मी तशीच जाऊं देऊं ? आणि लेकीचं घरकुल पाहिल्याशिवाय आईला तरी कसं जाववेल ? "

गौरीच्या भाषणांतला लाघवीपणा आणि गोडवा झिडकारणं मला शक्यच नव्हतं. घरच्या बायकांना 'जाऊन येतें' असं सांगून मी निघालें. गौरी रावजींची जोडीदारीण व्हावी ही माझ्या मनांतली इच्छा पुरी झालेली नसली तरी तिच्या करपलेल्या जीवनांत जिवंतपणा आला, टवटवी भरली हें समाधान कांहीं थोडं थोडकं नव्हतं. तिच्या सांगण्यावरून तिला सुविद्य, सुविचारी आणि सार्वजनिक कामाची आवड असणारे पति लाभले आहेत. एका ग्रंथलेखनाची तयारी करण्यासाठी ते दोन महिन्यासाठी मुंबईस येऊन राहिले आहेत. परत आपल्या गावीं जाऊन एक विद्यालय सुरू करायचा त्यांचा विचार आहे. त्या विद्यालयांत दोघे पतिपत्नी काम करणार आहेत इत्यादि गोष्टी कळल्यावर माझा आनंद द्विगुणित झाला.

" ती समोर पिवळी हवेली दिसते ना, तिथंच खोल्या घेतल्या आहेत आम्ही " गौरी म्हणाली.

" बरी बाई मिळाली तुम्हाला जागा ! हल्ली जागेची फार मारामारी झाली आहे. " मी म्हटलं.

" आम्हांला तरी कुठं मिळाली आहे ? पण यांचे एक स्नेही दोनतीन महिन्यांच्या रजेवर गेलेत, त्यांच्या जागेंत तळ ठोकलाय आम्ही. "

" मी येऊन तुमच्या ह्यांच्या लेखनांत व्यत्यय तर नाहीना येणार ? "

" ती नको काळजी. हे रात्रीं नऊ वाजायच्या आंत घरीं यायचे नाहींत. दिवसभर बाहेरच असतात. रॉयल इन्स्टिट्यूटची लायब्ररी, प्रोफेसर मंडळीशी

चर्चा, आणि असल्याच कांही ना कांही कामांत वेळ पुरत नाही यांना! त्यांत अधून मधून व्याख्यानं असतात. आजच आणखी दोन तासांनी मारवाडी विद्यालयांत यांचं व्याख्यान आहे. तें आटपून परत यायला दहासुद्धा वाजून जातील."

मी गौरीच्या बिऱ्हाडीं गेलें. नको नको म्हटलं तरी तिनं मला सरबत घ्यायला लावलंच. बोलतां बोलतां मी म्हटलं-" गौरीताई, सगळं छान झालं तुमचं!"

" तुमचं! शपथ आहे ताई फिरून तुम्ही आम्ही केलंत तर. आपल्या लेकीला आई ' अहो जाहो ' म्हणते होय?" गौरीनं मला दटावलं. मी हसलें.

" माझे जावई भेटले असते तर आनंद वाटला असता." मी विषय बदलला.

" आणि त्यांनाहि वाटला असता. बाई उद्या सकाळीं या म्हणजे भेटायला होईल. नाहीतर आम्हीं दोघं येतों तुमच्या बिऱ्हाडीं बोलवायला म्हणजे रस्ता चुकायचं भय नाही. पण आत्ता अगदीच खेप वाया जायला नको. प्रत्यक्ष पाहायला मिळालं नाही तरी जामातांचं चित्रदर्शन घेतां येईल तुम्हाला. परवाच फोटो काढून घेतले आहेत आम्ही इथं."

गौरी उठली. बॅगमधून फोटो काढून तिनं माझ्या हातीं दिला. फोटोंत मी कुणाचं दर्शन घेतलं? माझ्या जामातांचं? नव्हे नव्हे, माझ्या पतीचं! रावजींचं! " हे तुझे--!" मी उद्गारलें. एकच क्षण, पण माझ्या आयुष्यांतला केवढा महत्वाचा होता तो! माझे रावजी! पण आता त्यांना ' माझे ' म्हणण्याचा अधिकार उरला नाही या जाणिवेनें मनांत कालवाकालव झाली. पण जें व्हावं म्हणून मलाच तळमळ होती, फार काय जें घडून येण्यासाठी मी प्रयत्नहि केला होता, तेंच घडून आल्यामुळं मला एकीकडून समाधानहि वाटत होतं त्या वेळीं. खरोखर मला काय वाटत होतं तेंच मला उमगत नव्हतं. मी भांबावल्यासारखी झालें होतें.

पण माझ्या मनाची चलबिचल गौरीला उमगूं नये म्हणून मी मन आवरलं आणि म्हटलं " गौरी, छानच जोडीदार गाठला आहेस हं! दोघंहि सुखाचा

संसार करा आता. उदंड आयुष्य मिळूं दे तुम्हा दोघांना. पण गौरी, कुठं पकडलंस यांना तूं ? ”

“ योगायोग म्हणतात तो आहे हा. हरकुंवर बाईंची सोबतीण म्हणून मी जगाच्या सफ़रीला गेलें होतें. त्यांना कोणी पुरुष मार्गदर्शक किंवा खासगी कारभारी हवा होता, म्हणून त्यांनी शोध चालविला होता. त्यांत हे सापडले त्यांना. आम्ही सहप्रवासी बनलों. आणि हा प्रवास तेवढ्यावरच न थांबवितां निरंतर चालूं ठेवण्याची ही घटना घडून आली. यांचं मत नव्हतं पहिल्यांदा आणि मलाहि प्रथम भयच वाटत होतं.

“ माझं नशीब खडतर. एकाच्या जन्माचा माझ्यामुळं सत्यानाश झाला ही टोचणी माझ्या मनाला होती. आणि माझ्या नष्टचर्याची झळ दुसऱ्याला लागूं देण्याऐवजी संसारसुखाचा नाद सोडलेलाच बरा, असं मला वाटत होतं. यांचं म्हणणंहि असंच. यांची पहिली बायको म्हणे मोठी थोर मनाची होती दुर्दैवानं ती त्यांना कायमची सोडून गेली. नवी बायको मिळाली, तरी पहिलीची सर तिला येईल याचा काय नेम ? आणि दुसरी हलक्या मनाची गळ्यांत पडली तर सुखापेक्षा दुःखाचेच आपण धनी होऊं. पण दीर्घकाळ एकत्र वावरल्यामुळं परस्पराविषयीं वाटणारी बूज कमी झाली, एकमेकांचा सहवास हवा हवासा वाटूं लागला. निदान त्याबद्दलचं वैराग्य कमी झालं आणि बाईंचा चिकाटीचा प्रयत्न प्रभावी ठरला. कांहीहि झालं म्हणा, पण आम्ही एकमेकांचीं झालों. बाई, आता मला एकच चिंता उरली आहे. ती म्हणजे यांच्या पहिल्या पत्नीची योग्यता मला कशी येईल ही ? एकाची सर दुसऱ्याला थोडीच यायला बसली आहे ? तरीपण हातांत धरलेला हात अगदीच टाकाऊ नाही असं समाधान त्यांना माझ्यापासून लाभलं तरी पुष्कळ झालं म्हणतें मी. माझ्याकडून मी प्रयत्न करतेंच आहे. ते प्रयत्न फलद्रूप व्हावेत असा तुमचा आशीर्वाद असूं दे मला बाई. ”

“ मुळीच काळजी करूं नकोस. रावजींच्या जविनांत आनंदीआनंद भरशील तूं. ” मी बोलून गेलें.

“ रावजींच्या ? तुम्ही ओळखतां यांना बाई ! ”

माझी चूक मला उमगली. पण लगेच मी ती सावरून घेतली. मी म्हणालें—

" इश्श. मी ग कशी ओळखणार यांना ? पुरुषांना पंत नाहीतर राव म्हणतात तसं म्हटलं मी. पण बरं झालं नांव तरी कळलं. तुम्हा सुशिक्षित मुलींना आमच्या अडाणी चालीप्रमाणं नांव घ्या म्हणायचीहि सोय नसते. बरं, पण मी जातें आता. उशीर झाला, आणि हें बघ, मी यांतली फोटोची प्रत बरोबर नेणार. पुढं कधी आपण भेटूं याचा नेम नाही. म्हणून तुमचं वरचेवर दर्शन घडण्यासाठी हवाच हा फोटो मला. "

गौरीकडून मी घरी आलें. माझ्या मनांत अनेक सुखदायक विचारांच्या लाटांवर लाटा उसळत होत्या. माझ्यासारखी घोरपड-हो घोरपड—गळ्यांत पडल्यामुळं नीरस आणि म्हणूनच निष्फळ ठरणारं रावजींचं जीवन गौरी-सारख्या सर्वस्वी अनुरूप जोडीदारिणीच्या प्राप्तीनं फुलेल, त्यांच्या विद्याव्यासंगाला हुरूप येईल, त्यांच्या कलाप्रीतिला बहर येईल. गौरीरावजींच्या आनंद-मय सहजीवनाचीं मनोरम चित्रं मी अंतर्दृष्टीनं पाहण्यांत तल्लीन होऊन गेलें होतें. रावजींचं विद्यामंदिर चालू झालं आहे, शेकडों मुलामुलींना रावजी आणि गौरी पाठ देत आहेत, हास्यविनोदानं तीं बालगोपालांना रिझवीत आहेत, त्यांच्या घरांत गोरीं गुटगुटीत बाळं रांगत आहेत, रावजी आपण लिहिलेलं प्रकरण गौरीला वाचून दाखवीत आहेत, त्यावर दोघांची चर्चा चालली आहे, असे देखाव्यामागून देखावे माझ्या अंतर्दृष्टीपुढून सरकत होते. कोणच्या का निमित्तानं होईना, जें व्हावं असं मला वाटत होतं, आणि जें व्हावंच म्हणून मी घर सोडलं, लटकं का होईना पण मी जगाबाहेरहि निघून गेलें, ती माझी इच्छा फलद्रूप झालेली मी पाहिली होती, परस्परांच्या प्राप्तीमुळं गौरी आणि रावजी सुखी झालीं असतील पण त्यांच्यापेक्षा माझं सुख फार मोठं आहे अशी धन्यता मला वाटत होती.

आणखी एका गोष्टीनं माझं मन आनंदित होत होतं. रावजी मला विसरले नव्हते. सुंदर तरुणी दिसतांच ते हुरळून गेले नव्हते. आपण त्यांच्या मनांतून दूर झालेली नव्हतों, गौरीसारखी सुंदर, सुविद्य आणि गोड स्वभावाची सह-चारिणी जवळ असतांहि त्यांना आपला विसर झालेला नव्हता. म्हणजे राव-

जींच्या अंतरंगांत माझं स्थान अढळ होतं. लौकिकदृष्ट्या रावजी दुसरीचे झाले तरी ते प्रथम होते तसे माझेहि आहेत हें माझ्या तपश्चर्येचं मोठ्यांत मोठं फळ मला लाभल्याच्या समाधानांत मी त्या वेळीं दंग झालें यांत नवल तरी काय ?

रावजींच्या—छे माझ्याच–बिऱ्हाडीं जाऊन मी माझ्या माणसांचं दर्शन न घेतां परत आलें होतें. मला ही उत्कंठा दाबून ठेवणं भागच होतं. आता आम्ही एकमेकांना भेटलों असतों तर माझं कांही बिघडत नव्हतं. पण माझ्या पुनर्दर्शनानं रावजींच्या मनावर कदाचित् भलताच आघात झाला असता. निदान ते ओशाळले तरी असते आणि मी कपटकारस्थान केल्याबद्दल माझ्या-विषयी त्यांचं मन पहिल्यासारखं साफ राहिलं असतंच असं नाही. त्यांच्या आनंदमय जीवनांत मिठाचा खडा पडेल ही भीति तर मला वाटलीच, पण त्यापेक्षाहि आपल्याविषयींची रावजींची एकी पिचेल ह्याला मी अधिक भ्यायलें.

तरीपण आपलं दर्शन न देतां रावजींचं दर्शन घेण्याची युक्ति मी केली. मारवाडी विद्यालयांत त्यांचं व्याख्यान होतं तिथं मी बाळाभाऊंना सोबतीला घेऊन गेलें. बाळाभाऊ थकून घरीं आले होते आणि विद्यालयांत एवढं काय आहे अशी कुरकुर करून त्यांनी आपली अनिच्छा दर्शविली. पण व्याख्यान ऐकण्यापेक्षा त्या निमित्तानं मुंबईचे थोरमोठे स्त्रीपुरुष पाहायला मिळतील, आपण वर्तमानपत्रांत त्यांचीं नावं वाचतों, त्यांची कर्तबगारीहि वाचतों, पण अशा मोठ्या माणसांचं प्रत्यक्ष दर्शन आपणासारख्या आडवळणी ठिकाणीं राहाणाऱ्याला कुठून होणार ? अशा निमित्तानंच तें करून घ्यायला हवं हा माझा युक्तिवाद पटल्यामुळं असो किंवा माझा हिरमोड करूं नये ह्या भावनेनं असो, बाळाभाऊ मला मारवाडी विद्यालयांत घेऊन आले.

व्याख्यान संपतच आलं होतं. जागा चिक्कार भरली होती, तरी श्रोते शांत होते. त्यांची तल्लीनता पाहून व्याख्यान चांगलं रंगलं होतं हें खास. रावजींची भाषणशैली खाजगी संभाषणांत मनोहर होती हें मला माहीत होतं. पण त्यांच्या शब्दाशब्दांतून प्रकट होणारी वक्तृत्वकला मी आज प्रथमच पाहात होतें. रावजींच्या दर्शनाबरोबर त्यांची भाषा श्रवण करण्याचं सौख्य मी एकाच वेळीं

अनुभवलं. व्याख्यान संपवून ते खाली बसले त्या वेळीं श्रोतृसमुदायानं टाळ्यांचा कडकडाट करून गुणग्राहकता व्यक्त केली. त्या वेळीं माझा आनंद गगनांत मावे-नासा झाला. अध्यक्षांनी रावजींच्या विचारसंपन्नतेबद्दल गौरवपूर्ण उद्‌गार काढले ते ऐकून तो गौरव रावजींचा नसून माझा स्वतःचाच होतो आहे असं मला वाटलं. निमंत्रकांनी आभारप्रदर्शनानंतर भरगच्च हार त्यांच्या गळ्यांत घातला त्या वेळची रावजींची मूर्ति माझ्या मनांत कोरून ठेवल्यासारखी झाली. माझ्या आयुष्यांतील अत्यंत भाग्याचा, परमोच्च सुखाचा तो दिवस होता. मी आनंदानं फुलून गेलें होतें आणि त्याच वेळीं माझ्या डोळ्यांतून अश्रूहि झिरपत होते. माझ्यासारखं आनंदानं रडण्याचं भाग्य माझ्या किती भगिनींच्या वाट्यास येत असेल ?

आम्ही घरीं आलों. आणि रात्रीच्याच गाडीनं मुंबई सोडण्याचा बाळाभाऊंचा बेत मी एकदम मान्य केला. कारण दुसरे दिवशीं सकाळीं गौरी रावजींना घेऊन मला बोलवायला येणार होती, तिला चुकवावं कसं याचं मला कोडंच पडलं होतं. घरून निघतांना ' सकाळीं माझी एक मैत्रिण मला भेटायला येईल तेव्हा पाहुणे कांही निकडीच्या कामासाठी रात्रींच गांवीं गेले ' असं कळवायला मी घरच्या माणसांना सांगून ठेवलं.

आमची ही मुंबईची सफर कल्पनेबाहेर आनंददायक झाली. आणि मी मोठ्या उल्हसित मनानं घरीं पाऊल टाकलं.

पण घरीं येताच मला एक अशुभ वार्ता ऐकावी लागली. आशाचे संगीत शिक्षक कंठेबुवा यांचा एकुलता एक आधार—त्यांची म्हातारी आई–नावापुरतं कांहीतरी निमित्त होऊन देवाघरीं निघून गेली होती. तो जराजर्जर जीव मुक्त झाला- स्वतः कष्ट न सोसतां आणि आपल्या अपंग मुलाला कष्ट न देतां मुक्त झाला–ही वास्तवीक आनंदाची गोष्ट होती. पण जग मरणाऱ्याच्या सुखदुःखापेक्षा मागं राहिलेल्याच्या सोयीगैरसोयींचाच विचार करतं. कंठेबुवांना अन्न घालायला आता सत्तेचं माणूस कुणी उरलं नाही, त्यांना पैशाची वाण नाही पण त्या पैशाची भाकरी भाजून त्यांच्या तोंडांत घास घालणारा हातच तुटून गेला. त्यांच्या या असहाय्य स्थितीनं कुणाचंहि मन कळवळलं असतं. मी त्यांच्या समाचाराला म्हणून गेलें तेव्हाची त्यांची शोकविव्हल स्थिति पाहून मला

भडभडून आलं. कंठेबुवांचं सांत्वन करायला म्हणून मी गेलें होतें. पण माझंच मन मला आवरतां येत नव्हतं. कंठेबुवा दुःखानं दाटून आलेल्या आवाजांत म्हणाले, "ताई, मी आज पुरा निराधार झालों. मी आंधळा, परस्वाधीन. कुणाच्यातरी खांद्यावर भार घातल्यावाचून मला पाऊलहि उचलतां येत नाही. जगाला असं भारभूत होऊन जगणं लाजिरवाणं आहे आणि कुणालाहि तें दुःखदायकच वाटणार. मलातरी तसं वाटतं. पण माझ्या मावर माझा भार घालतांना मला कधी ओशाळेपणा वाटला नाही, आणि ताई, माझ्या माचं मन किती थोर! हा आंधळा गोळा गळ्यांत पडला म्हणून कधीं वैतागाचे, तुसडेपणाचे उद्गार तिनं काढले नाहीत. मला तिनं फुलासारखं जतन केलं. आता माझी काळजी कोण घेणार ताई? कसल्याहि परिस्थितींतून माणसाला सावरून धरणाऱ्या दोनच देवता असतात. एक आई अन् दुसरी बायको. मला बायको नाही. ती नाही म्हणून मी कधीं हळहळलों नाही. बायकोनं मला सुख देण्याऐवजी बायकोचा जन्म दुःखमय केल्याची रुखरुख माझ्या मनांत डाचत राहिली असती. माझ्या माचा हात माझ्या पाठीवर फिरत होता, तिच्या हातचा गोड घास माझ्या तोंडांत पडत होता, तोंपर्यंत मला दुसऱ्या कोणत्याच हालअपेष्टेची क्षिति वाटली नाही. पण आता—ताई, आता मी कुणासाठी जगायचं? कुणाच्या आधावर जगायचं? ताई, हल्ली सुधारलेल्या जगात म्हणे वेडे, असाध्य रोगी, आणि दुसऱ्याला भारभूत झालेल्या माणसांना निकालांत काढण्याचा विचारप्रवाह सुरू झाला आहे. हिटलरनं आपल्या राष्ट्राचं अन्न व मानवी शक्ति अशा निरुपयोगी माणसांपायी वाया जाऊं नये म्हणून दुबळे जीव वेचून काढून त्यांना मुक्ति दिली असं कोणीसं सांगितलं. हा त्याचा क्रूरपणा पुष्कळांच्या टीकेचाहि विषय झाला आहे म्हणे. पण ताई, मी हिटलरला क्रूर म्हणणार नाही. तो खरा दयाळू वाटतो मला. मी जर्मनींत जन्माला आलों असतों तर त्या हिटलरनं मलाहि मुक्ति दिली असती—"

कंठेबुवांचं सांत्वन कोणी कसं करायचं? त्यांचं दुःख तीव्र होतं, त्यांचा जीविताविषयीचा वैतागहि अकारण नव्हता. कांहीतरी औपचारिक बोलून दुःख आवरण्याबद्दल, धीर धरण्याबद्दल चार शब्द बोलून मी त्यांचा निरोप घेतला.

कंठेबुवांचा मी निरोप घेतला तरी ते माझ्या मनातून दूर झाले नाहीत. त्यांचा माझा परिचय धंद्याच्या निमित्तानं झाला होता. धंदा म्हटला की दाम आणि काम एवढ्यापुरता विचार केला की झालं. पण कंठेबुवांनी शिकवणीपुरते शिक्षक एवढाच संबंध निर्माण केला नव्हता. घरोबा निर्माण झाला होता त्यांच्या आमच्यांत व तोसुद्धा त्यांच्या वागणुकीमुळंच. एक तासभर शिकवायची बोली होती, पण आशा आपली कला चांगल्याप्रकारे उचलते हें दिसून आलं तर त्यांची शिकवणी दोन ताससुद्धा चाले. नाट्य महोत्सवांत आणि भावगीतांच्या चढाओढींत आशाची तयारी करून घेण्यासाठी तर बुवांनी घड्याळ जणू भिरकावूनच दिलं होतं! सकाळींच नव्हे तर संध्याकाळींसुद्धा बुवा येत आणि तालीम देत. गवय्ये लोक छांदिष्ट असतात, गाण्याबजावण्यांत रंगले म्हणजे त्यांना अन्नपाण्याचीसुद्धा शुद्ध राहात नाही असं म्हणतात, त्याचं प्रत्यंतर या वेळीं येत होतं. फीचे पैसे आम्ही होऊन आठवणीनं दिले तर दिले. बुवा कधी त्याबद्दल विचारायचे नाहीत! कलावंताचं हे वळण बुवांच्या अंगीं भरपूर बाणलेलं होतं, पण कलावंत म्हणविणाऱ्या लोकांच्या भलत्या सलत्या सवयी मात्र त्यांच्या ठिकाणीं नव्हत्या. गवई शांभवी घोटा घेतात, अफूहि खातात, गवई म्हटला की त्याच्यापाशी चंची असायचीच, अशीं वर्णनं मी ऐकलीं होतीं. पण कंठेबुवापाशी यांपैकी कसलीच गोष्ट कधी दिसली नाही. तंबाकूची चिमूट टाकल्यावाचून आवाजी सुटतच नाही अशी सबब त्यांनी कधी सांगितली नाही. उलट पान खाणं हें शेळीबोकडांचं काम असं ते थट्टेनं म्हणत. सरदीमुळं कधी घसा साफ नसला तर लवंग खडीसाखर तोंडांत टाकून ते आवाज ताळ्यावर आणीत.

कलावंताचं आणखी एक वैशिष्ठ्य कंठेबुवांजवळ नव्हतं. गवई गबाळग्रंथी असायचा. धोतर मळलेलं, पैरण फाटलेली, डागळलेली, दाढी वाढलेली असलं एकादं ध्यान बघीतलंत तर तो भुक्कड नाटकमंडळींतला नट तरी असला पाहिजे नाहीतर गवई तरी असला पाहिजे असं बापू थट्टेनं म्हणत; पण कंठेबुवांची ढिलाटोपी प्रेक्षणीय असे. स्वच्छ धोतर, शर्ट, त्यावर काळं जाकिट, मखमलची टोपी, हातांत चांदीच्या मुठीची काठी, पायांत तुकतुकीत चढाव असा त्यांचा थाट असे. गावचे लोक त्यांना थट्टेनं केडगावकर महाराज म्हणत; पण थाट

तसा असला तरी चेहऱ्यावरचा बावळटपणा मात्र कंठेबुवांना नव्हता. पोशाख खराब असला काय नी डौलदार असला काय बुवांच्या दृष्टीनं सारखाच. पण त्यांची ही सजावट म्हणजे त्यांच्या माची हौस होती. आपला लेक करंटा नाही असं ती माउली जगाला दाखवीत होती.

गवई लोक मिजासी आणि लहरी असतात असाहि त्यांच्यावर प्रवाद आहे. कंठेबुवांना मात्र तो मुळीच लागू होण्यासारखा नव्हता. दुसऱ्याची मुर्वत न ठेवणं, त्यांना टाकून बोलणं, एवढ्या तेवढ्यासाठी तिरीमिरीवर येणं हें त्यांच्या स्वभावांत नव्हतं. ते नेहेमी हसतमुख आणि गोडबोले होते. आशाची ते कधीकधी मोठी गमतीदार थट्टा करीत, आमच्याशी अनेक विषयांवर गप्पा गोष्टी करीत. आपल्या मानं आज अमुक म्हटलं, अमुक केलं, असं आवडीनं सांगत. आम्ही कांही नवीन पदार्थ बनविला तर तो त्यांच्या मासाठी पाठवीत असूं आणि त्यांच्या माहि कांही गोडधोड केलं की आमच्याकडं पोचविण्यास विसरत नसत. आपल्या मुलाची आवडती शिष्या आशा—हिच्यावर तर माचा भारी जीव जडला होता. सणासुदीला तिला त्यांचं बोलावणं आलं नाही असं व्हायचं नाही कधी ! वारूताईवरहि त्यांची मोठी भक्ति. तिच्या चुटचुटीत-पणाचं, सुगरणपणाचं त्यांना कौतुक वाटे आणि अशा चांगल्या मुलीच्या जन्माचं वाटोळं करणाऱ्या देवाला त्या शिव्या देऊन घेत. मा गेल्याबद्दल कंठे-बुवा जितके शोकाविव्हल झाले तितकाच शोक आशा न् वारूताईंना वाटत होता तो उगीच नव्हे.

अशा परिस्थितींत माझं मन विव्हळ झालेलं असलं तरी तें केवळ दुःखांत गुरफटून गेलेलं नव्हतं. या परिस्थितींतून नवे नवे विचार माझ्या डोक्यांत उद्भवूं लागले होते. विचित्र परिस्थिति निर्माण झाली की तिच्यामधून नवं कांहीतरी शोधीत बसायचा चाळा माझ्या मनाला लागतो. तसं या वेळींहि झालं. कंठेबुवा मातृहीन झाले, म्हणजे निराधार झाले. पण यांत अकल्पित असं काय घडलं ? जें उद्या परवा व्हायचं होतं तें आज घडलं इतकंच. पण तें घडलं तरी बुवांना दुसरं कोणीच आधार देऊं शकणार नाही का ? शोकाच्या भरांत बोलले, तरी त्यांच्या बोलण्यांतल्या एका वाक्यानं माझ्या मनांत चांगलंच घर करून ठेवलं होतं. 'माणसाला सावरून धरणाऱ्या दोन देवता

असतात. एक आई आणि दुसरी बायको. मला बायको नाही, आई होती तीहि गेली' असं त्यांनी म्हटलं होतं आणि तेव्हांच माझ्या मनांत येऊन गेलं--बुवांची आई गेली पण त्यांना बायको कां मिळू नये? धडधाकट असून वाडवडिलांच्या जीवावर जगणाऱ्या ऐदी गोळयांच्या गळयांत मुली माळ घालतात. त्यांच्यापेक्षा स्वतःच्या कलेवर निर्वाह करणारा कंठेबुवासारखा जोडीदार त्यांनी कां पतकरूं नये? काल्पनिक भीतिमुळं आणि लोक नावं ठेवतील या भयानंच मुली नी त्यांचे पालक बुवांपासून दूर जात असतील. कोणी विचारशील मुलगी बुवांचा हात आपल्या हातीं घ्यायला तयार होईलहि. तिच्या जीवनांत सुखाची वाण पडणार नाही आणि आंधळ्याची काठी होऊन त्याच्या उदासवाण्या जीवनांत आनंद भरल्याचं श्रेयहि तिला मिळेल. आपण अशा एकाद्या मुलीचा शोध करायचा. बुवांना न भेटलेली आधारदेवता भेटवायची.

पण या दिनावधीच्या गोष्टी झाल्या. बुवांची तात्कालिक सोय कांहीतरी करायलाच हवी होती. त्यांना आपल्याकडंच आणलं तर? पण ही योजना बोलून दाखविण्यापूर्वी मला वारूताईचा विचार घेणं अवश्य होतं. कारण घरची उस्तवारी तिलाच माझ्याहून अधिक करावी लागत असे. आधीच कामाखाली चूर असणाऱ्या वारूताईवर आणखी भार घालायला माझं मन कचरत होतं. मी भीतभीतच तिला विचारलं—"बुवांची आई जाऊन मोठाच घोटाळा झाला. आता त्यांचे हाल कुत्रा खाणार नाही. त्यांचं संगोपन करावं असं मला राहून राहून वाटतं. पण आपणतरी रिकाम्या कुठं आहों? कामाखालों तुझं पीठ पडतंय, त्यांत ही नवी जोखीम?"

"माझ्या राबणुकीचे सडगर पुरे झाले. आपण चौघीजणी जेवतोंच आहोंत ना? त्यांत पांचवं सहज खपेल. तेवढ्यानं कसले श्रम वाढणार? मीच तुम्हाला हें विचारणार होतें ताई. आता तुम्हीच म्हणताय तर सांगतें, तुम्ही अवश्य बोलवा इकडं बुवांना."

माझ्या विचाराला वारूताईचा असा पाठिंबा मिळेल, फार काय माझ्याहून तिचाच आग्रह जास्त होईल असं मला वाटलं नव्हतं. मला आनंद वाटला तिचं हें औदार्य बघून; आणि मी बुवांना आमच्या घरीं राहायला घेऊन आलें.

बुवा आमच्या बिऱ्हाडीं रोज येत. ते आज प्रथम इथं आले असं नाही.

पण रोजचं येणं आणि आजचं येणं यांत फरक होता. त्यांच्या अंतर्यामीं आज कालवाकालव होत होती. आईच्या मृत्यूच्या खऱ्या वेदना त्यांना आता जाणवत होत्या. ते खोलींत येऊन बसले. त्यांच्या डोळयांतून अश्रूंचे पूर वाहूं लागले. त्या वेळीं त्यांना मनमुराद रडूं द्यावं, त्यांच्याबरोबर आपणहि रडावं असं मला वाटलं आणि मी रडलेंहि. अंमळशानं त्यांना देण्यासाठी दुधाचा पेला घेऊन मी गेलें तेव्हा ते वळकटीवर डोकं टेकून उपडे पडले होते मी हलकेच हाक मारली—" बुवा ! "

बुवा उठून बसले. मात्र त्यांनी ओसुद्धा दिली नाही ! त्यांच्या तोंडांतून शब्दच उमटत नव्हता.

" दूध आणलंय. थोडं घ्या. " मी कप त्यांच्यापुढं ठेवला.

तो घेण्यासाठी त्यानी कसलीहि उत्सुकता दाखविली नाही. त्यांचा हुंदका मात्र अधिक बळावला. मी म्हटलं—" बुवा, आता विवेकानं शोक आवरला पाहिजे तुम्ही. तुम्हाला असं सांगणं निष्ठुरपणाचं वाटेल, पण आता काय उपयोग आहे या शोकाचा ? मा गेल्या त्या गेल्या ! "

" ताई, मा गेली म्हणून मी आता रडत नाही. माझी मा अशी निष्ठुर नव्हती. मला टाकून ती कधी जाऊं शकणार नाही. ती गेलीहि नाही. ताई, तुमच्या रूपानं ती आज माझ्यापुढं आली आहे. तुमच्या रूपानं माची पुन्हा भेट झाली या आनंदानं रडतोंय मी. "

बुवांचे हे उद्‌गार तोंडदेखले नव्हते. हृदयांत उचंबळलेले बोल आणि नाटकी भाषा यांतलं अंतर कुणालाहि कळून येतंच की, त्यांची कृतज्ञता पाहून मला धन्यता वाटली.

आता बुवांना सुखी करील, त्यांचं जीवन आनंदमय करील अशी एकादी जोडीदारीण शोधून काढणं हा माझ्या मनाला एक चाळाच लागून राहिला. मी माझ्या या प्रयत्नाचा सुगावा बुवांनाच काय पण आक्का, बापू, वारूताईसारख्या जिव्हाळ्याच्या माणसांनाहि लागू दिला नव्हता. माझ्या स्वभावाचा असा धर्मच आहे की काय कुणास ठाऊक ? आपले प्रयत्न फलद्रूप झालेले दिसल्या-शिवाय त्याबद्दल वाच्यता करायची नाही. मी शोधक नजरेनं आजूबाजूस पाहूं लागलें तेव्हा मला बुवांना योग्य अशा मुली दिसूंहि लागल्या. वामनराव धोंड

नांवाचे मराठी शाळेंतले मास्तर आज तीन वर्षं आपल्या मुलीसाठी स्थळं शोधताहेत, पण कुठं पत्रिका तर कुठं हुंडा या अडचणीमुळं लग्न जमत नाही, म्हणून चार पोरं असलेल्या एका चाळिशी उलटलेल्या एका तीजवराला जावई करायला तयार झाले आहेत असं मला कळलं. वामनरावांची बाळी मी पाहिलेली होती. आता ती विशीची रसरशीत तरुणी दिसत होती. तिचं रूप बेताचं असलं तरी तिचा निरोगीपणा छान होता. गरिबाची लेक असली तरी कांही मुलींना नटवेपणाचं भलतंच वेड असतं आणि आपण हमखास श्रीमंत पतीची राणी होणार अशा मनोराज्यांत त्या रंगलेल्या असतात, आणि पालकांनी आणलेल्या सामान्य स्थळाला नाकं मुरडतात. बाळीच्या मनांत असलं वेड नसावं असं तिच्या बोलण्यावरून वाटलं. भगिनी समाजांत ती मला भेटली तेव्हा मी तिला सहज तिच्या लग्नाबद्दल विचारलं. वास्तविक हा प्रश्न मोठ्या मुलींना विचारूं नये. तो त्यांना मनस्वी झोंबतो. वधूपरीक्षेत आपणास आलेल्या अपयशाबद्दल नाक खाजविण्यासाठीच लोक हा प्रश्न विचारतात असा त्यांचा समज होतो, व त्या खिजतात, प्रसंगीं चिडतातहि. हें माहित असूनसुद्धा मी बाळीला तिच्याबद्दल विचारलं, आणि तिच्याकडूनच चार पोरवाल्या तिजवरची हकीकत मला कळली. ती व्याकुळ स्वरानं म्हणाली--" ताई, माझं लगीन झालं, एवढंच नव्हे तर मला चार पोरंसुद्धा झालीं आहेत. मुलाच्या मुंजीची लग्नाची अक्षत द्यायला येईन मी तुमच्याकडं."

बाळीचे डोळे डबडबलेले होते हें बोलताना. आपल्या आयुष्याचा होत असलेला असा खेळखंडोबा पाहून कोणत्या मुलीचं हृदय पिळवटल्यावाचून राहील ? अशा स्थितींत बाळीला सहानुभूति दाखविल्यास तिचं अंतरंग प्रकट होईल या अपेक्षेनं मी म्हटलं—" बाळूताई, गरीबांच्या मुलींचं हें नष्टचर्य जगजाहिर आहे. पण तुझ्याहि वाट्याला तें यावं याचं वाईट वाटतं. पण तुला मी सांगतें तूं अशा लग्नाला तयार कां होतीस ? इतके दिवस थांबलीस तशी आणखी वरीस सहा महिने थांबलीस तर काय बिघडणार आहे ? "

" पण थांबून मनासारखं स्थळ मिळेल याचातरी काय भरवसा आहे ? आज चार वर्षं हाच अनुभव घेत आलोंय आम्ही. पहिल्या पहिल्यांदा गरीब असलों तरी प्रथमवरांची स्थळं येत होतीं. पण कोण झाला मास्तर म्हणून, तर

कोण सुतारकाम करतो म्हणून तात्यांनी नी आईनी नकार दिला. आणि तींच आता हे तिजवर जावई करायला तयार झालीं आहेत ! काय सांगायची ताई तुम्हाला आपली कर्मकथा ? आता मन अगदी घट्ट केलंय मी. तात्या ज्याच्या-पुढं उभी करतील त्याच्या गळ्यांत मुकाट्यानं माळ घालायचं ठरवलंय मी. माझ्या जन्माचं कांही का होईना पण तात्यांच्या गळ्याचा काच तरी कमी होईल. ”

बाळी आपल्या लग्नाबद्दल स्वतंत्रपणें विचार करीत आहे, एवढंच नव्हे तर आपले विचार निर्भीडपणे बोलून दाखवीत आहे याचं मला नवल वाटलं. आमच्या मुली मोठया झाल्या तरी आपल्या लग्नाच्या गोष्टी बोलायला लाज-तात, भितात असा चोहोकडे प्रकार दिसतो. पण परिस्थिति माणसाला निर्भय करते हेंच खरं. बाळी आता निर्भय झाली होती. वैतागानं का होईना पण वाटेल त्या संकटाला तोंड देण्याची मनाची तयारी तिनं केली होती. मला तिची ही मनःस्थिति माझ्या उद्देशाच्या दृष्टीनं अनुकूल वाटली. आणि मी तिला म्हटलं, “ बाळूताई, तुझ्या मनाला होत असलेल्या वेदना मला कळतात आणि त्यामुळं माझं मन कळवळतं. लग्नाची गाठ ही योगायोगानं बसायची असते. मनांत असेल असाच जोडीदार हजारांतून एखाद्यालाच लाभतो. बाकीच्यांना त्यांतल्यात्यांत बरा एवढीच दृष्टी ठेऊन निवड करणं भाग पडतं. आम्हा गरीबांना तर त्या बाबतींत चोखंदळपणा करून भागत नाही. म्हणून उघड उघड प्रतिकूल दिसणाऱ्याच्या हातांत हात द्यावा असें मात्र नाही. पुढं काय व्हायचं असेल तें होईल, पण आजतरी बाप शोभणाऱ्या पुरुषाला तूं पति म्हणून पसंत करूं नको. तो श्रीमंत आहे म्हणे. मग श्रीमंतीच्या जोरावर तो बायकोची हौस कशीहि पुरवून घेईल. त्याच्या हौसेला तूंच काय म्हणून बळी जावंस ? या वठलेल्या खोडापेक्षा धट्टाकट्टा नवरा निर्धन असला तरी तुला सुखदायक होईल. तूं माझ्याशी मोकळ्या मनानं बोललीस तशी आई तात्यां-शीहि बोल. ते तुझं ऐकतील. ”

“ ताई, हा उपदेश मी पुष्कळांच्या तोंडून ऐकला आहे. आणि माझं मला कळत का नाही हें ? ताई रागावूं नका. पण या उपदेशाचा वीट आलाय आता मला. उपदेशक फार झालेत. पण उपदेशाबरोबर मदत करायला मात्र कोणीच

पुढं येत नाही. आलेलं स्थळ वाईट आहे, तें झिडकार असं सांगणारीं माणसं दुसरं स्थळ मात्र दाखवीत नाहीत. तुम्ही निर्धन माणसाशी लग्न करायला सांगतांय. तयार आहे मी त्याला. तरुण नवरा निर्धनच काय पण व्यंग असलेलाहि मला चालेल. त्याला पैसा मिळवतां येत नसला तरी मी राबून त्याचं माझं पोट भरीन. आणखी काय सांगूं तुम्हाला ? ”

बाळीच्या या बोलण्यानं माझी आशा चांगलीच बळावली. मी तिला कंठे बुवांचं नांव सुचवलं. त्यांची सर्व परिस्थिति तिला समजावून दिली. त्यांचं चित्र जितकं उठावदार रंगवितां येईल तितकं मी बाळीपुढं रंगविलं. त्यांत अतिशयोक्ति मात्र मुळीच केली नाही. उलट आंधळ्या नवऱ्याची बायको होण्यांत अडचणी कोणत्या आहेत तें मी तिला समजावून दिलं आणि इतर सोयींपुढं या अडचणींची क्षिति बाळगण्यांत अर्थ नाही हेंहि तिला पटवलं. बाळीनं माझ्या सूचनेला रुकार दिला व तात्या आईनी होय म्हटलं तर माझी तयारी आहे असं सांगितलं.

पहिल्या पावलींच झालेल्या या कार्यसिद्धीमुळं मला मोठा हर्ष झाला. मी लगेच वामनराव मास्तरांना जाऊन भेटलें. त्यांना माझी सूचना एकदम पसंत पडली असं नाही. त्यांनी आणि त्यांच्या बायकोनं आंधळ्याच्या गळ्यांत पोरगी कशी बांधायची म्हणून थोडीफार कुरकुर केलीच. मुलगी काय म्हणेल अशी शंकाहि त्यांनी काढली, पण ‘ माझी मुळीच ना नाही ’ असं बाळीनं सांगून टाकलं. ती नवराबायकोहि या विषयांत जिकीरीलाच आलीं होतीं. तात्यांनी रुकार दिला.

माझा आनंद गगनात मावेना. घरीं जाऊन बुवांना ही आनंदवार्ता सांगायची, त्यांची संमति मिळवायची आणि लगेच मुहूर्त काढून शुभमंगल सावधान करायचं असे बेत रचीत मी घरीं आलें. बुवांची शिकवणी चालू होती. ती आटोपते कधी अन् ते मोकळे होतात कधी असं मला झालं होतं. पण अर्ध्या घटकेंतच माझीं सारी मनोराज्यं गडगडून पडलीं. वामनराव लगबगीनं माझ्याकडं येऊन म्हणाले—“ गुजाताई, आपला बेत सिद्धीला जाणं कठिण आहे. ”

“ तें कां ? ” मी अधीरतेनं विचारलं.

" कंठ्यांचं आणि आमचं गोत्र एक पडतं. शिवाय कंठे पाराशर आहेत म्हणे ! "

" मग ? "

" मग त्यांची आमची सोयरिक होणार नाही. "

मी वामनराव तात्यांची परोपरीनं समजूत घालण्याचा प्रयत्न केला पण मला त्यांत यश आलं नाही. गोत्र, शाखेचा प्रश्नच येऊं शकत नाही, अशा नोंदणी पद्धतीनं विवाह करूं ही माझी सूचना त्यांना कुठली पटायला ? त्यांनी एकदा नकार दिला तो वज्रलेप ! त्यांनी अनन्यगतिक होऊन प्रथम हेरून ठेवललं तें श्रीमंत तिजवराचं स्थळ कायम केलं, पण बाळीनं त्याच्या गळ्यांत माळ घालण्याऐवजी नदीचा आश्रय घेऊन आपला आणि आईबापांचा प्रश्न सोडवला.

कुमारिकांप्रमाणं तरुण बालविधवांसाठीहि माझी शोधक दृष्टि होतीच. बालविधवांचा पुनर्विवाह हा आजकाल कोणी निषिद्ध मानीत नाही. पण त्यांच्या आणि त्यांच्या पालकांच्या मनांतला त्याबद्दलचा बाऊ कांही कमी होत नाही ! अशा एका मुलीच्या पालकाला मी सहज हा प्रश्न विचारला पण स्थळाच्या बरेवाईटपणाची चौकशीसुद्धा न करतां असा भ्रष्टाकार करायची सूचना केल्याबद्दल त्यानं माझी खरडपट्टी काढली ! भीक नको पण कुत्रं आवर अशी त्यानं माझी अवस्था करून सोडली. त्याची मुलगी पुढं शेजारच्या एका सोनाराच्या मुलाबरोबर पळून गेली असा गवगवा झाला आणि त्या बेअब्रूचे चटके असह्य होऊन ते गृहस्थहि गांव सोडून गेले !

बुवांना जोडीदारीण मिळवून द्यायची ती कुमारी किंवा बालविधवा चालेल असं जसं मला वाटत होतं, तसं ती ब्राम्हणेतरापैकी कोणाची असली तरी हरकत नाही अशीहि माझ्या मनाची तयारी होती. नंदनगांवच्या मुलींच्या शाळेवर नवीनच नेमणूक झालेल्या चंद्राबाई गुजराथी ह्या बाईकडं माझं लक्ष गेलं. ती गुजराथी असली तरी पिढ्यान्‌पिढ्या गेल्यामुळं ती संपूर्ण मराठी बनलेली होती. श्रीमंत लोकांकडं स्वयंपाकपाणी करणाऱ्या एका गुजराथी महाराजाची ती मुलगी. पण शिकून ती ' ट्रेन्ड ' मास्तरीण झाली. तिच्या बापानं बालपणीं तिचं लग्न

केलं होतं. पण तिची आणि तिच्या नवऱ्याची तोंडओळख होण्याच्या आधीच त्यानं जगाचा निरोप घेतला होता. त्यांच्या जातींत पुनर्विवाहाची चाल नसल्यामुळं तिच्या बापानं किंवा काकामामांनी त्याबद्दल विचार केला नव्हता आणि आता तर बाप मरून गेल्यामुळं या विषयांत पुढाकार घ्यायला कुणी उरलं नव्हतं. पण माझ्या दृष्टीनं हें सोयीचं होतं. कारण तिची ती मुखत्यार असून तिच्या निश्चयाला अडथळा व्हायचा संभव नव्हता. भिन्नजातीय पुनर्विवाह ही थोडी पुढच्या पायरीची सुधारणा आहे आणि ती आपली आपण करण्याऐवजी आणखी कुणाचातरी विचार घेतलेला बरा असं मला वाटलं. मी विचार घ्यायचा म्हणजे कुणाचा घ्यायचा? माझी घरची जोडीदारीण, बहीण, मैत्रीण, सल्लागार सगळं कांही वारूताई. मी तिलाच विचारलं. पण माझा हा प्रश्न ऐकतांच तिचा चेहरा गोरामोरा झाला! मी तिला भलतंच कांही विचारलं नाही ना असं मला वाटलं!

"कां ग? बुवांचं लग्न करून द्यावं ही कल्पना तुला पसंत नाही?" मी विचारलं.

"कां पसंत नसेल मला? त्यांचं जीवित सुखाचं व्हावं असं मलातरी कसं न वाटेल? पण--"

"पण अडचण कसली हेंतरी सांगशील? मास्तरीणबाई गुजराथी आहे हीच तुझी शंका?"

"ती तर आहेच, शिवाय ती मास्तरीण आहे. आज इथं आहे, उद्या दुसरीकडं बदलून जाईल. हें आंधळं बिऱ्हाड कुठंकुठं मिरवीत नेणार ती? आणि त्यांत बुवांनातरी कसं सुख लागायचं?"

"अग पण लग्न झाल्यावर तिनं नौकरींतच गुंतून राहिलं पाहिजे असं थोडंच आहे? बुवांची मिळकत नवराबायकोचा संसार मजेंत चालेल इतकी आहे. आणि त्यांतून हिला आपलं मास्तरकीचं ज्ञान वाया जाऊं नये असं वाटलं तर स्वतः शाळा काढून नाहीतर इथल्या खाजगी शाळेंत काम पतकरून तिला आपली हौस पुरवून घेतां येईल."

माझ्या या युक्तिवादापुढं वारूताईला कांही बोलतां येईना. ती किती वेळ कांही बोललीच नाही. या विषयाला पूर्णविराम देण्यासाठी ती उठून चालली.

जातांना एवढं मात्र म्हणाली, " दुसरी कुणी नाहीच मिळाली तर ही आहे. पण दुसरी अधिक चांगली न मिळायला काय झालं ? पुष्कळदा जवळ असतं पण दिसत नाही. वेळ यावी लागते त्याला. "

वारूताई आपल्या कामाला गेली तरी तिचे शब्द माझ्या मनांत घुटमळत राहिले. तिच्या या शब्दांतून दुसरा कांही भावार्थ प्रगट होत असावा असा मला भास झाला. ' जवळ असतं पण दिसत नाही ' हें ती स्वतःला अनुलक्षून तर बोलली नसेल ? वारूताई वैवाहिक जीवनाला पारखी झालेली, तिच्या नैसर्गिक क्षुधा अतृप्त राहिलेल्या. त्या जागृत होऊन ती विचलित झाली आहे की काय ? असे प्रश्न माझं मन मला विचारूं लागलं.

पण तारुण्याच्या ऐन भरांत म्हणजे वयाच्या पंधरा पासून तीस वर्षांपर्यंत जिनं आपली खडतर वैधव्यदशा निरपवाद रीतीनं भोगली, तिच्या मनाला वैवाहिक सुखाची भुरळ पडेल, त्यापायी ऐकावे लागणारे जनापवाद ऐकायला ती तयार होईल, हेंहि मला शक्य वाटेना. तरीपण काय नेम सांगावा ? बायकोचं लोढणं गळयांत बांधून घ्यायला नको म्हणून चाळीस वर्षं विरक्त राहिलेल्या पुरुषाला जर संसारांत पडण्याचा मोह आवरतां येत नाही, तर स्त्रीला तो आवरतां आला नाही यांत तरी आश्चर्य कसलं ? वारूताईचं मनोगत खरोखरी काय आहे ही माझ्या मनाला चुटपुट लागून राहिली त्या वेळेपासून.

पण मला फार वेळ संशयांत रहावं लागलं नाही. बुवांचं आमच्या घरचं वास्तव्य त्यांना चांगलं मानवलं होतं, आणि ते त्याबद्दल इतकी कृतज्ञता दर्शवीत की यापुढं उपकाराचा किंवा आभाराचा तुम्ही शब्दहि काढतां कामा नये अशीताकीद त्यांना द्यावी लागली. त्याबद्दलच त्यांचं नी वारूताईचं चाललेलं संभाषण सहज माझ्या कानावर आलं. किंवा ते मी बुद्ध्याच दबा धरून ऐकलं म्हटलं तरी चालेल. कारण वारूताई बुवांशी कोणत्या भावनेनं बोलते चालते हें निरखून पाहाण्याचा छंद आताशा माझ्या मनाला लागला होता. बुवा हताश स्वरांत म्हणत होते-" हे पहा वारूताई, मला आता इथून गाशा गुंडाळावा असं वाटायला लागलं आहे. "

" तें हो कां ? " वारूताईचा स्वर घाबरा झाला होता.

" माझं बिघडतंय म्हणून इथून जायचं नाही मला. तुम्ही माझी मिजास

अतिशय संभाळली आहे, पण तसं म्हणायचीसुद्धा बंदी केली आहे मला ताईनी. हा सासुरवास फार तापदायक होतोय मला. बरं का वारूताई, मनासारखं झालं नाही म्हणून रुसण्यारागवण्याचा जसा माणसाचा अधिकार आहे तसा खूष झाल्यावर वाहवा म्हणायचा आणि आभार मानायचाहि माणसाचा अधिकार आहे, असलाहि पाहिजे. पण ताईंनी माझा हक्क हिरावून घेतलाय ताईंचा सगळा उदारमतवादीपणा माझ्या एवढ्या बाबतींत अनुदार झाला आहे, म्हणून म्हणतों."

"कांहो म्हणूं नका आणि मी ऐकत नाही. पण तुम्ही म्हणतांय म्हणून सांगतें, ताईहि तुमची उचलबांगडी करायच्या प्रयत्नांत आहेत. मात्र तुम्हांला एकट्यालाबरीक त्या जाऊं देणार नाहीत."

"म्हणजे?"

"श्रीयुत कंठे यांना सौ. कंठे आणून देणार आहेत त्या."

"वेडबीड लागलंय की काय त्यांना? की कुणा दावेदारिणीचा सूड उगवायचा आहे त्यांना तिला आंधळ्याच्या गळ्यांत बांधून?" बुवा मोठ्यानं हसून म्हणाले, "आणि ताईंना तिचा सूड घ्यायचाच असेल तर तिचा एकटीचा घ्या म्हणावं. तिच्याबरोबर माझा नका घेऊं."

"तुम्हांला छान चांगली बायको मिळवून देणं हा का तुमचा सूड झाला?"

"छान आणि चांगली बायको मिळाली तर—पण हा तरच बिकट वाटतोय मला वारूताई. बायकोचा छानपणा तिच्या चेहऱ्यावरून ठरवतात माणसं. पण माझ्या दृष्टीनं त्याला काय किंमत आहे? अगदी हेडंबेसारखी दिसणारी बायकोसुद्धा माझ्या पुरती अप्सरा ठरेल. माझ्यापुरता बायकोचा छानपणा हा तिच्या मनाचा चांगुलपणा पाहिजे. आडलीनडलेली कुणी बिचारी निरुपाय म्हणून माझी बायको व्हायला तयार झाली, तरी ती आपली सोय पहाण्यापुरती होईल. ज्यांत आपली सोय तेवढंच करायचं अशी तिची हिशेबी दृष्टि राहील. माझी सोय आणि माझं सुख ती थोडीच पहाणार आहे? हें असलं खटलं मला कसं झेपेल? माझ्या सुखासाठी जगणारी बायको मिळाली तर मला उपयोग. पण वारूताई, आंधळ्या नवऱ्याबरोबर आंधळी होऊन जन्म काढणारी गांधारी कलियुगांत मिळणं कठीणच. नवऱ्याचा आधार आपल्याला मिळावा एवढ्यासाठीच कोणी

झाली तरी लग्नाला तयार होणार. पण नवऱ्यालाच आधार द्यावा लागणार अशी माझी अवस्था. मग कोण हें पडकं घर विकत घेणार ? ताईंची माझ्या लग्नाची खटपट खरोखरच चालूं असेल तर हौस म्हणून त्यांनी ती करावी. पण त्या खटपटीला यश मात्र येणार नाही. आणि नाही आलं म्हणून मीतरी खट्टु होणार नाही. ”

“ मग तुम्हाला बायकोबद्दल उत्कंठा नाहीच म्हणतां ? ”

“ ती कां नसेल ? मी झालों तरी मनुष्य आहे. मला डोळे नसले तरी मी धडधाकट आहे. मला मन आहे. विकार आहेत. आपलं लग्न व्हावं, आपण बायकामुलांच्या परिवारांत आनंदांत नांदावं असं मला वाटल्यावाचून कसं राहिल ? माझ्या बरोबरीच्या माणसांचीं लग्नं वाजूं गाजूं लागलीं की माझ्या मनांत कालवाकालव होते. माझ्या लहानपणापासूनच्या सोबत्यांत कित्येकजण विद्याहीन राहिले, कुठं तरी पाणी भरून, भाकऱ्या बडवून ते निर्वाह करतात. पण त्यांचींहि लग्नं झालीं. मी खोटं नाहीं सांगत वारूताई, पण त्यांना मुलगी देणाऱ्या पालकांचा मला राग यायचा त्यांच्या जावयापेक्षां मी विद्येनं, पैशाच्या कमाईनं अधिक असून माझ्याकडं त्यांची दृष्टि वळूं नये, यावरून माझ्यापेक्षा तेच खरे आंधळे आहेत असं मला वाटायचं. पण पुढ पुढं मला असा रागहि येईनासा झाला. डोळे नसल्यामुळं जगांतल्या सौंदर्याला आपण पारखे झालों. तुमच्या तोंडून सुंदर माणसांचं, सुंदर वस्तूंचं, सुंदर स्थळांचं वर्णन नी ऐकलं म्हणजे त्यानं मी प्रथम अस्वस्थ होत असें. पुढं मी मनाची समजूत घालूं लागलों. माणसाला सर्वच सुखं मिळूं शकत नाहीत. एकाला एकाची तर दुसऱ्याला दुसऱ्याची वाण असतेच. मला दिसत नाही तर दुसऱ्याला ऐकूं येत नाही. माझा आवाज गोड, मी गाणं रंगवितों, त्यात रमतों, तर दुसऱ्याला ऐकूच येत नाही, तो मुकाच आहे आणि तो मुका नसला तरी त्याला गायनांतली गोडीच चाखतां येत नाही. असा जर प्रकार आहे, तर मला माझ्या वैगुण्याबद्दल रडत बसण्यापेक्षा आहे त्यांतच जास्तींत जास्त आनंद लुटायचा अशी मनाची समजूत घातली मी. आणि म्हणूनच आंधळा पराधीन असूनहि मी तुम्हाला कधी रंजीस दिसत नाही. का ? बरोबर आहे की नाही माझं ? ”

“ तुमचा हा समजुतदारपणा बघितला आणि तुमची ही तपश्चर्या पाहिली

की तिचं फळ तुम्हाला मिळालंच पाहिजे असं मला वाटतं. ताईची खटपट फळाला यावी—"

" म्हणजे माझी ब्याद दूर व्हावी—"

" इश्श, कुठल्या कुठं बोलणं नेतां बुवा ! तुम्हाला ब्याद कोण म्हणेल ? तुमचा सहवास निरंतरचा लाभावा असं मलातरी वाटतं. देवाची शपथ घेऊन सांगतें तुम्हाला—"

बुवा आणि वारूताईचं संभाषण जसं मी ऐकलं, तसं त्यांच्या चर्येवर त्या वेळीं उमटणारे भावहि मला दिसले आणि वारूताईच्या मनोगताबद्दल जो संशय मला आला होता तो बळावला. कंठेबुवांच्या आयुष्यांतील अपूर्तता भरून निघावी या सदिच्छेनं असो किंवा स्वतःच्या जीवनांतील वंचनेची भरपाई करून घेण्यासाठी असो, दोघांनी एकत्र राहावं अशी ओढ तिच्या अंतर्यामीं होती असं मला दिसायला लागलं व या गोष्टीची शहानिशा करून घेण्याचं मी ठरविलं.

जरकरता माझा संशय खरा ठरला, तर पुढं कसं करायचं ? बुवा-वारूताईचं शुभमंगल करून टाकायचं ? तें सोपं आहे का ? की त्याला व्यत्यय येईल ? हाच विचार माझ्या मनांत दिवसभर धुमाकूळ घालीत होता. निश्चित उत्तर मिळेनासं झालं की माणसाचं मन मधेच कुठंतरी मुक्काम ठोकायला बघतं. माझं तसंच झालं. मी मनांत म्हणालें—" आधी नवरानवरीची तयारी कुठवर आहे हें पाहूं आणि मग पाहूं पुढच्या गोष्टी. "

रात्रीं सगळी आवराआवर करून आम्ही झोपलों. पडल्या पडल्या आज कोणच्या गिऱ्हाइकानं कोणचा जिन्नस घेतला, कोणता पदार्थ उद्या करायचा, कुणाकडून पैसे आले अन् कुणाकडं किती बाकी सांचली आहे, याबद्दल आमच्या गोष्टी चालायच्या. आशाच्या शाळेंत काय झालं, आक्कांच्या घरीं काय घडलं, बुवांचं गाणं कुठं व्हायचंय अशा विविध गोष्टी बोलत आम्ही झोपी जात असूं. पण आज मला झोप येण्याचं चिन्हहि दिसेना. माझ्या मनांत एकादा विषय घोळत असला म्हणजे मला झोप लागतां लागत नाही. वारूताईदेखील आज जागीच असावी असा मला संशय आला. रोज बोलतां बोलतां गाढ झोपणारी वारूताई आज अंथरुणावर नुसती चूळबूळ करीत पडलेली आहे हें पाहून तिच्याहि मनांत कसलीतरी खळबळ चालली असावी असं मला वाटलं. आणि

तशी खळबळ असलीच तर याच विचारानं ती होत असली पाहिजे, असं मला समजून चुकलं. नाहीतर तिच्या मनाची चलबिचल व्हायला दुसरं कोणतं निमित्त होतं ?

आपला अंदाज पडताळून पाहायला ही संधि बरी आहे असं वाटून मी म्हटलं—

" वारुताई ! आज झोप लागत नाही वाटतं तुला ? "

" होय बाई ! काय झालंय कुणास ठाऊक ? "

" उकडतंय आज थोडंसं, त्यामुळं नसेल लागत. चल आपण थोडा वेळ अंगणांत जाऊन बसूं. चांदणंहि चांगलं पडलंय. "

आम्ही दोघी अंगणांत तुळशीवृंदावनापाशी बसलों. मी सुरवात केली- " आज बुवांची तालीम रोजच्यापेक्षा लवकर संपली."

" होय बाई ! हे गवई म्हणजे मोठे नादिष्ट ! परवाचं माहीत नाही तुम्हाला ताई ? दोन वाजून गेले तरी स्वारी गातेच आहे ! मी चक्क जाऊन त्यांच्या पुढला तंबोरा घेतला काढून. "

" बुवांच्याबद्दल तूं अशी काळजी घेतेस याबद्दल कोणीहि कौतुक करील तुझं. निराधार माणूस. कोण विचारपूस करायला बसलंय त्याची ? जगला काय आणि मेला काय ? पण बुवा भाग्यवान. तुझ्यासारखी-- "

" माझं उगीच कौतुक नको ताई, आपल्या हातनं होईल तेवढं करावं एवढं मला कळतं, आणि तेवढं मी करतें यांत काय मोठंसं ? "

आता आडवळणं सोडून मुख्य रस्त्यावर एकदम उडी मारावी असं मी ठरवलं आणि म्हटलं—" वारुताई, बुवाकडं तुझं मन ओढ घेतंय तें केवळ परोपकारबुद्धीनं नव्हे. मी माणसाचं मन ओळखायला शिकलें आहे जगाच्या अभ्यासानं. बुवा तुला दुसरे वाटत नाहीत. ते तुला स्वतःचे वाटतात. तुझं तुला नाही, तरी मला तें कळतंय. बुवांच्या आयुष्याशी तूं एकरूप झालीस तर तूं सुखी होशील अशी तुझ्या अंतर्यामीं ओढ निर्माण होऊं लागली आहे. "

" ताई ! माझ्याबद्दल कां कलुषित करून घेतां आपलं मत ? " वारुताई घाबरलेल्या स्वरानं म्हणाली. मी तिच्या अधिक जवळ सरकलें आणि तिच्या पाठीवर हात फिरवीत म्हटलं " वेडे पोरी, भिऊं नको. माझं मन तुझ्याविषयी

मुळीच कलुषित झालं नाही आणि तसं कधी व्हायचंहि नाही. तूं आज पंधरा वर्षं खडतर जीवन हिमतीनं, चातुर्यानं निभावून नेलं आहेस. ज्या वयांत विकार विचार अनावर असतात त्या जोरदार वयांत तूं आपलं मन आवरून धरलंस. लोकापवादाला निमित्त होऊं दिलं नाहीस. तुझा हा खंबीरपणा खरोखर कौतुकास्पद आहे. आताहि तो अभंग राहील याबद्दल मला शंका नाही. पण वारूताई, तूं मनुष्यप्राणी आहेस. प्राणीमात्राच्या नैसर्गिक क्षुधा तुझ्याहि ठिकाणीं असणारच. त्या क्षुधा निग्रहानं आवरून धरल्यास तरी त्या तुझ्या मनांत उत्पन्नच होणार नाहीत हें कसं शक्य आहे? जें पतिसुख तुला लेशमात्रहि मिळूं शकलें नाही, जें संसारसुख तुला कधींहि अनुभवतां आलं नाही, तें मिळावं असं तुला वाटलं तर तो तुझा दोष नव्हे. वारूताई, मी तुला पाल्हाळ न लावतां सांगतें, तुझी आयुष्यांत झालेली वंचना तुला अस्वस्थ करते आणि अशा अस्वस्थतेंत आयुष्य कंठण्याची तुला मुळीच आवश्यकता नाही. बिघाड सुधारायला काळमर्यादा कधींच नसते असं एक सुभाषित मी विद्वानांच्या तोंडून ऐकलं आहे. म्हणून म्हणतें वारूताई तुझी जखडबंदी करणारे वैधव्याचे पाश तोडून टाक, माझी श्रीमती वारूताई सौ. वारूताई होऊं दे."

वारूताई ताडकन् उठली. आंत जाऊं लागली. आकस्मिक दुःखाप्रमाणं अकल्पित इच्छापूर्तीहि माणसाला दुःसह होते ती अशी! वारूताईची त्यावेळची मनःस्थिति खरोखरच विकल झाली होती. ती बावरून गेली होती.

मी तिला हात धरून बसविलं. तिला मी हृदयाशी कवटाळलं. आणि भ्यालेल्या बालकाला आईनं थोपटावं तसं थोपटीत मी म्हटलं, "भिऊं नको ताई. यांत तूं गैर कांही करीत नाहीस. भलतीसलती गोष्ट करायला मी सांगेन तरी कशी? तुझ्या नशिबानं प्रेमळ, सुस्वभावी, आणि कलावान् जोडीदार आपल्या पायानं चालत तुझ्यापुढं आला आहे. त्याचा स्वीकार कर. तूं सुखी हो. त्यालाहि सुखी कर."

"पण ताई, लोक काय म्हणतील?"

"लोक ढीगभर म्हणतील. बोलून बोलून ते आपली तोंडं शिणवतील आणि तुलाहि सतावून सोडतील. तुझ्याबरोबर मलाहि लोकप्रवादाचा मारा सहन

करावा लागेल. पण हा जाच क्षणिक असतो. लोकांना ज्यांचे त्यांचे विषय असतात. किंवा टीका करायला त्यांना नवे विषय सांपडल्यामुळं पहिल्या गोष्टीचा विसर पडतो. शिवाय ज्याच्यावर आपण आग पाखडतों तीं माणसं तिकडे दुर्लक्ष करतात, त्यांचा जीवनक्रम सुसूत्रपणें चालू आहे, असं पाहूनहि लोक ओशाळतात. एवढंच नव्हे तर निंदकांचे स्तुतिपाठक बनतात असा अनुभव आहे. वारूताई, लोकगंगेच्या रागालोभाला भ्यावं लागतंच, पण जोंपर्यंत आपण कुमार्ग पत्करला नाही तोंपर्यंत त्या रागालोभाला डरायचं कारण नाही. फाटकं पातळ नेसून फिरणारीणीला लोक नांव ठेवतात पण तिला धड लुगडं नेसावयाला मात्र कुणी पुढं येत नाही. अशा लोकांच्या टीकेची कदरतरी कशासाठी करायची? वारूताई, मी तुला रस्ता दाखवितें आहे. तो अनीतिकारक नाही...जो तुझा स्वाभाविक हक्क आहे तोच तूं बजावून घे असं माझं म्हणणं आहे सगळं जग तुझ्यावर कांव कांव करीत उठलं तरी तुझी ही गुजाताई तुझ्या पाठीशीं आहे ही खात्री बाळग. चल, स्वस्थ पड आता. उद्याच्या सुखी जीवनाच्या गोड स्वप्नांनी आनंदमय झालेली गोड झोप घे. चल!"

वारूताई माझ्या खांद्यावरील मान हालवेना. ती भारावल्यासारखी झाली होती. अर्ध्या घटकेआधीची तिची उसळी कुठल्या कुठं गेली होती. थोड्या वेळानं ती म्हणाली "ताई, एक गोष्ट विचारूं? रागावणार नाही तुम्ही?"

"खुशाल विचार."

"ताई, माझ्यासारख्या तुम्हीहि मनुष्य प्राणीच आहां. तुम्हीहि अजून वैराग्य येण्याइतक्या म्हाताऱ्या झालां नाही. माझ्याहून तुम्ही फारतर चार पांच वर्षांनीच थोर असाल. मग जें सुख मला मिळत नाही म्हणून तुम्ही हळहळतां तें सुख तुम्हालातरी कुठं आहे? तें मिळविण्याची तळमळ तुम्हाला कां नाही?"

"बरोबर आहे तुझी शंका वारूताई. स्त्रीला असतात त्या सगळ्या भावना माझ्या अंतर्यामीं आहेत आणि त्यांची तृप्ति न झाल्यामुळं मलाहि अस्वस्थता वाटल्यावाचून राहात नाही. मी विरक्तपणाचा खोटा डौल आणीत नाही. मला सत्तेचीं घर—माणसं आहेत. तीं प्रेमळ आहेत, सज्जन आहेत. माझ्या योग्यतेपेक्षा शतपट थोर आहेत. मला तीं ये ये म्हणून आग्रहहि करतात. पण

त्यांचंच सुख वृद्धिंगत व्हावं, त्यांच्या थोरवीचा प्रकाश पाडण्याला त्यांना वाव द्यावा म्हणून मी त्यांच्या मार्गांतून दूर झालें आहे. तुझ्या आयुष्याची दुर्दैवानं फसगत केली पण माझ्या सुदैवानं माझ्या माणसांच्या विकासांचा मार्ग मला सापडला. या प्रयोगांत मी माझ्या सुखाला मुकलें अशी हळहळ मला वाटली तरी ती क्षणभरच टिकते. आणि माझीं माणसं खरीं सुखी झाल्याच्या आनंदांत मी रंगून जातें. वारूताई, माझी माणसं विद्याविभूषित आहेत आणि विद्येबरोबर उदार विचारहि त्यांच्यामधे बाणले आहेत. या विचारांचं अमृत मलाहि थोडंसं प्यायला मिळालं आहे. दुसऱ्याला सुखी करण्यांत मिळालेलं सुख तेंच खरं सुख असं माझ्या माणसांनीच माझ्या मनावर बिंबविल्यामुळं मी माझ्या स्वतःच्या सुखाला पारखी होऊनहि आनंदांत रंगलेली असतें. मी तुला फिरून संसाराची दीक्षा घ्यायला सांगतें आहे ती तूं सुखी व्हावंस या एकाच उद्देशानं नव्हे. तर दुसऱ्या एका हतभागी जीवाला सुख द्यावंसं वाटलं म्हणून. दुर्दैवानं जिच्या जन्माचं वाळवंट केलं पण त्यांतच फुलबाग फुलवायची धन्यता तुला वाटावी म्हणून. केवळ तुझं एकटीचं सुख एवढीच माझी दृष्टि असती तर अंधळा नवरा मी तुझ्यासाठीं निवडला नसता. तुला पति प्राप्त करून देण्यापेक्षा आंधळ्याची काठी होण्याचा बहुमान तुला मिळावा हा माझा खरा उद्देश आहे."

माझी वकिली प्रभावी ठरत आहे हें मला दिसत होतं. तरीपण 'मला हे अवघड वाटतं, लोक नावं ठेवतील याची भीति वाटते, त्यांतल्या त्यांत आक्का, बापू, बाळाभाऊसारखीं घरोब्यांतलीं माणसंहि नाराज होतील याचो फारच भीति वाटते' असं ती म्हणत होती. 'तुझं तूं बघ. दुसऱ्यांना मी पाहून घेईन' असा धीर मीहि तिला देत होतें.

आक्का बापू आणि बाळाभाऊंपुढं मी हा प्रश्न ठेवला. बापू आणि बाळाभाऊ प्रथम थोडावेळ 'जरासं चमत्कारिक वाटतंय' असं म्हणाले, तरी मी करत असलेली खटपट वावगी नाही अशी त्यांची समजूत पटली. एवढंच नव्हे, तर कार्य निश्चित झाल्यावर पुढाकार घेण्याची सिद्धताहि त्यांनी दाखवली आक्कांना मात्र ही गोष्ट 'भलतंच कांहीतरी' या प्रकारची वाटली. 'म्हातारपणीं कशाला हवे आहेत असले खेळ' असं त्या म्हणाल्या आणि नसत्या भानगडी उकरून

काढायची मला खोडच आहे असा त्यांनी माझ्यावर शेरा मारला. आक्कांची मान्यता या बेताला मिळेल अशी माझी अपेक्षाच नव्हती; तरीपण त्यांनी प्रथम नाक मुरडलं तरी गोष्ट होऊन गेल्यानंतर त्यांचा राग शमतो आणि पहिल्या-सारख्या प्रेमानंच त्या माणसाशी वागूं लागतात हें मला ठाऊक होतं. आशा विश्वासला मी आणलं त्या वेळींहि प्रथम त्यांचा सूर विरोधाचा होता. थोड्याच वेळांत विरोध लयाला जाऊन त्याची जागा प्रेमानं घेतली. देवानं कांही अंतः-करणं प्रेमाचीच घडवलेलीं असतात आक्कांचं अंतःकरण तसं असल्याबद्दल माझी खात्री होती म्हणून मी त्यांच्यापुरती निर्धास्त होतें.

आता मुख्य गोष्ट करायची उरली ती नवरदेवांची संमति मिळवणं. वारूताई बाहेर कामाला गेली आहे आणि बुवाहि शिष्यपरिवारांतून मोकळे आहेत अशी संधि साधून मी त्यांच्या खोलीत गेलें आणि म्हटलं–" बुवा, एक आनंदाची गोष्ट सांगायला आलें आहे मी तुम्हांला ! "

बुवा हसले.

" म्हणजे ! आधीच कळली आहे वाटतं बातमी तुम्हाला ? बाकी आनंदाची बातमी सांगायची कुणाला झालं तरी घाई होणारच. "

" हें पहा ताई, तुम्ही माझ्याबद्दल कांही खटपट चालविल्याची कुणकुण मला लागली आहे. तुमचा प्रयत्न सिद्धीला गेला असला तर तुम्हांला आनंद होणं साहजिकच आहे; आणि ती बातमी आनंदाची म्हणून सांगायला तुम्ही यावं हेंहि योग्य आहे. पण ती बातमी माझ्या दृष्टीनंहि आनंदाचीच असेल याचा काय नेम ? माझ्या लग्नाबद्दलच सांगणार आहा ना तुम्ही ? "

" होय. तुमचं लग्न मी ठरवलंय. "

" खरं ? मी सुखी व्हावं म्हणूनच ना ? "

" नाहीतर कशासाठी करायचं असतं लग्न ? सुखाचा जीव दुःखांत पाडण्या-साठी लग्नं करायचीं नसतात. "

" पण माझ्या बाबतींत तीच शक्यता वाटत आहे. असलं हें आंधळं ध्यान सुखासुखी कोण पतकरणार ? कांहीतरी करून अडचणींत पडलेली किंवा दुसऱ्या कसल्या परिस्थितीनं नाडलेली बाई होईलहि तयार. पण हा जुलमाचा रामराम दोघांनाहि सुख देऊं शकणार नाही. ताई, मी अंधळा असलों तरी माझं मन

मेलेलं नाही. मलाहि बायको असावी असं वाटतं. पण त्याबरोबरच असमाधानी बायको हें दुःखाचं मूळ आहे हेंहि मला कळतं. दुःखाच्या मोबदल्यानं सुख विकत घ्यायची हिंमत होत नाही मला. ताई, एकाद्या मुलीच्या वचनांत गुंतूं नका. प्रथम तिला माझं दर्शन घडवा. या भेसूर आंधळ्याला पहातांच ती मागल्या पावलीं पळ काढील. तसा काढला तर तिची, तुमची आणि माझीहि सुटका होईल. औषधावाचून खोकला घालवा ताई."

"बुवा, तुमचं मन मी जाणतें. आणि तुमच्या एकूण एक शंकांचं निवारण करील अशीच जोडीदारीण मी तुमच्यासाठीं निवडली आहे. मी निवडली आहे म्हणण्यापेक्षा तिनं तुमची स्वखुषीनं निवड केली आहे. तुम्ही म्हणाल ती कुणी खुळं कावरी असेल. तसंहि नाही. माझ्यापेक्षाहि चतुर, हुशार आहे ती. एवढंच तुम्हाला सांगतें."

"अशी अद्वितीय चीज कुठं पैदा केलीत तुम्ही ताई? माझी थट्टा तर करत नाही तुम्ही?"

"यापुढचं सारं कांही वारूताई सांगेल तुम्हाला. ती म्हणेल त्यावर शंका कुशंका काढूं नका. स्वतःचा प्रश्न सोडवतांना कुणालाहि बावरायला होतं. दुसरेच साधक बाधक विचार करून ते प्रश्न योग्य प्रकारें सोडवीत असतात. तुम्ही आमच्यावर विश्वास ठेवा."

'संध्याकाळीं आक्कांनी बोलावलंय, रात्रीं आलें तर परत येईन' असं सांगून मी बुवा-वारूताईंना एकान्त दिला. बुवांशी झालेलं बोलणं मी वारुताईला सांगितलं आणि दोघांनी या प्रश्नावर विचार करून अनुकूल निर्णय घ्यावा अशी तिला सूचना दिली.

सकाळीं मी परत येतांच "काय ठरलं?" असं वारूताईला विचारलं. ती नुसतं हसली. मलाहि आनंद झाला.

कार्याचा बडिवार मी फारसा माजविला नाही. आम्ही होऊन त्याचा गाजा-वाजाहि केला नाही, तरी पण गावांत कंठेवारूताई विवाहाचा बभ्रा व्हायचा तितका झालाच. आमच्या कांही ग्राहक बायकांनी सौ. वारूताईचं अभीष्टचिंतन केलं, तर कांहीजणींनी नाकं मुरडलीं. कांहींनी तर पाट लावायचाच होता तर बारान्बारा वर्षं कशाला सोवळेपणाचा आव लाणला; अन् करायचाच होता तर

चांगला धडधाकट पाहून तरी करायचा होता, असे टोमणे द्यायलाहि कमी केलं नाही. याच्याहि पुढं जाऊन कांहींनी कंड्या पिकविल्या की एका घरांत राहून खेळ केले ते अंगाशी आले, ते निस्तरण्यासाठी हा लग्नाचा तमाशा करावाच लागला. एक ना दोन, हजार जिभा हजार प्रकारांनी वळवळल्या. पण आम्ही त्याला बुझलों नाही, भ्यायलों नाही. हें व्हायचंच असं आम्ही आधीच गृहीत धरलं होतं. असं झालं नसतं तरच आम्हाला नवल वाटलं असतं.

वारूताईचा संसार स्वतःच्या घरीं सुखानं सुरू झाला. बुवांची ती व्यवस्थापिका बनली. आतापर्यंत पैसा यदृच्छेनं मिळेल तो मिळेल असा बुवांचा खाक्या होता. पुष्कळदा बुवांचे कार्यक्रम फुकटावारी होत. पण वारूताईनं अशा कार्यक्रमांची संभावना भरपूर झाली पाहिजे, शिष्यगणानं गुरुदक्षिणा नियमितपणानं दिली पाहिजे, असा पायंडा पाडला. बुवांच्या घराप्रमाणं त्यांच्या व्यवसायाचीहि तिनं उत्कृष्ट शिस्त लावली.

माझी एक साहाय्यकर्ती मला दुरावली. आपल्या घरची गैरसोय तिनं तिळमात्रहि करतां कामा नये अशी माझी तिला ताकीद होती. तरीपण सवडींत सवड काढून वारूताई प्रहरभरतरी माझ्याकडं येतच होती. आणि आमच्या प्रपंच वस्तु भांडाराची कामं पहिल्या इतक्याच हौसेनं आणि तत्परतेनं उरकत होती. आमच्या भांडाराची भरभराट व्हायला तिचेच श्रम कारणीभूत होते याची जाणीव मला होती आणि या भांडारावर आम्ही जी कांही पुंजी साठवली होती तिच्यावर तिचाच अधिकार होता. लग्नाच्या वेळीं हजार रुपयांचे अलंकार मी तिच्या अंगावर घातले अन् आपल्या घरीं जायला निघाली तेव्हा बँकेचं पासबुकहि मी तिच्या हातीं दिलं. तें माझ्या अंगावर भिरकावून वारूताई रागानं म्हणाली, " शोभतं नाही तुम्हाला हें ? "

" अग, यांत शोभायचा न् न शोभायचा प्रश्न येतोच कुठं ? ही तुझीच कमाई आहे आणि ती तुझ्या हातीं दिली यांत विशेष तें काय झालं ? "

" माझी कमाई ? ताई, तुमच्या आसऱ्याला मी आलें ती तुझं माझं करायला आलें नाही. इथलं सगळं कांही तुमचं आहे आणि माझं आहे—फार काय आशाचं आहे, विश्वासचं आहे, या द्रुपदीचंहि आहे, या भावनेनंच मी इथं

राहिलें. आणि ताई, माझे श्रम झालेच असतील तर त्याचा मोबदला तुम्ही मला कमी का दिलात? आईसारख्या ममतेनं माझं पालन पोषण केलंत, माझ्या मेलेल्या आयुष्यांत जिवंतपणा भरलात. माझ्या भगभगीत कपाळावर सौभाग्याचं कुंकू तुमच्या हातानं लागलं. याहून दुसरं कोणतं बक्षीस तुम्ही द्यावं आणि तें मी घ्यावं? ताई, तुम्ही मला आता एकच गोष्ट द्यायला हवी आणि ती हीच की जी ममता तुम्ही आजपर्यंत माझ्यावर करत आलां ती मी दूर गेलें म्हणून कमी करूं नका. मला तुम्ही दूरदूर ठेवूं नका. ताई, तुम्ही माझ्याजवळ या. माझं घर हेंहि तुमचंच घर समजा."

माझ्या आयुष्यांतलं वारूताईचं हें दुसरं प्रकरणहि आनंददायक वठलं. माझे या वेळचे ग्रह अनुकूल आले होते की काय कुणास ठाऊक! एकेक गोष्ट मनासारखी घडत चालली होती हें मात्र खरं. वारूताईच्या लग्नाच्या गडबडींत आशाच्या परीक्षेचीहि गडबड आली होती. मला तिकडं फारसं लक्ष देतां येत नव्हतं. तरीपण ती पोरटी जात्याच हुशार. आमची गडबड ओळखून ती आपली आपण सोय लावून घेत होती. तिची परीक्षा केव्हा कशी होऊन गेली हें तिनं आम्हाला कळूंसुद्धा दिलं नाही.

पावसाळ्याच्या सुमारास परक्षिचा निकाल आला. आणि आशा पास झाल्याचं छापून आलं एवढंच नव्हे, तर तिचा विद्यार्थिनींत बराच वरचा क्रमांक आला होता; व तिच्या हायस्कुलांत तर तिचाच पहिला नंबर आला होता. आईबापावेगळी पोर हातीं धरली त्याचं सार्थक झालं असं समाधान मला वाटलं. आणि त्याबरोबरच दुसऱ्या एका आठवणीनं डोळ्यांत पाणी आलं. विश्वासलाहि असंच शिकवून शहाणं करतां आलं नाही, एवढंच नव्हे तर आपण आपल्या अडाणीपणामुळं त्याला वाऱ्यावर उधळून लावलं, या कल्पनेनं पोटांत कलबललं. पोर सुखांत असेल का, की कुणाच्यातरी नादानं कुठंतरी भरकटत जाऊन त्याचे तीन तेरा झाले असतील, अशा कुशंकावर कुशंका मनांत गोंधळ माजवूं लागल्या.

वारूताईची अवस्थाहि माझ्यासारखीच झाली होती. आशानं मॅट्रिकच्या परीक्षेंत चांगल्या प्रकारें विजय मिळविला याबद्दल तिच्या माझ्यापेक्षा बुवांना अन् वारूताईला जास्त आनंद झाला. त्यांनी किमानपक्षी १०।१५ रुपयांचे पेढे वाटले असतील, एवढंच नव्हे तर आमच्या गोतावळ्यांतल्या सर्व मंडळींना

चमचमीत मेजवानी दिली, आणि त्या समारंभांत आशाला रेशमी साडी, जरीचा झंपर आणि खड्याची कर्णफुलं असा शोभीवंत आहेरहि केला.

" पोरीचे आईबाप मरून गेल्याबद्दल हळहळण्यापेक्षा तिला कौतुक करणारी अशीं मायेचीं माणसं लाभल्याबद्दल तिला धन्यवादच द्यायला हवेत. " असं बापू म्हणाले.

आक्कांनीहि आशाबरोबर माझं न् वारूताईचं कौतुक केलं. मला ब्रह्मानंद वाटला.

पण त्याच वेळीं वारूताईचा शोकावेग अनावर झाला. ती उठून आंत गेली. आपल्यामुळं दुसऱ्यांच्या आनंदावर विरजण पडायला नको म्हणूनच ती उठून गेलेली होती. तिच्या दुःखाचं मी अजमावलं होतं तेंच कारण खरं ठरलं. या आनंदाच्या प्रसंगीं आपला लाडका विश्वास आपल्यांत नाही ही हळहळ तिला दुःसह झाली होती. पण दुसरे दिवशींच्या पत्रानं ती पुष्कळच सौम्य झाली.

आशाताईला तिच्या विश्वासनं अभिनंदनाचं पत्र लिहिलं होतं. आपला पत्ता लागूं न देण्याची सावधगिरी मात्र त्यानं घेतली होती.

त्यानं लिहिलं होतं " प्रिय आशाताई, तुझ्या परीक्षेचा निकाल पाहिला आणि मला किती आनंद झाला म्हणून सांगूं ? मी माझ्या प्रोफेसरांना आणि मित्रांना पेढे वाटले तूं वरच्या नंबरांत पास झालीस म्हणून. मी तुझं अभिनंदन करतों मनापासून.

"ताईला आणि मावशीला माझे नमस्कार सांग. मी त्यांना न सांगतां न सवरतां पळून गेलों म्हणून त्या माझ्यावर रागावल्या असतील. मलासुद्धा किती वाईट वाटलं. इथं येईपर्यंत आणि इथं आल्यावरसुद्धा मला सारखं रडायला येत होतं. आणि खरं सांगूं तुला ? आज दोन वर्षं व्हायला आलीं तरी रोज रात्रीं झोपतांना ताईची आणि मावशीची आठवण येऊन मला रडायला येतं. माझ्या मित्रांबरोबर मी कधीकधी त्यांच्या घरीं जातों. त्यांची आई बहीण बघितली आणि त्यांचं प्रेमाचं बोलणं ऐकलं की तिथून पळून जावं आणि घरीं येऊन ताईला मिठी मारावी, मावशीच्या मांडीवर बसावं, आणि तुला चिडवावं, चिमटे काढावे असं कित्ती कित्ती वाटायला लागतं.

" पण ताई, आणखी थोडे दिवस मी तुमच्यापासून दूर राहाणार आहे. तुला

एक आनंदाची बातमी सांगतों. मी ड्रॉईंगची परीक्षा पास झालों मी आता पेंटिंगचं काम शिकतों. आमच्या प्रोफेसरांनी एका नाटक कंपनीचे पडदे आणि सीन रंगवून दिले त्यांत मी पुष्कळ काम केलं. एक पडदा मी एकट्यानंच पुरा केला; प्रोफेसरांनी शाबासकी दिली त्याबद्दल. माझ्यावर त्यांची मर्जी आहे म्हणून फी न घेतां मला ते शिकवतात आणि मी त्यांच्याइथंच राहातों. आईसुद्धा माझ्यावर माया करतात ताईसारखी, पण त्या कधी कधी रागावतातसुद्धा. एकदा कलेचं एक चित्र करायच्या नादांत जेवायला यायला उशीर झाला म्हणून त्यांनी मला रागं भरलं. ताई, मावशी कधी रागं भरत नाहीत.

"माझ्या मातीच्या मूर्ती चांगल्या होतात असं प्रोफेसर म्हणतात. आता दगडाच्या मूर्ती कोरायलाहि ते मला शिल्पकार जनार्दन यांच्याकडं धाडणार आहेत. कोणतंतरी काम चांगलं शिकून मगच मी घरीं येईन. ताईमावशीचा राग मग आपोआप जाईल. माझी प्रकृति छान आहे हें तुला फोटो पाठवला आहे त्यावरून कबूल करावं लागेल. ताईला आणि मावशीला माझे नमस्कार सांग हं. नाहीतर विसरशील. तुझा विश्वास."

या पत्रानं आमच्या मनावरलं एक मोठंच दडपण दूर झालं. पोरटं कुठंतरी जाऊन फसलं असेल ही चिन्ता त्या पत्रानं दूर केली. विश्वास चांगल्या ठिकाणीं चांगल्या स्थितींत आहे हें त्याच्या पत्रानं आणि चित्रानं दाखवून दिलं होतं. कलेच्या नादानं तो कोणा असंस्कृत माणसाच्या भजनीं लागलेला नाही हेंहि त्या पत्रानं पटविलं. त्याच्या पत्राची भाषा तो कोणा सुसंस्कृत गुरूच्या तालमींत आहे हें दाखवीत होती आणि त्या पत्रांतून त्याच्या आमच्याविषयीच्या कोमल भावना अभंग आहेत हेंहि प्रत्ययास आलं होतं. त्याच्या फोटोंत वाढत्या वयाचा रसरशीतपणा दृष्टोत्पत्तीस येत होता. आशानं विश्वासचं पत्र आणि फोटो मावशीला नेऊन दाखविला तेव्हा ती आनंदानं बेहोष झाली. आपल्या या हर्षांत आपल्या बुवांनाहि भागीदार करावं असं तिला वाटलं व ती उद्गारली "अहो, माझा विश्वास सापडला. खुशाल आहे बरं का तो! बघातरी कसं रसरशीत झालंय पोरटं."

तिनं फोटो बुवांपुढं केला. आणि लगेच तिची चूक तिला उमगली. तिनं जीभ चावली. आपल्या या उतावळ्या बोलण्यानं नवऱ्याच्या आंधळेपणाची

आपण थट्टा केली असं त्याला वाटलं असेल या शंकेनं ती शरमल्यासारखी दिसली. ती सारवासारव करण्यासाठी म्हणाली " बरं का, मी आमच्या विश्वास-बद्दल सांगत नव्हतें का ? तो आज चांगलीं चित्रं काढायला लागलाय म्हणे. एकदा एक मनांत भरलं की तें केल्याशिवाय सोडायचं नाही असा निर्धार असतो त्याचा. झाला की नाही चित्रकार ? आणि ताई त्याच्यावर उगीचच रागवायच्या. पत्राबरोबर त्यानं आपण काढलेलं एकादं चित्र का ग नाही धाडलं आशा ? "

" मावशी आंधळी झाली आहे ही बातमी कळली असेल त्याला. आंधळ्याची बायकोहि आंधळी........ " बुवांनी वारूताईची थट्टा केली.

आपल्या विवाहाच्या आनंदोत्सवाप्रीत्यर्थ असो, आशाच्या यशाचं कौतुक वाटल्यामुळं असो किंवा विश्वासची खुशाली कळल्याच्या समाधानामुळं असो, वारूताईनं आपल्या परिवारांतल्या मंडळींसाठी मनोरंजनाचा एक कार्यक्रमहि आखला. हा मनोरंजक कार्यक्रम म्हणजे बुवांच्या गाण्याशिवाय दुसरा कोणता असणार ?

बुवांच्या घरींच गाणं झालं. बुवांचे चाहते असे गावांतले कांही रसिक आणि प्रतिष्ठित स्त्रीपुरुष उपस्थित होते. दादाजी सराफांबरोबर एक अपरिचित तरुण आला होता. कुणाचंहि लक्ष वेधावं असा उमदेपणा त्याच्या चर्येत होता. बुवांच्या गाण्याचा खरा आस्वाद कोण चाखीत असेल तर तोच असं दिसत होतं. गायनाच्या कार्यक्रमांत संगीतांतल्या माधुर्याचा आस्वाद घेणाऱ्या रसिकांपेक्षा आपण रसिक आणि मर्मज्ञ आहों असा आव आणणारे आंबटशोकीच फार असतात. ते उगीचच डुलत असतात आणि वेळीं अवेळीं वाहवा देऊन गायकापेक्षा श्रोतृवर्गावर वजन मारतात. पण सराफांबरोबर आलेला तरुण यापैकी दिसला नाही. तो बुवांच्या बागेश्री मालकंसांत रंगला आहे हें सहज कळण्यासारखं होतं. समाधीसारखी त्याची तल्लीनता दिसत होती. इतरांच्या वाहावात तो क्वचितच आपला सूर मिळवी. बुवांनी चार दोन खुबीदार जागा घेतल्या त्या वेळीं मात्र त्यानं वाहावा म्हटलं. त्या वाहावांची किंमत ओळखून बुवांनी त्याच्याकडं मान वळवून कृतज्ञतेचा मुजरा केला.

बुवांच्या गाण्याच्या कार्यक्रमांत त्यांच्या आवडत्या शिष्येच्या-आशाच्या भावगीतांचा अंतर्भाव असायचा हें अलीकडं ठरूनच गेलं होतं. आजहि तिला दोन भावगीतं म्हणावीं लागलीं. आणि तीं सुंदर वठलीं; इतकीं की इतर श्रोत्यांइतकेच—काकणभर जास्तच—स्वतः बुवा डुलत होते. ' भले बेटा! भले शाबास बेटा! ' अशा कौतुकोद्गारांनी तिला उठाव आणीत होते. शिष्याच्या करामतींत गुरूचीहि कृतार्थता भरलेली असते. आपण केलेले परिश्रम अनाठायीं नाहीत, आपण पेरलेलं बीज उजाड माळरानावर न पडतां खऱ्या सुपीक जमिनींत पडलं, तरारून उगवलं, फोफावलं, त्याचं सार्थक झालं, अशी धन्यता त्याला वाटते. बुवांना आशाच्या गीतगायनानं अशी धन्यता वाटत होती. तिनं केलेल्या स्वरांचा भावनिदर्शक आरोह अवरोह ऐकून त्यांच्या डोळ्यांतून पाणी ठिबकूं लागे. बुवांची ही तऱ्हा तर इतरेजनांची कथा काय? बुवांनी अखेरची भैरवी सुरू केली तिलाहि आशाला साथीला घेऊन त्यांनी तिचं गाननैपुण्य अधिकच खुलवून दाखविलं. बुवांचं न् आशाचं गाणं आम्ही रोज ऐकत होतों. पण त्यांत इतका रंग भरलेला आम्ही कधीच पाहिला नव्हता.

आता माझ्यापुढं मुख्य प्रश्न कोणता उभा राहिला असेल तर आशाचं पुढं काय करायचं? तिला कॉलेजमधे पाठवायची तर खर्चाची तरतूद कशी करायची? तिनं परीक्षेंत मिळविलेल्या गुणांवर तिला कॉलेजांतील शिष्यवृत्ति, निदान फीची माफी मिळेल असं माणसं म्हणत. तरी देखील महिना ३०।४० रुपये तिला लागणारच होते. तेहि मी पुरवले असते. पण बी. ए., एम्. ए., करण्यांत तिच्या जन्माचं सुख तिला मिळवून दिल्यासारखं होईल काय, याबद्दल मला शंकाच वाटत होती. मी मोठ्या वकील मुन्सफांच्या आणि प्रोफेसरांच्या कांही पदवीधर बायकांचं पाहात होतें. त्यांची पदवी प्रतिष्ठा मिरविण्यापेक्षा कशालाच उपयोगी पडत नव्हती, उलट नडत मात्र होती. सामान्य स्त्रीसारखीं गृहकृत्यं सराव नसल्यामुळं त्यांना करायला येत नसत हें एक आणि आपल्यासारख्या पदवीवाल्या बाईनं धुणंपाणी करायचं आणि भाकरी भाजायच्या म्हणजे काय, असं वाटायचं हें दुसरं. कांही शिकलेल्या बायका मूळच्या गरिबाच्या मुली असल्यामुळं त्यांना गृहकृत्यांची संवय होती, आणि तीं त्यांना येतहि असत. पण आतां मोठ्याच्या बायका झाल्यावर गरिबींतले

कष्टच कशासाठी पुढं चालूं ठेवायचे असं त्यांना वाटत असे. अशा एका बाई-साहेबांचं चरित्र पाहून मी थक्कच झालें होतें. घरकामांतली इकडची काडी तिकडं करण्याचे कष्टहि त्या घेत नसत. बाजारहाट गड्यांनी करायचा, ठेवरेव मोलकरणीनं आणि स्वैपाकपाणी बाईनी पहायचं. मुलांचंसुद्धा गडीमाणसांनी करायचं. बाईसाहेब आपल्या बैठकींतून हुकुम सोडत असायच्या. जेवायपुरत्या त्या साहेबांबरोबर खाली येत. जेवण झाल्यावर तपेली टॉवेल घेऊन मोलकरीण हातावर पाणी घालायला तयार असावी लागे! अशा थाटमाटाचा आणि मिजा-शीचा व्हायचा तोच परिणाम झाला. बाईसाहेबांचीं मुलं निःशक्त आणि वाईट खोडीचीं झालीं, त्यांना औषधं इंजेक्शनं देऊन डॉक्टरांनी आपले खिसे गरम करून घेतले. गडीमाणसं गबर झालीं. आणि रावसाहेब देणी भागविण्यासाठी लाच खाऊन गोत्यांत आले. या सुशिक्षित म्हणून मिरवणाऱ्या बायका आत्म-घातकी, पतिघातकी, पुत्रघातकीच नव्हेत का? एका प्रोफेसराच्या बी. ए. बायकोचं मी पाहिलंय. क्लबांतलं टेनीस बॅडमिंटन, श्रीमंतांच्या बायकांना चहा-पार्ट्या, शेजारपाजारच्या सामान्य बायकांना नावं ठेवणं आणि त्यांतून फावलंच तर कादंबऱ्या वाचणं. त्यांच्या मुलामुलीला बाहेरच्या मास्तर मास्तरणीची शिकवणी! प्रोफेसरांच्या ग्रंथलेखनास निदान प्रुफं तपासण्यापुरती, मुद्रणप्रत तयार करण्यापुरती तरी मदत यांना करतां आली असती आणि आपल्या मुलांची शिकवणी यांनी केली असती तर नवऱ्याच्या मोजक्या मिळकतीवरचा ताण पुष्कळच कमी झाला असता.

मी हीं उदाहरणं दिलीं यावरून मला स्त्रियांच्या शिक्षणाविषयी तिटकारा वाटतो असं कुणाला वाटेल पण तें खरं नाही. मला शिक्षणाची किंमत कळते. मला शिक्षण मिळालं नाही म्हणूनच सुशिक्षित पतीचं साहचर्य मला दुःसह झालं आणि स्त्रीच्या आयुष्यांतल्या एका मोठ्या सुखाला पारखं व्हावं लागलं. रूपाच्या अभावाला विद्येच्या अभावाची जोड मिळाल्यामुळं मी अशी असून नसल्यासारखी झालें हें दिसत असून मी विद्येला तुच्छ कशी लेखीन? मी शिक्षणाला, विद्वत्तेला कधीं नावं ठेवणार नाही, त्यांचा उपहास करणार नाही. माझा आक्षेप आहे तो विद्या मिळवून तिचा सदुपयोग न करण्याबद्दल. मुलं आणि नवरा या व्यक्तींच्या नव्हे, तर कुटुंब या संस्थेच्या आणि पर्यायानं

समाजाच्या स्वास्थ्याला, उर्जितावस्थेला साहाय्य करणं हा विद्येचा खरा उपयोग. रावजी म्हणायचे तें मला आठवतं. ‘ स्त्रीचा जन्म चूल आणि मूल यांतच गुरफटून राहतो अशी तक्रार पुष्कळ स्त्रियांची असते. पण गृहिणीची दीक्षा समजून उमजून पत्करल्यावर अशी कुरकूर करण्यांत काय अर्थ आहे ? आणि पुष्कळ सुशिक्षित स्त्रिया अनुकूलता असूनहि घर सुस्थितींत ठेवीत नाहीत, नवऱ्याला स्वास्थ्य देत नाहीत, मुलांचं संगोपन करीत नाहीत. अशा स्त्रियांनी चुलमुलाची तक्रार करणं कितपत योग्य ठरेल ? पदवी म्हणजे ऐषआरामाचा परवाना नसून स्वीकारलेली भूमिका उत्तमोत्तम प्रकारें पार पाडण्याची जबाबदारी असा आहे. ’

विचारांच्या या गोमकाल्यांत आशाला कोणची दिशा दाखवावी याबद्दल माझ्या मनाचा निर्णय होत नव्हता. आक्कांना विचारावं तर त्या म्हणाल्या, “ शिकवलंत तितकं पुरे झालं. जास्ती शिकवून करायचंय काय ? जास्ती शिकल्याचा काय उजेड पडतोय तो दिसतोय ! नुसतीं थेरं करायला मात्तर शिकतात मेल्या ! आशाच्या मनांत भलतं सलतं कसलं वारं भरलं नाही तवर बघा एक बरासा नवरा आणि टाका त्याला देऊन. घेतली आहेस खरी गळ्यांत, एकदा ती दुसऱ्याच्या स्वाधीन कर आणि हो मोकळी ! ”

बापूंचं म्हणणं आशाला कॉलेजमधे पाठवायचं झेपत असल्यास पाठवावं असं पडलं आणि त्याच वेळीं वरसंशोधनाला लागण्याची सूचनाहि त्यांनी केली. जमलं मनासारखं तर उडवून द्यायचा बार. बापू आक्कांची दृष्टि पूर्ण व्यवहारी होती.

वारूताईची महत्त्वाकांक्षा मात्र मोठी होती. आशानं बी. ए. एम्. ए. व्हावं आणि त्यासाठी आपली ओढाताण झाली तरी हरकत नाही. आणखी चार कामं करून करतां येईल पोरीची तरतूद. पण आपला जन्म जसा शिक्षणाविणं वाया गेला तसा आशाचा जातां कामा नये. आशा पंडिता झाली तर तिचा मोठेपणा वाढेल, तसा मोलमजुरी करणाऱ्या आपल्यासारख्या बायकांनी आपली मुलगी शिकवून मोठी केली याबद्दल आपल्यालाहि लोकांत मोठेपणा मिळेल.

बुवांचं म्हणणं वेगळंच. ते म्हणाले, “ कॉलेजचं खर्चिक शिक्षण घेण्यापेक्षा घरच्या घरीं देतां येईल तें संगीताचं शिक्षण तिला द्यावं. देवानं तिला आवाजाची सुंदर देणगी दिली आहे ती वाया दवडूं नये. आपण दोन चार वर्षांत तिला

फक्कड गायिका करूं. अलीकडं पदवीधर बायकांपेक्षा गानदेवतांचीच जगांत चहा होते. आशाचा खरा लौकिक गाण्यामुळं होईल तसा बी. ए. होऊन कधीहि होणार नाही."

खुद्द आशाला विचारलं तर ती म्हणाली "तूं सांगशील तें करीन मी."

अनेकांचीं हीं अनेक मतं ऐकून माझा गोंधळ कमी होण्याऐवजी बळावला मात्र! पहिल्यांदा तिला कॉलेजांत पाठवावं की पाठवूं नये एवढा एकच प्रश्न होता. आतां कॉलेज, गायन आणि लग्न असे तीन प्रश्न पुढं उभे राहिले आणि या आमच्या वाटाघाटींत कॉलेजं उघडलीं तरी आमचा निर्णय झाला नाही. शेवटी वर्ष वाया जाऊं देण्याऐवजी संगीत तरी वाढवावं या बुवांच्या विचाराची सरशी होऊन आशा सकाळ संध्याकाळ तालिमी घेऊं लागली. मी वरसंशोधन करायचं ठरवलं.

आशासारख्या उमलत्या गुलाबाचा स्वीकार कोणीहि हसतमुखानं करील असं मला वाटतं होतं. पण लग्नाच्या बाजारांत रूपगुणापेक्षा इतर गोष्टींनाच खरं प्राधान्य असतं असं मला दिसून येऊं लागलं. रूप हवं असतं, शिक्षणहि पाहिजे असतं, पण तेवढं असल्यावर वधू पसंत ठरत नाही. इतर गोष्टी बारीक नजरेनं पाहिल्या जातात. आणि त्यांत जरा कुठं खुसपट निघालं की कार्य फिसकटतं. पत्रिका आणि हुंडा हे अडथळे जगजाहीरच आहेत. पण ध्यानीं मनीं न येणाऱ्या कारणासाठीहि अनुरूप वधुवरांचीं लग्नं मोडलेलीं मी पाहिलीं आहेत. इथल्या एका वकिलांच्या सुंदर मुलीचं लग्न तशाच एका तरूणाशी निश्चित झालं होतं. पत्रिका जमल्या होत्या आणि वकिलांनी हुंडाहि भरपूर देण्याची सिद्धता दाखविली होती. पण वरपक्ष सनातनी होता. वधूच्या मावशीनं एका आंतर्जातीय सज्जनाशी पुनर्विवाह केला होता. कोणाशीहि असला तरी तो पुनर्विवाह—म्हणजे तो धर्मबाह्य—निषिद्ध. शिवाय मावशी म्हणजे अगदी जवळची नातलग. अशा भ्रष्ट परिवारांतली मुलगी आपणास करून घेतां येत नाही असा जबाब वकिलांना मिळाला. आपण पुनर्विवाहाच्या मावशीला लग्नाला बोलावत नाही असं वकिलांनी सांगून पाठविलं. पण यापूर्वी तुमचा त्यांचा अन्नोदक व्यवहार झालाच असेल असं म्हणून वरपक्षानं आपला रुकार परत घेतला तो घेतलाच!

आशाच्या बाबतींत तर हीं सगळीं भुतं उठणार होतीं. आणि जिथं जिथं म्हणून मी शब्द टाकला तिथं तिथं तिच्या अनिर्णित जातीची ठेच लागूं लागली. जातिभेदाच्या कल्पना वेडगळ आहेत, त्या राष्ट्रघातकी आहेत, अमूक आहेत नी तमुक आहेत असं व्याख्यानांत बेधडक सांगणारे एक प्रागतिक पुढारीहि आपल्या बंधूंसाठी आशाची निवड करायला कचरले. 'माझी कांही हरकत नाही हो, पण बायकांची संमति नाही याला. मग थोडक्यासाठी त्यांचं मन कशाला मोडा?' हें त्यांचं लबाडीचं म्हणा की भित्रं म्हणा उत्तर ऐकून मी मनांतल्या मनांत हसलें.

पण इतर बाबतींत जसं आशानं मला कधी शिणवलं नाही, तसं या लग्नाच्या बाबतींतहि शिणवलं नाही. एके दिवशीं मला सराफांच्या घरचा गडी बोलवायला आला. कांहीतरी सामानसुमान करून पाहिजे असेल अशी माझी कल्पना. पण घरीं जातांच दादाजींनी मला माडीवर दिवाणखान्यांत बोलविलं आणि म्हटलं, "गुजाताई, आतापर्यंत आमच्या घरच्या चार लग्नकार्यांत तुम्ही आम्हाला खूपखूप मदत केली. आता तुमच्या घरच्या लग्नांत आमची कांही मदत झाली तर पाहावं म्हणून बोलावलंय तुम्हांला."

मी त्यांच्याकडं विस्मयानं पाहूं लागलें तेव्हा ते हसून म्हणाले, "तुमच्या आशाला मागणी आली आहे एक."

"कुठली? कुणाची?" मी विचारलं.

आरामखुर्चीवर वर्तमानपत्र वाचत बसलेल्या वृद्ध गृहस्थांकडं वळून दादाजी म्हणाले, "हं बोला आप्पासाहेब. याच गुजाताई. यांच्या मुलीलाच मागणी घालायची आहे तुम्हाला. मी आता जातों माझ्या उद्योगाला. सगळं स्पष्ट बोला. पहा जमतं का. गुजाताई, आप्पासाहेब तुम्हाला सगळं सांगतील. तुमचं जमलं तर त्यांत आनंद आहे एवढंच तुम्हांला सांगतों."

दादाजी निघून गेले. आप्पासाहेबांनी आपलं निवेदन सुरू केलं. 'माझं नांव आप्पा हें तुम्हाला कळलं. माझे मालक दौलतराव खासे यांच्यासाठी आपल्या मुलीला मागणी घालायला मी आलों आहे. ते ब्राह्मण नाहीत हें तुम्हाला प्रथमच सांगतों. ते शेतकरी आहेत. त्यांची चारपांचशे एकरांची जमीन आहे. बागाइत जिराइत सर्व प्रकार आहेत. मालक शेतकी विषयाचे पदवीधर आहेत.

आणि या ज्ञानाचा उपयोग स्वतःच्या जमिनींतच करायचा त्यांचा निर्धार असून त्यांनी तो अमलांत आणायला सुरवातहि केली आहे. ते घरचे एकटे आहेत. आतापर्यंत अज्ञान म्हणून त्यांच्या इस्टेटीची व्यवस्था सरकार पाहात होतं. आता त्यांनी कारभार आपल्या हातीं घेतला आहे. मी त्यांच्या वडिलांपासूनचा दिवाणजी आताहि त्यांच्याकडं आलों आहे. मालकांनी तुमची मुलगी पाहिली आहे. ती त्यांच्या मनांतहि भरली आहे."

"ते कसं काय ?" मी आश्चर्यानं विचारलं.

"ते थोडे दिवसांमागं इथं आले होते. सराफांचा आणि खाशांचा पूर्वापार घरोबा आहे. आमचे मालक दादाजींना वडिलांच्या ठिकाणीं मानतात, आणि दादाजीहि मालकांना आपल्या मुलाइतक्या ममतेनं वागवतात. ते मालकांना गाण्याला घेऊन गेले होते म्हणे. त्या बैठकींत तुमच्या मुलीला त्यांनी पाहिलं, तिचं गाणंहि ऐकलं. मालकांना सुपारीचंहि व्यसन नाही, पण गाणं म्हटलं की ते वेडे होतात. त्यांनी स्वतःहि थोडाफार अभ्यास केलाय संगीताचा. तुमची मुलगी त्याच वेळीं त्यांच्या मनांत भरली आणि म्हणूनच तुमची संमति विचारण्यासाठी त्यांनी मला इकडं पाठविलंय. मग बोला तुमचं काय म्हणणं आहे तें ?"

या अकल्पित सवालानं मी बावरल्यासारखी झालें. होय किंवा नाही म्हणणं अवघडच झालं. शिवाय कोणताहि निर्णय सावचितपणे घ्यायचा अशी माझ्या मनाची ठेवण. म्हणून मी आप्पासाहेबांना म्हटलं "आपल्या प्रश्नाचं असं तडकाफडकी उत्तर देणं अवघडच नाही का ? मला थोडा विचार करायला हवा. माझीं कांही वडीलधारीं माणसं आहेत त्यांचं मत घ्यायला हवं."

"बरोबर आहे. ह्या जन्माच्या गाठी बांधतांना घाई गर्दी होऊंच नये. सावचितपणे साधक बाधक पाहून काय तें केलं पाहिजे. तुम्ही आज सबंध दिवस विचारविनिमय करून मला उत्तर द्या. मी उद्यां परत जाईन. आणखी एक गोष्ट तुम्हाला सांगायची आहे. तुमचा या योजनेला रुकार मिळाला तर तुमच्याकडून आपल्या काय अपेक्षा आहेत हें मालक तुम्हाला स्वतः येऊन सांगतील."

मी परत आलें. दिवसभर विचार केला. बापूशिवाय कुणापाशी मी ही

गोष्ट काढली नाही. आशाला या विषयाचा सुगावा लागूं न देण्याची खबरदारी मी पहिल्यापासून घेत होतें. कारण आपल्या लग्नाच्या बाबतींत मुली अत्यंत उत्कंठित असतात. प्रयत्न कसलासा चालला आहे आणि तो साधतो की फसतो याकडं त्यांचं बारीकं लक्ष असतं. एकादा प्रयत्न फसल्याचं कळलं की त्यांच्या मनाला तीक्ष्ण चटके बसतात. शिवाय लग्नाचे विचार डोकींत घोळूं लागले की इतर गोष्टींकडं त्यांचं लक्ष लागेनासं होतं. उपवर मुलींची ही मनःस्थिति मला कळत असल्यामुळंच मी आशाला माझ्या उद्योगाची गंधवार्ताहि लागूं देत नव्हतें. म्हणूनच वारूताईलाहि मी अंधारांत ठेवीत आलें होतें. कारण वारूताई थट्टेनं तरी आशापाशी बोलल्याशिवाय राहिली नसती.

बापूंना विचारल्यावर ते म्हणाले, " ब्राम्हणाचं स्थळ मिळालं तर अधिक चांगलं. तुमच्या आमच्या दृष्टीनं म्हणतों मी. पण खाशांचं हें स्थळहि वाईट नाही. आशाची जन्मजात कुठंहि आडवी येणार. या खाशांना ती सांगितली नसलीस तर अवश्य सांग. आणि आशाचं हें जातिरहस्य मान्य करूनहि तिला पत्करायला ते तयार असले तर पुढच्या गोष्टी पाहतां येतील."

दुसरे दिवशीं सकाळीं सराफांच्या घरीं जाऊन मी आशाचा पूर्वेतिहास आप्पासाहेबांना सांगितला—" आशा आज माझी म्हणजे ब्राह्मणाची मुलगी आहे. ब्राह्मणकन्या म्हणून ती वाढली आहे. पण तिचे आईबाप कोण हें मलाच काय पण कुणालाहि माहित नाही. हीं लेकरं भगवानानं जन्माला घातलीं म्हणून त्यांच्या वडिलांच्या ठिकाणीं ' भगवान ' हेंच नांव मी ठेवून दिलं आहे आणि याचना न करतां तीं मला प्राप्त झाली म्हणून ' अयाचित ' असं उपनावहि निश्चित केलं. आपले खासेसाहेब मनांत भरलेल्या मुलीचा हा इतिहास प्रथम विचारांत घेऊं देत आणि मग—"

" गुजाताई, आम्हा जुन्या काळच्या माणसांची तऱ्हा आता उरली नाही. आमच्या जुन्या खानदानी घराण्यांत जातकुळीची चौकशी कसोशीनं व्हायची. आणि पदर लागला नाही तर अप्सरेसारखी बाईहि टाकाऊ ठरायची. पण आमचे मालक पुढारलेले आहेत. तुमच्या मुलीची हकीकत दादाजींकडून त्यांना कळली आहे व समजून उमजून ते तिचा स्वीकार करायला तयार झाले आहेत. तिच्या आईबापांचा पत्ता नाही हा कांही तिचा दोष नाही. पण हा दोष

तिच्या लग्नांत नडेल, म्हणूनच ते पुढं होत आहेत. नाहीतर तुमच्या ब्राह्मण मुलीला मागणी घालण्याचा अतिप्रसंग त्यांनी केला नसता."

आप्पासाहेबांच्या या खुलाशानं मला पुष्कळ धीर आला. खासेसाहेबांना भेटायला पाठवण्याबद्दल सांगून मी त्यांचा निरोप घेतला.

लौकरच खासेसाहेब मला येऊन भेटले. त्यांच्या रसिकतेबद्दल मला कौतुक वाटलंच होतं, त्यांचा रुबाबदारपणाहि माझ्या डोळ्यांत भरला होता. आता समक्ष भेटींत त्याचा जो विचारीपणा दिसून आला आणि जीवितांतील महत्त्वाचे प्रश्न सोडविण्यांतला त्यांचा दूरदर्शीपणा प्रत्ययाला आला, त्यानं तर मी पुरती भारून गेलें. खासेसाहेब ब्राह्मण नसले तरी विचारहीन ब्राह्मणाहून ते शतपट श्रेष्ठ आहेत असं मला वाटलं. ते कोणत्याहि जातीचे असले तरी मला पर्वा नाही. आशाला ते सुखासमाधानांत ठेवतील, तिच्या अंगच्या गुणांचा ते विकास करतील अशी माझी खात्री झाली आणि मी त्यांच्या म्हणण्याला रुकार देऊन टाकला. खासेसाहेबांनी योजलेली योजना अशी होती—

एक वर्षपर्यंत आशाला किंवा दुसऱ्या कोणालाहि या विषयाची वार्ता लागू द्यायची नाही. या मुदतींत दर आठ दिवशीं त्यांनी एकमेकाला भेटायचं. कंठेबुवांचं गाणं ऐकायला म्हणून त्यांनी यायचं आणि तिथं आशाशी परिचय करून घ्यायचा. तिच्याबरोबर विविध गोष्टी बोलून तिच्या मनोवृत्ति समजावून घ्यायच्या. या मुदतींत तिनं आपला जीवनक्रम व संगीताचा अभ्यास पहिल्यासारखा चालू ठेवायचा. त्यांनी माझ्यावर मात्र एक जबाबदारी टाकली. आजपर्यंत आशाला गृहकृत्यांचा सराव झाला नव्हता. मी लाड करण्यासाठी तिला कामाला हात लावूं देत नव्हतें असं नव्हे, पण तशी आवश्यकताच भासली नाही कधी. यापुढं मात्र सर्व प्रकारचीं गृहकृत्यं तिला करायला लावायचीं, स्वयंपाकपाण्यांत तिला सुगरण बनवायचं. मोलाच्या माणसाकडून सर्व काम करून घेणं त्यांना अशक्य नव्हतं, पण भातबराच्या बायकोनंदेखील घरकामं केलीं पाहिजेत असं त्यांचं मत होतं. कामाची बूझ आणि लाज आशाला असतां कामा नये, असा त्यांचा आग्रह होता. दर आठवड्यास त्यांनी तिला एक पुस्तक आणून द्यायचं आणि तें मी तिच्याकडून वाचून घ्यायचं, असं त्यांनी मला बजावलं. खासेसाहेब मांसाहारी असतील तर आशाचं कसं जमेल ही माझी

शंका. त्यावर ते म्हणाले— " मी मांसाहाराचा भोक्ता नसलों तरी तो निषिद्ध मानणाराहि नाही. कारणपरत्वे मी मांसभोजन घेतों व पाहुण्यांनाहि देतों. पण माझ्या पत्नीवर मी तें बळेंबळें केव्हाहि लादणार नाही. त्याचा स्त्रीकार तिनं खुशीनं केला तर ठीकच पण तेवढ्यापुरती ती अलिप्त राहिली तरी मी तिच्यावर सक्ति करणार नाही. "

खासेसाहेबांच्या साप्ताहिक भेटी सुरू झाल्या. कंठेबुवांना आणि आशालाहि एक रसिक श्रोता लाभल्याचा आनंद वाटला. गाण्यानंतर ते तास दोन तास गप्पागोष्टीहि करूं लागले. रिकाम्या हातानं ते कधी येत नसत. आपल्या बागेंतील फळफळावळ, ऊस, हुरडा, शेंगा, हरबरा, नवा गूळ असा कांही ना कांही मेवा ते आणायचे. आणि तो एवढातेवढा असायचा नाही कधी. बुवांबरोबर आम्हालाहि—म्हणजे आशालाहि—तो प्रसाद मिळावा हा त्यांचा उद्देश असे.

एकदोनदा त्यांनी आम्हांला हुरडा-वनभोजनाच्या निमित्तानं आपल्या मळयांत नेलं. तिथला तो देखावा रमणीय होता. त्यांत सौंदर्य होतं, विपुलता होती. बाजारांतून आणलेला एकादा ऊस, दोनचार मुसंबी, दहाबारा केळीं एवढंच पाहात आलेले आमचे दरिद्री डोळे, मोळीमोळी ऊस, टोपलीभर संत्रीं मुसंबीं आणि केळ्यांचा आख्खा घड पाहून दिपले. नसते दिपले तरच नवल. रतिबाचं अच्छेर पावशेर दूध आणि तेंहि पाणी मिसळून पातळ केलेलं आम्हाला माहित. पण खाशांच्या गड्यांनी म्हशीगाई दोहून भरलेल्या दुधाच्या चरव्या पाहूनच आमचं पोट भरल्यासारखं झालं.

आम्ही स्वयंपाक करून मळयांतल्या मंडळींना बामणी जेवण द्यायचं ठरलं होतं. शिध्याची तयारी खाशांनी करून ठेवली होती. दुधातुपाची विपुलता असल्यावर जेवणाला दुसरे सोपस्कार कशाला हवेत? तरीपण आक्कांनी आणि वारूताईंनी आपलं पाककौशल्य प्रकट करण्याची ती सुसंधि पूर्णपणे साधून घ्यायचं ठरवलं. मुलं बैल, घोडं, शेळीचीं करडं आणि गाईचीं वांसरं यांच्याबरोबर खेळण्यांत रंगून गेलीं. बापू, बाळाभाऊ, आप्पासाहेब दिवाणजीबरोबर उत्पन्न आणि खर्च यांच्या वाटाघाटींत रमले. धावेवरच्या आंब्याखाली बैठक ठोकून मोटकऱ्यांच्या गाण्याचा सारेगम लावण्यांत बुवा दंग झाले. मळ्याच्या बांधावर ओढ्याकाठी आरामशीर बसण्यासाठी आपण बांधलेल्या

कट्टा दाखविण्यासाठी खासेसाहेब आशाला घेऊन गेले. ही आमची पूर्वयोज-नाच होती. या एकांत भेटीत त्यांनी आशाला मागणी घालायची आणि तिचं मन अजमावायचं असं ठरलेलं होतं.

तास होऊन गेला तरी खासे परत आले नाहीत. माझ्या मनांत शंका कुशंका उठूं लागल्या. आपण कानोसा घेऊन यावं म्हणून मी तिकडं गेलें. एका झाडा-आड दडून मी पाहिलं. आणि मनांतल्या साऱ्या शंका पार पळाल्या. त्यांची जागा समाधानानं घेतली.

ओढ्याच्या झुळझुळ वाहणाऱ्या पाण्यांत पाय सोडून आशा बसली होती. तिच्या हाताचाहि पाण्याशी चाळा चालू होता. शेजारीं खासे पाण्यांत खडे फेकीत बसले होते. आशा आपलं आवडतं गाणं म्हणण्यांत दंग होती. आणि खासे त्यांत रंगले होते.

मला समजायला हवं होतं तें समजून आलं. आनंद झाला. खाशांच्या मळ्यां-तली पाहुणी नसून मी माझ्या आशाच्या घरींच आलें आहे असा एक वेगळ्या प्रकारचा भास मला झाला. आशा सुखांत पडली. मी मागल्या मागं परतून इतर मंडळींत सामील झालें. वनभोजन समारंभ आटोपून आम्ही घरीं परतलों. प्रत्येकजण आपल्यापरी खाशांच्या शेतकरी वैभवाचं वर्णन करीत होता. आशा गंभीर होती. आनंदमय सुखस्वप्नांत ती रमली होती. मीहि माझ्या मनाशी आशाच्या सुखमय जीवनाचीं चित्रं चितारण्यांत गर्क होतें.

घरीं आल्यावर आशा आपलं हृद्गत मला कधीं सांगते याची आतुरता मला लागली. पण मुली अशा वेळीं बावरलेल्या असतात. आपल्या लग्नाची गोष्ट अगदी जिव्हाळ्याच्या माणसापाशीहि बोलण्याचा त्यांना संकोच वाटतो. आशाहि तशीच बावरली होती. ती कांही बोलत नाही असं पाहून ती आपल्या-पासून आपलं गुपित छपवून ठेवते असा मला संशय आला. पण तिच्या मनः-स्थितीची कल्पना आल्यावर तो संशय दूर झाला, एवढंच नव्हे तर, या वेळीं आपण होऊन तिला धीर द्यायला पुढं व्हायलं हवं असं मला वाटलं. रात्रीं झोपतांना मी तिला कुशींत घेऊन म्हटलं, " आशा, वनभोजन तुला बाधलेलं दिसतंय ग ! "

" इश्श कांहीतरीच ! काय झालंय मला ? "

" तुझं मन ठिकाणावर राहिलेलं दिसत नाही. कुणीतरी तें काबीज केलेलं दिसतंय ! "

" कांहीतरीच असतं तुझं ताई ! "

" आशा, उडवाउडवी नको करूं. खरं सांग. भिऊं नको. खासेसाहेबांच्या भेटींत तुमचीं काय खलबतं झालीं ? शेतकरीणबाई होणार का तूं ? "

माझ्या या रोखठोक सवालानं आशा गांगरून गेली. ती मला अधिकच बिलगली आणि अडखळत अडखळत म्हणाली " ताई, मला—तूं—सांगशील तसं– "

मी सगळ्या गोष्टी तिला समजावून दिल्या. आशा खाशांची खाशी होण्यांत तिच्या जन्माचं कसं सार्थक होईल, तिनं कसं वागून आपलं आणि आपल्या नव्या जागेंतलं सुखसमाधान वाढवावं हें तिला पढविलं. माझी अनुमति कळल्यानं तिची चित्तवृत्ति हर्षभरित झाली.

आता परिवारांतल्या सर्व मंडळींपुढं गौप्यस्फोट करायला हरकत नव्हती. हा योग म्हणजे समसमासंयोग होय असंच सर्वांना वाटलं आणि सर्व मंडळी आनंदली. खाशांना रुकार कळविला. खासे-आशा विवाह नोंदण्यांत आला. आम्ही सर्वांनी वाजागाजा करायचा नाही म्हणतां म्हणतां खूप सोहाळे केले.

आशा आपल्या घरीं जायला निघाली. रत्न कोंदणांत बसलेलं पाहून एकीकडून कृतार्थता वाटत असली तरी पोरगी आपणाला दुरावणार ही कल्पना मनाला सहन होत नव्हती. मुलीचं कन्यादान करतांना समाधानाबरोबर आईबापांच्या आतड्याला पीळहि पडत असतो ह्याचा मी अनुभव घेत होतें आणि त्या वेळीं वारूताईसुद्धा माझ्याइतकीच विव्हल झाली होती. आशाच्या पाठवणीची आम्ही तयारी करीत होतों आणि त्या वेळीं आमच्या डोळ्यांतून पाणी गळत होतं. आशाहि सुन्न होऊन बसली होती.

दारांत गाडीच्या बैलांचे घुंगूर खुळखुळले. खासेसाहेब आपल्या नव्या घोड्यावरून आले. त्यांनी गड्याच्या हातीं घोडा दिला. घरांत येऊन सर्वांच्या पायावर डोई ठेवली. त्यांचाहि कंठ दाटून आला होता. माझ्यापुढं येऊन त्यांनी हात जोडून म्हटलं, " ताई, तुम्ही आपली आशा मला दिली. मी तुमच्या जीवाचा कलिजा हिरावून नेतों आहे असं समजूं नका. आशा तुमची

होती, आता माझी झाली तरीहि ती तुमचीच आहे. फार काय, तिनं आपल्या-बरोबर मलाहि तुमचा केला आहे. तुम्हाला मायाममता करायला एकाऐवजी दोन मुलं लाधलीं असं समजा आणि आम्हा दोघांवरहि आपल्या प्रेमाची वृष्टि करीत रहा. ताई, तुमच्या आशेसारखाच मीहि पोरका पोर आहे. मलादेखील आई मावशी हव्या आहेत." असं म्हणून त्यांनी फिरून एकवार माझ्या पायावर मस्तक ठेवलं. मला भडभडून आलं.

आशाची ओटी भरली. तिचा हुंदका अनावर होता. तिनं सर्वांना नमस्कार केले. आक्का मावशीला क्षण दोन क्षण बिलगून ती माझ्याकडे आली. माझ्या खांद्यावर मान ठेवतांच तिचा दुःखावेग अधिकच तीव्र झाला. ती हुंदके देत म्हणाली, " ताईऽ ! येऊं ? "

" ये बेटा " हे शब्द माझ्या मनांत उमटले पण ओठाबाहेर मात्र येऊं शकले नाहीत. नवरानवरीच्या हातावर दही घालून त्यांना निरोप दिला. घोड्याच्या टापा आणि घुंगुरांची खुळखुळ ऐकूं येईनाशी होईपर्यंत आम्ही दारांत थांबलों आणि जड अंतःकरणं घेऊन घरांत आलों.

आशा-खाशांचं तें प्रयाण अद्यापि जसंच्या तसं डोळ्यापुढं उभं राहतं आणि डोळे ओले करतं.

विश्वास तसा दुरावला, आशा अशी गेली. बारूताई जवळच असली तरी आता तिचं असं वेगळं जीवन निर्माण झालं आहे. माझी अशी मीच उरलें आहे. एकटी ! एकटी ! या एकटेपणाच्या जाणिवेनं माझ्या मनांत धस्स झालं !

पण जेव्हा जेव्हा माझं मन तिषण्ण आणि बावरल्यासारखं होतं तेव्हा रावजींचे शब्द मला आठवतात, आणि ते माझ्याठिकाणी नवा उत्साह निर्माण करतात. माझ्या एकटेपणाच्या भीतींतून रावजींच्या शब्दांनीच माझी मुक्तता केली. माण-सांनी तुडुंब भरलेल्या या जगांत माणूस एकटा कधींच असूं शकणार नाही. एक बाजूला झाला की दुसरा त्याची जागा पटकावतो. त्या दुसऱ्यालाहि आपलाच समजल्यावर माणसाला सोबतीसाठी हैराण व्हायची पाळी येणार नाही हे रावजींचे शब्द मला आठवले आणि मी त्यावर विचार करूं लागलें, तेव्हा मला कळून आलं की मीं एकटी नाही. द्रौपदी माझ्या सोबतीला आहे. आशा, बारूताई दूर जाणार म्हणूनच ती आली की काय कुणास ठाऊक ! तिला मोठ्या संकटां-

तून सोडवून आपण आणलं आणि तिचा जन्म कायमचा सुखी करण्याची जोखीम आता आपल्यावरच आहे. द्रौपदी ! माझी सोबतीण ! ती जवळ आहे. तिच्यासाठी धडपडणं, तिला जपणं हें आपलं काम आहे. मी एकटी नाही आणि मुक्तहि नाही.

द्रौपदी मला जड मुळीच वाटत नव्हती. कष्टसायासाचं तिला बाळकडूच होतं, त्यामुळं आमच्या भांडाराचीं कामं ती भरपूर करी. चार भाडोत्री बायांचं काम ती एकटी आवरी व तरीसुद्धा तिला भरपूर वेळ मिळे. फावल्या वेळांत तिनं आशाकडून अक्षरओळख करून घेतली होती. वारूताईकडून मशीनवर टीप मारण्याचीहि माहिती घेतली होती. इतकं करून आणखी कांही काम करून दोन पैसे मिळवावे असं तिचं म्हणणं होतं. गिरणींत कामाला जायची, नाहीतर बिड्या बांधायची कल्पना शेजारच्या बायांनी तिच्या डोक्यांत घातली होती. घरीं खंडीभर कामं करत असूनहि आपण ताईचं फुकट खातों असं तिला वाटत होतं. बाहेरचं कांहीतरी काम करून चार पैसे माझ्या हातीं देण्यासाठी तिच्या मनाची चुळबूळ चाललेली मला दिसून येत होती

द्रौपदीला मी निराधार, अडाणी पोरगी अशा क्षुद्र भावनेनं कधींच वागवलं नाहीं. जुनी का असेनात पण आशा वारूताईची पातळंपोलकीं मी तिला दिलीं. कुणबाऊ सुतड्याऐवजीं शहरी बायकांचा पोषाख तिच्या अंगावर आला. रोज केस विंचरून वेणी घालायची, रोज अंग धुवायचं, असे नियम मी तिला लावले. शिळंपाकं अन्न मी तिला कधी वाढलं नाही. नेहेमी जें आम्ही जेवत होतों तेंच बरोबर पान मांडून तिलाहि वाढत होतें. या साऱ्या वागणुकीचा परिणाम महिनाभरांतच माझ्या नजरेस आला. द्रौपदी तरणीताठी पोर. निकोप प्रकृतीची देणगी ती देवाकडून घेऊन आलेली. रूपानंहि वाईट नव्हती ती. पोटभर जेवण आणि निश्चिंत जीवन यामुळं तिच्या तोंडावर रसरशीतपणा चढूं लागला होता, आणि तिला बाहेर कामाला जाऊं देण्यांत त्याचाच मला धोका वाटत होता. गिरणींतले जमादार मुकादम बायामाणसावर टपलेले असतात. विडीकारखान्यांतहि असाच सावळा गोंधळ चालतो. याबद्दलच्या खऱ्या खोट्या अनेक अफवा मी ऐकल्या होत्या म्हणूनच अशा धोक्याच्या ठिकाणीं तिला जाऊं द्यायची माझी तयारी नव्हती. तरीपण स्वतःच्या कमाईचं समाधान तिला कसं

मिळवून द्यायचं हा प्रश्न माझ्या मनांतून मी दूर होऊं दिला नव्हता. तिच्यासाठी कांहीतरी उद्योग शोधायचा माझा प्रयत्न चालूंच होता.

शोधत राहिलं म्हणजे सांपडतं हा जगाचा अनुभव आहे. या वेळीं मलाहि तसा आला. आमचं शिवणकाम शक्य तेवढं आम्ही घरच्या घरींच करत असूं. पण आशाच्या लग्नाच्या वेळीं आम्हाला शिंप्याचं दुकान पाहावं लागलं. खाशांच्या-साठी कांही कपडे मला शिवून घ्यायचे होते आणि पुरुषी पेहेरावाची आम्हांला मुळींच माहिती नव्हती. शिवाय रेशमी कापडाचं काम. आधुनिक पद्धतीची बेतणी कापणी आणि सुबक शिवण नसेल तर भारी किंमतीचं कापड वाया गेल्यासारखं होईल हें मला भय. म्हणून खाशांसाठी लग्नाचा पोषाख मी गावांतले नावाजलेले शिंपी अकबर रुद्राप्पा डिसिल्व्हा यांच्याकडं शिवायला द्यायचं ठरविलं. त्यांना कपडे बेतायला मी घरीं बोलावलं तेव्हां मला वाटलं होतं की कोणी विजातीय साहेब येईल. पण एक शुद्ध ब्राम्हणी पेहेरावाचे तरुण गृहस्थ आले. त्यांनी काम घेतलं, सुबक केलं आणि सर्वांत समाधान-कारक गोष्ट म्हणजे ठरलेल्या वेळीं दिलं! शिलाईचं काम ठरलेल्या वेळीं मिळायचं म्हणजे नवलच नव्हे का?

या निमित्तानं झालेला अकबर रुद्राप्पांचा परिचय हळुहळु दृढ होत चालला. आम्ही अधिक अधिक कामं त्यांना देऊं लागलों. कामाच्या निमित्तानं एक-मेकांची ये जा सुरू झाल्यावर परस्परांना परस्परांची माहिती विचारून घेण्याची इच्छा झाल्याशिवाय कशी राहील? मी एकदा त्यांना विचारलं, 'तुमचं घर कुठं आहे? तुमची घरची मंडळी कोणकोण आहेत?'

"मला घर दार कांही नाही. भाऊबंद नाहीत. मी या जगांत एकटा आहे."

"मग हा एकटेपणा संपणार कधी? आता तुम्ही पैसे मिळवतां मग घर सजवायला हरकत असूं नये खरं म्हटलं तर?"

"माझी मुळींच हरकत नाही. पण घर सजवायला घरधनीण मिळायला पाहिजे ना? आणि मिळाली तरी ती माझ्या पसंतीला उतरली पाहिजे ना?"

"तुमच्यासारख्या मिळवत्या माणसाला मुली मी तूं करत येतलि."

"तीच तर पंचाइत आहे. मला माझ्या जातीची बायको पाहिजे आणि

माझ्या जातीचीं माणसं जगांत इतकीं थोडीं आहेत की मला जन्मभर अविवाहित राहावं लागणार अशी माझी जवळजवळ खात्री झाली आहे."

"अशी तुमची जात आहे तरी कोणती ?"

"माझी जात निर्लज्ज. निर्लज्ज जातीची कोणी छोकरी तुमच्या आढळांत आली तर अवश्य सांगा. रंगरूपाबद्दल चोखंदळपणा नाही. पत्रिका पहायची नाही. हुंडा दिला तरी घेणार नाही. फार काय, अशी बायको विकत घेतां आली तरी घेईन" असं म्हणून अकबर रुद्राप्पा खूप मोठ्यानं हसले.

अकबर रुद्राप्पांच्या बोलण्याची मलाहि मौज वाटली, आणि त्यामुळं माझी जिज्ञासाहि तीव्र झाली. मी त्यांना म्हटलं " मी फाजील चौकसखोर आहे असं तुम्हांला वाटेल, पण तुमच्यासंबंधीची खुलासेवार माहिती कळावी असं मला वाटूं लागलं आहे खरं. तुम्हाला त्यापासून त्रास होत असेल तर मात्र माझा आग्रह नाही."

"मला त्रास होण्याऐवजी तुम्हीच संतप्त व्हाल माझा इतिहास ऐकून. ऐका माझी हकीकत. मला फारसा वेळ नाही म्हणून थोडक्यांत पण सगळं कांही सांगतों. मी ब्राह्मण आईबापांच्या पोटीं जन्मलों. माझ्या बापाचं नाव रघुनाथ, आडनांव जोशी त्यांनी माझं नाव आत्माराम ठेवलं होतं रघुनाथ जोशी सज्जन होते म्हणतात. म्हणजेच व्यवहारशून्य होते. पाजी लोकांच्या जगांत हातांत जोडा घेऊन वागण्याचं व्यवहारज्ञान त्यांना नव्हतं. म्हणून त्यांना सुखसमाधानानं जगतां आलं नाही. त्यांच्या सख्ख्या भावांनीच त्यांच्या भोळेपणाचा फायदा घेतला. त्यांचं होतं नव्हतं तें गिळंकृत केलं. ते मेल्यावरसुद्धा भावांनी त्यांचा पिच्छा सोडला नाही. समाइक कुटुंब म्हणून विम्याचे पैसेदेखील त्यांनी लुबाडले. आईची हरकत कायद्यानं मान्य केली नाही. आईला पोटगी द्यायला लागूं नये म्हणून त्यांनी तिच्यावर भलतींसलतीं किटाळं आणलीं. माझ्यासह तिला देशोधडीला लावलं. माझी आई धीराची बाई होती. या हालअपेष्टांतहि तिनं माझं संगोपन केलं असतं, पण मी पांच वर्षांचा झालों न झालों तोंच ती मला कायमची सोडून गेली. त्या पुढचे माझे दिवस कसे गेले विचारूं नका. माणसाला जे जे म्हणून हालवनवास सोसावे लागणं शक्य आहे ते ते मी भोगले आहेत. मी भीक मागितली, चोऱ्या केल्या, तुरुंगांत गेलों. माणसांनीच

मला ही दुर्दशा दाखविली. माणसांच्या चांगुलपणावर माझा तिळाचासुद्धा विश्वास राहिलेला नाही. अपवादापुरती मला चार दोन भलीं माणसं भेटलीं, नाही असं नाही. रेफर्मेटरीचा रखवालदार अकबरशा हा माझा उपकारकर्ता. मी उपाशी भटकतों आहे असं पाहून ज्याला कळवळा आला आणि ज्यानं मलां चार दोन दिवस का होईना पण ममतेनं खाऊं पिऊं घातलं, तो मंडईत हमाली करणारा रुद्राप्पा हा माझा दुसरा धर्मपिता. आणि ज्यानं मला ख्रिस्ती समजून का होईना पण आपली शिवणकला मला दिली तो डिसिल्व्हा हा तिसरा तारण-वाला. या तिघांव्यतिरिक्त मी कोणाचाहि ऋणी नाही. या तिघांच्या उपकारा-च्या कृतज्ञतेनं मी स्वतःला अकबर रुद्राप्पा डिसिल्व्हा म्हणवून घेतों.

" जगांत दयाळू, परोपकारी लोक आहेत असं म्हणतात. पण मला मात्र या तिघांव्यतिरिक्त सारे राक्षसच भेटले आहेत. स्वतः चोरी करून माझ्यावर आळ घालणारे बदमाष मला भेटले आहेत. आणि माझ्या खिशांत चुरमुरे फुटाण्यापुरता ठेवलेला आणा हिसकावून घेणारे लुटारू माझ्या बोकांडीं बसले आहेत. पण अशा माणसांनी दुसरा एक उपकार नकळत माझ्यावर केला आहे. तो म्हणजे कष्टाची डर आणि लाज मला उरली नाही. मी कसल्याहि राबणु-कीला कचरत नाही आणि वाटेल तें करायला लाजत नाही. मी हॉटेलांत उष्टीं खरकटीं केलीं आहेत. कोळसेवाल्याचीं ओझीं उचललीं आहेत, फार काय, भाड्यानं मढीं जाळलीं पुरलीं आहेत. जीव जगवायला पैसा लागतो आणि तो मिळविण्यासाठी वाटेल तें काम मी बेधडक केलं आहे. आता धंदा चालू लागला ही गोष्ट वेगळी. पण तो हस्तगत होईपर्यंत मी काय केलं नाही हें मला विचारूं नका.

" माणसाच्या नीचपणाचा मला आणखीहि एक फायदा झाला. तो म्हणजे मला सगळे लोक नीच आहेत असं वाटतं हा. मी भेटणारा प्रत्येक माणूस आपला गळा कापणार असं समजून चालतों. कुणावर भिस्त ठेवीत नाही. कुणाची भीड ठेवींत नाही. कुणावर उपकार करत नाही. काय म्हणून उपकार करावा मी लोकांवर ? माझं बस्तान बरं बसलेलं पाहून जुनीं नवीं नातीं उकरून काढून कार्यसाधू लोक माझ्याकडं येतात. परवाचीच गोष्ट सांगतों तुम्हाला.

ज्यांनी माझ्या बापाला लुबाडलं, आईला पीडलं, मला देशोधडीला लावलं ते माझे काकोबा हुडकत आले मला. कसा लेकाला माझा पत्ता लागला कुणास ठाऊक! मी त्यांना ओळखणं शक्यच नव्हतं. पण त्यांनी आपलं नातं मला सांगितलं. माझ्याबद्दल खंडीभर आपुलकी दाखविली. घरीं चलण्याबद्दल आग्रह केला आणि माझं मन विरघळणार की काय असं मला वाटायला लागलं. पण लवकरच त्यांच्या या लोभांतलं इंगित मला उमगलं. आपल्या मुलींचं लग्न ठरवून ते आले होते आणि खर्चाची तरतूद करायची होती त्यांना. त्यांनी मी चारदोनशे रुपये उसने म्हणून का होईना द्यावेत अशी मागणी माझ्याकडं केली. मग मी काय केलं असेलसं वाटतं तुम्हाला? उठलों, थेरड्याची मानगूट पकडली आणि धक्का देऊन ढकलला रस्त्यावर. असा आहे माझा खाक्या. चांगला म्हटलंत तरी वाहवा, वाईट म्हटलंत तरीहि पर्वा नाही मला. माझ्या या अशा साच्यांत बसणारी निर्लज्ज बेफाम पोरगी कुठं असली तर दाखवा. वाटेल त्या जातीची, वाटेल त्या धर्माची चालेल."

आत्माराम जोशांचा हा खडबडीतपणा हा खरा नसून तो परिस्थितीमुळं निर्माण झालेला आहे, बदललेली अनुकूल परिस्थिति निर्माण झाल्यावर त्यांच्या अंतर्यामीच्या कोमल भावना प्रकट झाल्यावाचून राहणार नाहीत असं मला वाटलं. त्यांच्याशी झालेला माझा परिचय कारणाकारणानं झाला होता. आणि तीं कारणं संपल्यावर तो टिकून राहाणं अवश्य नव्हतं. पण रस्त्यांत कधी भेटल्यास 'कसं काय, ठीक आहे ना?' असं आपण होऊन ते विचारीत. यावरून ते म्हणतात तसे खरोखर माणूसघाणे नाहीत, त्यांनाहि माणसं हवींत आणि त्यांच्याशी सौजन्यानं वागणाऱ्याचे ते मित्र बनूं शकतील हें मी ओळखलं.

एके दिवशीं मी अशीच त्यांच्या दुकानीं गेलें. त्या वेळीं दुसऱ्या एका माणसावर ते उखडलेले होते. त्यांच्या एका साहाय्यकानं शिवण बिघडवलं होतं व चांगल्या कापडाची खराबी केली होती. जोशांना राग येणं रास्त असलं तरी ते वापरीत असलेली भाषा आणि तिच्या जोडीला त्यांनी उगारलेला हात मला अशिष्टपणाचा वाटला—गांवढळपणाचा वाटला. त्यांच्या मदतनीसालाहि तो हल्ला खपला नाही आणि तोहि तोंडाला येईल तें बोलत दुकानाबाहेर पडला.

मी म्हटलं " आत्माराम—की डिसिल्व्हा—काय वाटेल तें समजा, पण तुमचा हा संताप मला निष्कारण वाटतो. माणूस चुकला तरी त्याला एक वेळ क्षमा करायला पाहिजे. सर्वच चुकतात."

" पण माणसं असतात तीं दाखवलेली चूक सुधारतात आणि हीं दोन पायांचीं गाढवं चुकांमागून चुकाच करत राहातात. गुजाताई, आता कोकलत गेलेल्या या गाढवाची ही पहिली चूक नव्हती. दहावी होती. तुम्ही एक वेळ क्षमा करायला सांगतां. मी नऊ वेळां क्षमा केली हाच माझा गाढवपणा झाला. पहिल्या चुकीसरशीच दंडुका हाणून हाकलून द्यायला हवं होतं " असं म्हणून त्या माणसाच्या आणि त्याच्या जातीच्या इतरांच्या हलगर्जीपणामुळं आजवर किती नुकसान झालं याचा त्यांनी पाढा वाचला. आणि म्हटलं " हे लेकाचे आपल्याला जातीनं शिंपी म्हणवितात पण बेतल्याबरहुकूम शिवायचीहि अक्कल नाही गधड्यांना. काय सांगूं गुजाताई? मला शिवणकाम चोख करून देणारीं माणसं मिळालीं तर कामाचा ढीग पाडीन नुसता. बेतणं आणि शिवणं माझ्या एकट्याच्या हातून आवरत नाही. त्यामुळं गिऱ्हाइकांचीं बोलणीं खावीं लागतात. माणसावाचून नडलोंय बघा मी. मी कुणाची मदत फुकट मागतोंय असंहि नाही."

जोशांच्या या बोलण्यानं माझ्यापुढचा एक प्रश्न सुटल्यासारखं मला वाटलं. द्रौपदीला घरच्या घरीं करतां येण्यासारखं आणि स्वतः चार पैसे मिळविण्याची तिची हौस पुरविणारं हें काम आहे असं मला वाटलं आणि मी विचारलं, " तुमचं शिवण मी करून दिलं तर चालेल ?"

" आनंद होईल मला तुमचं सहकार्य मिळालं तर. मी तुम्हांला मशीन, दोरा, सर्व कांही पुरवीन आणि या बिनडोक माणसांना देतों त्याहून सवाई मजुरी देईन."

मी त्याच दिवशीं अगदी साध्या प्रकारचं काम मागून घेतलं. त्याबद्दल त्यांच्याकडून समजूत घेतली. घरीं मशीन होतंच. मी स्वतःच्या नजरेखाली द्रौपदीकडून शिलाई करून घेतली. दुसरे दिवशीं उजाडतांच केलेलं काम घेऊन मी द्रौपदीसह अक्बर रुद्राप्पांकडं गेलें आणि काम त्यांच्या टेबलावर ठेवत म्हटलं, " पहा बरं काम मनासारखं झालंय की नाही तें ?"

त्यांना काम आवडलं. त्यांनी रुपया काढून माझ्यापुढं ठेवला. मी म्हटलं, " आणखी काम असलं तर द्या. ही मुलगी शिलाई करते. ही काम नेईल, आणून देईल. हिला करायच्या कामाची प्रथमच नीट समजूत द्या म्हणजे चुका व्हायचा संभव कमी. त्यांतूनहि हिची चूक झाली तरी त्यामुळं होणारं नुकसान हिच्या दुसऱ्या मजुरींतून वळतं करून घ्या. हिला तुम्ही एक अवाक्षरहि बोलतां कामा नये ही माझी अट आहे कबूल आहे ? "

कंत्राट ठरलं. द्रौपदी काम आणूं लागली, परत पोंचवूं लागली. साध्या शर्ट चड्डयांपासून सूट पँटची शिलाईहि ती करूं लागली चारसहा महिन्यांत! तिची दरमहाची कमाई आता चाळीस रुपयांपर्यंत गेली. द्रौपदीला आपल्या जन्माचं सार्थक झाल्यासारखं वाटलं तर नवल कसलं ? आणखी एक गोष्ट घडत होती. ती प्रथम माझ्या लक्षांत आली नाही. पण असल्या गोष्टी झाकून तरी किती वेळ राहाणार ? आत्माराम जोशांचा आणि द्रौपदीचा परिचय जसजसा वाढत चालला तसतशी त्यांना परस्परांची ओढ लागत आहे असा मला भास होऊं लागला.

एके दिवशीं संध्याकाळीं मी घरीं आलें तेव्हां द्रोपदीचं शिवणयंत्र मला बंद दिसलं आणि द्रौपदीची चर्याहि उतरलेली दिसली. ' कां ग आज काम नाही का मिळालं ? ' मी विचारलं. त्यासरशी ती उसळून म्हणाली, " काम मिळालं ढीग पण मला करायचं नाही असल्या उफराट्या माणसाचं. आज एक आळ घातला, उद्या आणीक कसला घालील. पण गुमान ऐकून घ्यायला बसलीय ही द्रौपदी ! "

आत्माराम जोशांचा आणि तिचा कांहीतरी खटका उडाला आहे हें मी ओळखलं आणि तें प्रकरण आहे तरी काय हें समजावून घेण्यासाठी मी विचारलं, " तुझ्यावर कुणी, कसला आळ घातला ? आणि तूं काय केलंस हें सगळं सांग बघूं ? "

द्रौपदीनं सांगितलेली हकीकत अशी—परवां शिवायला आणलेले सहा शर्ट तिनं जोशांच्या दुकानीं नेऊन दिले. जोशांनी ते मोजून न घेतां कपाटांत ठेवायला सांगितले. तिनं ते ठेवले आणि दुसरं काम घेऊन आली. आज तें परत द्यायला गेली तेव्हा जोशांनी परवा एक शर्ट कमी आणल्याचा वहीम तिच्या-

वर घेतला व तो आणून देण्याबद्दल तिला तगादा केला. गिऱ्हाइकाला कपडे देतांना ते शर्ट कमी असल्याचं त्यांना उमगलं आणि द्रौपदीनंच तो गहाळ केला असला पाहिजे असं त्यांच्या मनानं घेतलं. आपण सहाचे सहा शर्ट बरोबर आणून दिले आहेत असं द्रौपदी प्रतिपादूं लागली, तेव्हा जोशांचा तिरसट स्वभाव उसळून वर आला आणि असली लबाडी माझ्यापुढं चालायची नाही, चोरलेला शर्ट परत आणून दिल्याशिवाय महिन्याच्या हिशोबांतली पैसुद्धा मिळणार नाही, एवढंच काय, चोरीची फिर्याद करूं असा धाक त्यांनी घातला. द्रौपदी इतर वेळीं गरीब गाय दिसली तरी खेड्यांतला जोमदारपणा तिच्याहि वृत्तींत आहे. चोरीचा आणि लबाडीचा आळ ती गुमान ऐकून घेईल हें शक्यच नव्हतं. जोशांच्यापेक्षाहि जोरानं ती त्यांच्यावर उखडली. पैसे बुडवायसाठी त्यांनी ही कुरापत काढली आणि आपल्यावर घाणेरडा आळ घातला तर आपल्या पायांत चेपल्या आहेत असं म्हणण्यापर्यंत तिनं मजल नेली. काम आणलं तेव्हाच का नाही मोजून घेतलं असा उलट सवाल तिनं केला, तेव्हा जोशांना उत्तर देतां येईना. पण आपला पाडाव कबूल करायला त्यांचासारखा ताठर स्वभावाचा माणूस थोडाच तयार होणार? शिवाय एका यःकश्चित बाईनं नोकरचाकरांपुढं आपला असा पाणउतारा करावा यानं त्यांचं पित्त अधिकच भडकलं आणि ते कडाडले, " तोंड बंद कर, नाही तर थोबाड फोडीन."

" मग तुझं राहील का जाग्यावर ? माझे हात कांही तुटले मोडले नाहीत. बघ की अंगाला हात लावून. मरदपणाची घमेंड नग माझ्याम्होरं."

जोशीबुवा खवळून उठले. द्रौपदीहि अवसान घेऊन सामना द्यायला सज्ज झाली. अतिप्रसंग होऊन आपल्या मालकाचं लोकांत हसं होऊं नये म्हणून दुकानांतला एक वयस्कर शिंपी मधे पडून त्यानं दोघांना दोन बाजूला केलं.

" चालती हो इथून " मागं सरतां सरतां जोशीबुवा गरजले.

" हिशेब चुकता कर आत्ताच्या आत्ता." द्रौपदी तितक्याच तावानं म्हणाली.

" कवडीसुद्धा मिळायची नाही."

" सगळेच्या सगळे पैसे चुकते केल्याशिवाय हलायची नाही मी इथनं. मी कांही भीक मागायला आलें नाही तुझ्याकडं. दंड मोडून काम केलंय."

" कवडी देणार नाही म्हणतोंना ? फिर्याद कर जा माझ्यावर."

" तूंच निघाला होतास फिर्याद करायला पोलिसाकडं, ती कर जा की. बघूंया तरी तुझा पोलीस माझं काय करतोय तें ? कर नाही त्याला डर कसली पोलीस नाही पोलिसाचा बा आला तरी ?"

ही बया हलकी सलकी नव्हे हें जोशीबुवांना उमगलं की काय कुणास ठाउक. त्यांनी दुसरीच कलाटणी दिली बोलण्याला. ते म्हणाले, " मी तुला ओळखीत नाही. मी गुजाताईला काम दिलंय. त्या नि मी पाहून घेऊं देणं घेणं. तुझ्यासारख्या बटकीबरोबर बोलायचं कारण नाही मला. त्यांना घेऊन ये मग पाहीन."

द्रौपदीनं हा सगळा प्रकार मला सांगितला तेव्हा मला वाईट वाटल्यावाचून राहिलं नाही. द्रौपदी आपल्या हातावर उत्तम प्रकारें निर्वाह करायला समर्थ झाली असा सुटकेचा विश्वास मी टाकीत होतें. फार काय, माझ्यावरची जोखीम जोशीबुवा निरंतरची आपल्याकडे घेतील अशी आशाहि मला वाटूं लागली होती. पण मधेच हा व्यत्यय आला. तो दूर होऊन हा गाडा फिरून कसा चालू करायचा ? आणि आता इतकं मी तूं झाल्यावर त्यांचा समेट होणं शक्य तरी कसं आहे असं भय मला वाटूं लागलं. मी फिकीरींत पडलेली पाहून द्रौपदी म्हणाली, " इतकं अवघड कसलं वाटतंय तुम्हाला बाई ? हा एकच माणूस आहे का काय जगांत ? दुसरे शंभर शिंपी आहेत. त्यांचं काम करीन मी. काम करणाऱ्याला हो काय कमी ? पाया पडत येतील लोक त्याच्याकडं."

द्रौपदीचा हा आत्मविश्वास पाहून मला कौतुक वाटलं तरी जोशांशी तिचं तसं तिरीमिरीला येणं मला बरं वाटलं नाही. पण जोशांनी तरी एकदम तिच्यावर चोरीचा आळ कां घ्यावा ? आणि आता भांडण इतकं विकोपाला गेल्यावर मी कांही मध्यस्थी केली तर तिला यश येणं कसं शक्य आहे ? असे एक ना अनेक विचार मला सतावून सोडूं लागले. द्रौपदीला आता दुसरा कोणता उद्योग निर्माण करायचा हा प्रश्नहि मला चैन पडूं देत नव्हता. चार दिवस स्वस्थ राहावं आणि बघावं कांही जुळतं का असं मी मनाशी ठरवलं.

पण मला वाटणारा पेच तिला वाटला नाही. दुसरेच दिवशीं तिनं आपल्यासाठी नवा व्यवसाय शोधून काढला. ती मला म्हणाली–" बाई मला एक भाता आणून द्या."

"भाता ? तो ग कशाला ?" मी विचारलं.

"कल्हई करायचं ठरवलंय मी. परवा इथं आली नव्हती का एक नवरा बायको ? आमच्या भांड्याला कल्हई लावून गेली बघा. रोज तीनचार रुपयांचं काम करतात तीं दोघं मिळून. मी एकटी दोन रुपयांचं तरी करीन बघितलंय मी कल्हई कशी करतात तें. तुमच्या ओळखीनं कामहि रगड मिळेल."

द्रौपदीची ही कल्पना मला एकदम आवडली आणि भाता, चिमटा, कथील, नवसागर अशी साधनसामुग्री कोठून, कशी पैदा करायची या विचाराला मी लागलें.

पण त्याच दिवशीं दुपारीं एका छोकऱ्याला पुढं घालून जोशीबुवा माझ्या घरीं येऊन दाखल झाले. "गुजाताई, द्रौपदी कुठं आहे ?" त्यांनी विचारलं.

"परसांत धुणं धुती आहे. कशाला हवी आहे ती ?"

"तिला बोलवा बाहेर."

"पण काम काय आहे तें तरी कळूं दे. कालचा प्रकार कळलाय मला. पुन्हा भांडण उकरून काढायचं असेल तर मी म्हणतें तुम्ही परत गेलेलं बरं. माझ्या घरांत त्याची उजळणी नको व्हायला."

"मी भांडणाची उजळणी करायला आलों नाही. तें मिटवायला आलोंय. बोलवा द्रौपदीला."

जोशांच्या चर्येवर त्यांच्या बोलण्याचा खरेपणा मला दिसून येत होता. म्हणून मी द्रौपदीला हाक मारली. ती हात पुशीत बाहेर येतांच जोशांनी त्या पोराच्या पाठींत एक गुद्दा हाणला आणि म्हटलं, "पाया पड चोरा या तुझ्या आईच्या. हं, पड, का आणीक हवंय ?"

पोरगा भेदरून ओरडला—"नको नको. मी पडतों पाया." आणि त्यानं द्रौपदीच्या पायावर एकदम डोकं ठेवलं. आम्ही दोघी गोंधळून गेलों या प्रकारानं. जोशीबुवांनी खुलासा केला. कपाटांतला शर्ट या पोरानं पळवला होता. दुकानाची झाडलोट करणारा हा छोकरा. त्याची ही चोरी त्याच्याच बरो

बरीच्या दुसऱ्या एका पोरानं बाहेर काढली होती. जोशांनी चोरी कशी बाहेर निघाली तें खुलासेवार सांगून म्हटलं, "द्रौपदी, या हरामखोराप्रमाणं मीहि तुझी क्षमा मागतों. पुरता तपास करून खात्री पटली नसतां मी तुझ्यावर वहीम घेतला ही माझी चूक झाली. गुजाताई, माझ्या संतापीपणामुळं तुमच्या द्रौपदीला त्रास झाला याबद्दल तुम्हीहि माफी केली पाहिजे मला. झालं गेलं विसरून जा आणि चालत आलं तसं आपलं काम पुढंहि चालू दे "

एकाद्या नाटकांत दिसतो तसा हा प्रयोग माझ्या घरीं घडला! जोशी महाशयांचा पश्चात्ताप नाटकी नव्हता. क्षुल्लक कारणामुळं भडकायला वेळ नाही आणि शांत व्हायलाहि वेळ नाही! मौज वाटली मला त्यांच्या या वृत्तीची. द्रौपदीचंहि तसंच. 'फिरून तोंड बघायची नाही या माणसाचं' असं घटके-पूर्वी म्हणणारी द्रौपदी जोशांच्या नरमाईनं विरघळली! शिलाईचं काम पहिल्या-सारखं करायला तयार झाली! कसं का होईना, कोडं सुटलं याचं मला समाधान वाटलं.

आठपंधरा दिवस झाले असतील या गोष्टीला. मध्यंतरी आशाचं आग्रहाचं बोलावणं आलं म्हणून मी पांचदहा दिवस तिच्याकडं जाऊन आलें. आपण आपली नवी भूमिका किती आनंदांत, किती व्यवस्थितपणानं साजरी करीत आहों हें दाखविण्यासाठीच पोरीनं मला बोलावलं होतं. आशा-खाशांच्या वागण्यांतला तो गोडवा आणि त्यामुळं दोघांच्याहि मुद्रेवर चमकणारी प्रसन्नता पाहून माझं मन आनंदानं फुलून गेलं होतं नुसतं. हातीं घेतलं त्याचं सोनं झालं या समाधानानं मी घरीं यायला निघालें तेव्हां खासे म्हणाले, " ताई, तुम्ही जायची अशी घाई कां चालवली आहे?"

" घाई कसली? चांगले आठ दिवस राहिलें की मी." मी म्हटलं.

" पाहुण्यांनी दिवस मोजावे ताई. मुलापाशी राहतांना आईनं असे दिवस तास मोजायचे नसतात. त्यांच्यापाशी निरंतर राहायचं असतं तिनं. ताई, तुम्ही कायमचं इथं राहावं अशी आमची इच्छा आहे."

" होय ग ताई, राहा ना इथंच. घरीं तरी काय जास्त आहे? कामाचा गाडाच ओढायचा ना? इथंदिखील हवं तितकं काम आहे तुला. बाग आहे, गुरंवासरं आहेत, करशील तितकं काम आहे इथं. कुणावर भार न घालतां

राहायचं असं तुझं व्रत माहीत आहे मला. तें इथंसुद्धा चालवतां येईल तुला. कामावर देखरेख ठेवायला पगारी माणसं ठेवावीं लागतात. त्यांच्याऐवजी तूं काम छान करशील आणि आपला भार कुणावर नाही असं समाधान तुला मिळेल. मग राहा ना ताई. हें बघ की नई, मला इथं सगळं कांही आहे. पण तुझ्या अंगावर लोळायचं सुख तेवढं नाही. काल तूं मला अंगावर लोळल्या-बद्दल 'असं काय कुकुल्या बाळासारखं करतेस ?' असं म्हणालीस. पण खरंच ताई, कुकुलं बाळ होऊन तुझ्या गळ्याला मिठी मारून बसावं असं मला वाटतं ग. आणि तुझी आठवण येऊन मला पुष्कळदा रडायलासुद्धा येतं बघ."

असं म्हणून आशा खरोखरीच रडायला लागली! तिचं तें रडं मला किती पण गोड वाटलं. आनंदाची भरती आली माझ्या मनांत आणि माझ्या डोळ्यांतहि आनंदाचे अश्रू तरारले. मी म्हटलं, "तुमचं घर म्हणजे माझी सत्तेची जागा आहे. मलातरी तुमच्याइतक्या मायेचीं माणसं कोण आहेत दुसरीं ? पण माझ्यावर आणखी कांही जबाबदाऱ्या आहेत. द्रौपदीला कुठं सोडूं मी ?"

"तिलाहि घेऊन ये" आशा एकदम म्हणाली. "तिथल्यापरीस तिला इथंच घरच्यासारखं वाटेल. ती खरी शेतकरीणच आहे. तूं तिला बळेंबळें शहरी बनवली आहेस."

आशाखाशांचा आग्रह तोंडदेखला नव्हता. अगदी मनापासून बोलवीत होतीं तीं मला. माझं मनहि त्या प्रेमळ आनंदमय वातावरणाला भुलूं लागलं होतं. पण पुन्हा मनांत आलं, हेंच प्रेमळ वातावरण माझ्या सत्तेच्या घरांत नव्हतं का ? तें टाकून बाहेर पडलें तें कां ? कुणा एका घराची मालकीण किंवा आजीबाई होऊन दिवस काढण्यासाठी का मी ही तपश्चर्या केली ? छे, स्वतःचं असं कांहीतरी वेगळं करून दाखवायचं, अडीअडचणींत सापडलेल्या कुणाला-तरी हाताशी धरून त्याचा जन्म आनंदमय करायचा ही आपली इच्छा होती आणि आहेहि. आशाची आई आणि खाशांची सासूबाई बनून त्यांच्या मळ्या-दळ्यांत मजा करण्यांत आपणांला खरं समाधान मिळायचं नाही. आपलं असं स्वतःचं कांहीतरी कार्य आपणाला पाहिजे.

आशाखाशांची समजूत घालणं सोपं नव्हतं. मी माझ्या मनचं हें गुपित त्यांना सांगितलं असतं तर तेंहि त्यांना पटलं नसतं. म्हणून मी म्हटलं, "मी

येणारच आहे नाहीतरी इथं राहायला. तुम्ही आग्रह कशाला हवा करायला? माझंच घर आहे हें आणि स्वतःच्या घरीं यायला बोलावणीं नाही लागत. पण आणखी थोडे दिवस जायला पाहिजेत. आक्कांच्या बेबीच्या लग्नाचं घाटतंय. त्या वेळीं मी तिथं असायला पाहिजे. अशा प्रसंगीं मी मदतीला नसलें तर त्यांची फार तारांबळ होईल. शिवाय वारूताईलासुद्धा माझी गरज आहे. आता पहिल्या खेपेचं बाळंतपण माहेरीं व्हायचं असतं ना?"

"अय्या! मावशीचं–? ताई, मुलगा झाल्याबरोबर मला ताबडतोब कळव हं. पत्राला उशीर होईल म्हणून माणूस पाठव ताबडतोब." आशा आनंदानं हुरळून म्हणाली.

"अग हें मला सांगायला का पाहिजे? पण बारशाला तुम्हीहि यायला हवं बरं का." मी खाशांच्याकडं पाहून म्हटलं, "तुमच्या बुवासाहेबांच्या आयुष्यांतला हा खरा आनंदोत्सव आहे. तो तुम्ही साजरा करायचा नाही तर कुणी?"

असं आनंदमय वातावरण निर्माण करून मी आशाखाशांचा निरोप घेतला. घरीं आलें. द्रौपदीचं काम व्यवस्थित चाललं होतं. इतकंच नव्हे तर ती खुशींत आहे असंही मला दिसलं. थोड्या दिवसांपूर्वी ज्या जोशीबुवांवर तिनं चेपली उगारली होती, ज्यांचं तोंडहि पहायला नको असं ती म्हणाली होती, त्याच जोशीबुवांची प्रशंसा आता तिच्या तोंडून ऐकूं येऊं लागली होती! मला थोडया दिवसांपूर्वी आलेला संशय त्यांच्या भांडणानं दूर झाला होता तो फिरून यायला लागला. मी मनांत म्हटलं, "सावध राहिलं पाहिजे. पोरगीची फसगत होऊं देतां कामा नये."

मला फार वेळ बुचकळयांत राहावं लागलं नाही एके दिवशीं जोशीबुवा अकल्पितपणे माझ्याकडं आले. आणि कसलाहि पाल्हाळ न लावतां आपल्या बेगुमानपणाला साजेल असा रोखठोक सवाल त्यांनी मला केला--

"गुजाताई, मागं तुम्ही मला माझ्या लग्नाबद्दल विचारलं होतं. आठवतंय?"

"हो न आठवायला काय झालं?" मी म्हणालें.

"त्यावर मी काय म्हटलं होतं हेंहि आठवत असेल तुम्हाला? माझ्या

जातीची मुलगी आणा असं मी तुम्हाला बोललों होतों. आता तुम्ही आणली आहे तशी मुलगी, ती मला पसंत आहे. मग कधी लावणार आमचं लग्न ?"

" मी मुलगी आणली ? ती कोण बाई ?"

" तुमची द्रौपदी."

" अहो, पण ती तुमच्या जातीची नाही. माझ्यापाशी असली तरी ती माझी मुलगी नव्हे. कुणब्याची पोर आहे ती. आणि तुम्ही तर ब्राह्मण—"

" मी तुम्हाला आधीच सांगून टाकली आहे माझी जात ती ब्राह्मण, कुणबी, ख्रिस्ती, मुसलमान अशी कोणतीहि नसून नुसती माणसाची आहे. माझ्या मनोवृत्तीशी जमणारी कोणतीहि मनुष्यकन्या मला चालेल. मग ती कोणत्याहि जातीच्या आईबापांच्या पोटीं आलेली असू दे. माझा आणि द्रौपदीचा स्वभावधर्म एक आहे—"

मी खो खो हसलें जोशांचं हें म्हणणं ऐकून. मी इतकंच म्हटलं—

" जोडाजोडीपर्यन्त मजल नेणाऱ्यांचा स्वभावधर्म एक !"

" होय गुजाताई. आपण आपलं काम चोख करायचं. मग कुणी कुरापत काढली की त्याची भीडभाड धरायची नाही, त्याला जोडा दाखवायचा असा माझ्या खाक्या आहे. द्रौपदीनंहि हाच बाणा माझ्या प्रत्ययाला आणून दिला आहे, म्हणूनच ती माझ्या मनांत भरली. पत्करलेलं काम वक्तशीर आणि सुबक करायचा आपला गुणहि तिनं मला दाखविला आहे. माझी जोडीदारीण व्हायला ती योग्य आहे अशी माझी खात्री पटली आहे म्हणून मी ही मागणी करतों आहे. बोला, तुमची तयारी आहे की नाही ?"

अशा प्रश्नाचं तडकाफडकी उत्तर मी तरी कसं देणार ? मी म्हटलं " द्रौपदीला विचारलं पाहिजे. तिचं मत घेतल्याशिवाय—"

" तिचं मत मी घेतलंय. तिची संमति आहे या गोष्टीला. तुमची हरकत नसेल तर ती तयार आहे—"

" पण तिच्या बाबतींत दुसरीहि एक अडचण आहे ती विवाहित मुलगी आहे. तिचा नवरा आज देशोधडीला लागला असला तरी अद्यापि जिवंत आहे. त्यानं तिला फारकतहि दिलेली नाही. विवाहित स्त्रीशी लग्न कसं करतां येईल तुम्हाला ?"

" सगळा विचार केलाय मी. एवढंच नव्हे, तर काडीमोड मिळविण्याची माझी खटपट चालूंहि झाली आहे. आठ पंधरा दिवसांत मला ती मिळेल. चार पैसे सोडले की सगळ्या गोष्टी जमतात."

जोशीबुवांनी आपली योजना आखून तयार ठेवली होती. मी म्हटलं, "तुम्ही म्हणतां आहां तसं घडून आलं तर वाईट नाही. पण फारकतीचं म्हणतां तें आधी करा. फारकतीचा कागद मला दाखवा म्हणजे मग पाहूं केव्हा आणि काय करायचं तें."

महिनासुद्धा उलटला नाही या गोष्टीला. जोशीबुवा माझ्यापुढं एक कागद फेकून म्हणाले, " ही घ्या गुजाताई तुमच्या द्रौपदीची सोडचिठ्ठी."

द्रौपदीच्या सासऱ्याला गाठून, त्याची समजूत घालून, पैशाचं आमिष दाखवून आणि तुरुंगांत प्रत्यक्ष भेट घ्यायला लावून त्यांनी ती सोडचिठ्ठी आणविली होती. जेलरसमोर ती चिठ्ठी लिहिली गेली होती आणि तिच्या खरेपणाबद्दल संशय घ्यायला जागा उरलेली नव्हती.

द्रौपदीची या गोष्टीला मान्यता आहे हें मी आधीच विचारून ठेवलं होतं. जोशीबुवांसारख्या तापट नवऱ्याची बाईल होण्यांत काय काय परिणाम होऊं शकतील, आज तो खुशींत असला तरी उद्या तो न बिथरेल याचा काय नेम, आणि बिथरला तर पुढं काय करायचं असं मी तिला मला सुचलं तें तें विचारलं. पण तिनं म्हटलं, " ते बिथरले आणि त्यांचं माझं जमेनासं झालं नी त्यांनी मला टाकलं तरी माझं काय नुकसान होणार आहे ? आज आपण राहतों तसं पुढंहि राहूं."

अखेर द्रौपदी जोशीणबाई झाली. जोशीद्रौपदीविवाह नोंदवून घेतला. मिय्या बिबी राजी मग काय करणार काजी म्हणतात, तसं आमचं झालं. त्यांनी आपण पक्कं करून ठेवलं होतं. आमच्या हरकती, शंका कांही म्हटल्या कांही त्यांना आडवूं शकलं नाही. दोघं सुखी झालीं, माझ्यावरची एक जबाबदारी हलकी झाली याचा मला आनंदच वाटला. द्रौपदीहि आपलं नवीन घरकुल सजवायला गेली. आतामात्र मी एकटी राहिलें. तरीपण या एकटेपणाची मला मौजच वाटूं लागली. शरीरानं मी एकटी होतें, पण मनानं ? माझं मन माझ्या एकटीभोवतीच घुटमळत नव्हतं. आतापर्यंत जो परिवार मी जमविला

त्याचेच विचार मला स्वस्थता लाभूं देत नव्हते. त्या विचारांत मला अपूर्व समाधान लाभत होतं, आणि त्याबरोबर अनाहूत काळज्याहि सतावून सोडत होत्या! ज्यांचं पत्नीपद मला लाभलं, ज्यांच्या सहवासाचा, प्रेमळपणाचा, हितोपदेशाचा लाभ मला झाला, त्यांच्या जीवनांत मी आनंद निर्माण करूं शकलें; जी गौरी क्षणभर माझ्या जीवनांत चमकून गेली, जिच्या आपत्तीनं मी व्याकुळ झालें तिला रावजींसारखा अनुरूप सहचर मिळाला या गोष्टींनी कृतार्थ झाल्यासारखं मला वाटत होतं. आक्का, बापू, बाळाभाऊ, डॉ. देव अशीं नवस करूनहि लाभणार नाहीत, अशीं माणसं आपल्यावर निरपेक्ष ममता करतात ही गोष्ट मला निरंतर आनंद देत होती. वारूताईसारखी बहीण मला लाभली. तिच्या उदास, रूक्ष जीवनांत माझ्या पुढाकारानं सुखासमाधानाचा फुलबाग फुलला. कंठेबुवांसारखा हतभागी जीव आपल्या प्रयत्नानं आज आनंदमय जीवन उपभोगूं लागला, आईबापांना मुकलेल्या आणि ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या कळपांत शिरूं लागलेल्या आशा विश्वासला मी हाताशी धरलं, धरल्यासारखं चीजहि झालं! मोठमोठ्या धनंत्तर माणसांच्या मुलींलाहि जो विद्याकलांचा लाभ होत नाही तो आशाला आपण करून दिला; तिला कर्तबगार, हौशी, प्रेमळ आणि संपन्न जोडीदार मिळाला. द्रौपदीसारख्या वेश्या जीवनाच्या खड्ड्यांत पडूं पाहणाऱ्या पोरीला आपल्यामुळं मानाचं गृहिणीपद मिळालं. या सर्व गोष्टी आठवून मला धन्यता वाटत होती. पण त्याबरोबरच ही बसलेली घडी विसकटून हे सुखी जीव पुन्हा दुःखी होतील का ही काळजीहि माझ्या मनांत येरझारा घालीत होती. प्रेम हें अशुभ शंका घेतं असं शहाणीं माणसं म्हणतात याचा मला अनुभव येऊं लागला. सर्व कांही मजेंत चाललेलं मी पाहात होतें. पण त्याच वेळीं अवघडलेल्या वारूताईची सुखरूप सुटका होईल का, रानांत गुराढोरांत वावरणाऱ्या आशाला साप किरडूं शिवेल, गाई म्हशीच्या शिंगानं ती जखमी होईल, खासे घोडा बेफाम सोडतात, त्यांना एकादे वेळीं अपघात होईल; हिरवट जोशीबुवा आणि तापट द्रौपदी यांचा खटका उडून दोघांचीं तोंडं दोन दिशांना होतील, अशा अकारण शंकाहि मनाला उद्विग्न करीत होत्या. विश्वासबद्दलची हुरहूर तर अखंड बेचैन करीत होती. मी सर्वांचं आपल्या परीनं चांगलं केलं पण विश्वासबाळाला मात्र देशोधडीला लावलं या जाणीवेनं

मी स्वतःवर संतापत होतें. सुख आणि दुःख यांचा एकदम अनुभव घेत मी दिवस कंठत होतें आता.

मी जगाच्या प्रवासाला घराबाहेर पडलें पण या प्रवासांत मी मिळवलं काय हा प्रश्नहि राहून राहून मनांत येत होता. कांहीतरी स्वतःचं असं महत्कार्य उभारावं, तें यशस्वी करून दाखवावं ही आपली महत्वाकांक्षा होती, ती कितीशी सिद्धीस गेली ? चार माणसं भोवती जमवून संसारी माणसाचं जीवन आपण जगलों नाही का ? आणि हें जीवन काय आपणाला घरांत राहूनच जगतां आलं नसतं? देशसेवा, समाजकार्य असं कांहीतरी लोकांचे डोळे दिपविण्यासारखं कार्य आपणाला काय करतां आलं ? कांहीच नाही. या कल्पनेनं मन उद्विग्न झाल्यासारखं होई. नाही म्हणायला रावजींचा उपदेश मी यथाशक्ति आचरून दाखविला येवढं एक समाधान मला वाटत होतं. जातिभेदाच्या, रूढीच्या कल्पना मनांतून काढून टाकल्या पाहिजेत आणि माणुसकी हा एकच धर्म माणसानं पाळला पाहिजे हा रावजींचा उपदेश मी पाळला होता. निदान त्या उपदेशाशी विसंगत अशी कोणतीहि गोष्ट माझ्या हातून घडली नव्हती.

समाधान आणि काळजी, कृतार्थता आणि विफलता, यांनी माझ्या मनाची अशी ओढाताण चालविली होती.

---

# ४

आज मी माझी ज्ञानेश्वरी—रावजींचीं जुनीं पत्रें—वाचायला घेतलीं आहेत. मी त्यांत रंगून गेलें आहे. त्यांतल्या एका भागानं मला हवं हवं असं वाटत होतं—पण तें काय हें उमगत नव्हतं, तें गवसल्यासारखं मला वाटतं आहे. रावजींनी या पत्रांत माझ्या भित्र्या मनाची थट्टा केली होती, आणि म्हटलं होतं, " आपल्या एकट्याविषयीचा विचार करत बसणं हें आंधळेपणाचं लक्षण आहे. माणसानं स्वतःला इतकं महत्व कां द्यावं ? या दुनियेंतल्या अब्जावधि माणसांच्या गर्दीत आपण किती क्षुद्र ! समुद्रकिनाऱ्यावरील वाळूच्या एका

कणाएवढीच आपणाला किंमत. आपल्या एकट्याच्या सुखदुःखाची मिजास बाळगण्यापेक्षा अखिल मानवजातीच्या सुखदुःखाशी समरस व्हावं, सर्वांचं दुःख हलकं करायला झटावं, सर्वांच्या सुखांत भर घालायला धडपडावं. सर्वांच्या सुखांतला वाटा आपल्याला मिळतोच. सर्वांबरोबर दुःख भोगतांना त्याचे चटके दुःसह होत नाहीत. फार मोठं ओझं पेलण्याची कुवत आपणांत नसेल तर शेजारच्या पाजारच्या चार मंडळींना सुखी करण्याचं ध्येय ठेवावं. दुसऱ्यामधे स्वतःला मिसळून घ्यावं म्हणजे आपलीं सुखदुःखं तीव्र होत नाहीत."

रावजींचा हा उपदेश मी मनांत साठवून ठेवलेला आहे. त्याप्रमाणंच आतापर्यंत माझी वाटचाल झाली. पण कितीदा वाचलं तरी ह्या लिखाणांत मला नवा संदेश मिळाल्यासारखं वाटतं. आजहि मला असंच वाटत आहे. आतापर्यंत जमविलेला परिवार माझ्यापासून दूर झाला आहे. आता दुसरा मेळावा जमवून त्यांना सुखी करण्याचा उद्योग कां करूं नये? बघावी कांही-तरी धडपड करून. स्वस्थ बसायचं म्हणजे कसंसंच वाटतंय.

नवं कांहीतरी करावं ही माझी इच्छा जागच्या जागीं विराम पावणार काय?

माझ्या वाट्याला हें आजारीपण का आलं? उन्हापावसांत, थंडीवाऱ्यांत खणखणीत असायची माझी प्रकृति! शिळंपाकं खाऊन मी पचावलं. क्षणाची उसंत न घेतां दिवसभर राबलें, रात्रीच्या रात्री जागून काढल्या, पण माझ्या प्रकृतीनं कधी जिकीर केली नाही! माझा हा घट्टपणा पाहून आक्का म्हणायच्या, "गुजाताई, देवानं तुझं शरीर लोखंडाचं बनवलं काय ग?" त्यांचे उद्गार ऐकले म्हणजे मला आनंद वाटायचा. पण आज माझ्या अंगांत तें त्राण कुठं उरलं आहे? घासभर भात खातांच पोट भरून येतंय. नुसती देवाला जाऊन आलें तर बसल्या जागेवरून उठूं नये असं वाटायला लागलंय. औषध घ्यायला पाहिजे—

× × ×

अंगावर दुखणं काढलं. पण झाकून थोडेंच राहणार? सगळ्यांनी काहूर उठवलंय मला बरं नाही आणि मी त्यांच्याकडं जाऊन पडून राहावं म्हणून. पण या लोभांतल्या माणसांवरहि भार घालायचं जीवावर येतंय. लोकांसाठी

झिजावं हा माझ्या मनाचा हव्यास अजून कमी झालेला नाही. दुसऱ्यांनी आपल्यासाठी कष्ट करावे ही कल्पनासुद्धा बरी वाटत नाही मनाला.

× × ×

शरीर थकलं म्हणजे मनहि दुबळं होतं की काय कोणास ठाऊक ! मी आता फारा दिवसांची सोबती नाही असं मला वाटायला लागलंय. आणि खरोखरच तसं घडलं तर त्यांत वाईट तरी काय आहे ? उलट लौकर झालं तरच बरं म्हणतें मी. आज आक्का, वारूताई, द्रौपदी माझ्यासाठी खस्ता खात आहेत, त्यांचे कष्ट तरी वाचतील. मरणाचं भय मला मुळीच वाटत नाही. मी अगदी समाधानानं मरणाचं स्वागत करीन. पण खरंच समाधानानं मी मरणाच्या स्वाधीन होईन का ? नाही व्हायची. अजून एका गोष्टीची माझी इच्छा पुरी झाली नाही. रावजींनी माझ्या कार्याचं मोल जाणलं तरच मी खरी समाधानी होईन. आणखी एक इच्छा अपुरी आहे माझी. माझ्या विश्वासबाळाला मी डोळे भरून पाहिलं नाही अजून. मरायच्या आधी होईल का त्याची भेट ?

रावजींना तर पत्र टाकलंय. विश्वासला टाकलं असतं पण पोर पृथ्वीच्या पाठीवर कुठं आहे हें माहीत कुठं आहे ? नशीब माझं !

× × ×

आज कसंबसं लिहितें आहे मी. अनीमियाच्या भरतीला ताप आला आहे. आणि त्यानं माझ्या अंगांतली होती नव्हती ती तीहि शक्ति संपुष्टांत आल्यासारखं वाटतंय. चार आठ दिवस तरी आता मी या जगांत राहीन की नाही कुणास ठाऊक ? डॉक्टर माझ्या शरीरांत औषधं टोचताहेत आणि मी यांतूनहि उठेन असं आक्काबापूंना सांगत आहेत मानवी जीवित हें महाविचित्र गूढ आहे. अगदी अखेरचा श्वास निघून जाईपर्यंत हताश होऊं नये आणि प्रयत्नांत शिथिलता आणूं नये असं डॉक्टर म्हणतात. त्यांचा हा आशावादीपणा पाहून वाटतं कीं आपणतरी धीर कां सोडावा ? पण नाहीच यश आलं तर ? न येईना ? वाईट काय होणार त्यांत ? तरीपण ह्यांचं दर्शन झालं नाही, विश्वासबाळ भेटला नाही आणि हा सगळा प्रेमळ परिवार सोडून जायचं— मी कांही पुण्य केलं असेल आणि स्वर्ग म्हणतात तो खराच मला लाभणार असेल तर

तिथं आक्का वारूताईसारख्यांचा गोड सहवास मला लाभेल का? अशक्य—तिथं देव म्हणायचे कोणी अवतीभवती जमतील. पण त्यांच्यापेक्षा हीं देव-माणसंच मला हवीहवीशीं वाटत आहेत. त्यांनी माझ्यावर ममता केली. सख्ख्या भावाबहिणीला माणसं झिडकारतात, पोटच्या गोळ्याला विटतात. पण या साऱ्या माणसांनी लेक म्हणून, बहिण म्हणून माझ्यावर माया केली. मी जगांत येऊन दुसरं कांही मिळवलं नाही तरी या माणसांचं प्रेम मी मिळवलं--त्यांनी तें मला दिलं-या साऱ्यांना माझी स्मृति उडाली नाही तंवरच नमस्कार करून घेतें.

माझ्या जगांतल्या वाटचालीची ही कहाणी मी साधेल तेव्हा, साधेल तशी लिहिली. कुणाला मुद्दाम सांगावी असं काय असणार माझ्या कहाणींत? विद्या, कर्तबगारी, पैसा यांच्या जोरावर मोठमोठीं कार्यं करून जगाचे डोळे दिपवणारे मोठमोठे लोक आहेत. माझ्यापाशी यांतलं कांही नाही. या मोठ्या माणसांच्या चरित्रकथा लिहिल्या जातात आणि त्यापासून लोकांना स्फूर्ति मिळते, महत्कार्याची प्रेरणा मिळते. माझ्या हातून मोठं कांही घडलं नाही आणि म्हणून माझ्या या भारुडांत कोणाला कसला संदेश मिळायचा नाही. मी लोकांसाठी हें लिहिलंच नाही मुळी. माझ्या आयुष्यांत भेटलेल्या माणसांच्या हातीं माझ्यामागं हें भारूड गेलं आणि त्यांनी तें वाचलं तर आपली गुजाताई कशी होती, हें त्यांना आठवावं एवढाच माझा उद्देश. हें भारूड लिहितांना आजपर्यंत मी आनंद अनुभवला हा फायदा माझ्यापुरता मला मिळाला. खूप झालं हें.

माझ्याभोवती जमलेलीं हीं मायेचीं माणसं सर्व बाजूंनी चांगलीं आहेत. पण त्यांचा एका बाबतींत मात्र भारी कठोरपणा आहे. तो मला त्रासदायक वाटतो. मी अशा मरणाच्या दारांत घुटमळत असतांना तरी त्यांनी माझा असा कोंडमारा करायला नको होता. माणसाची अखेरची इच्छा पुरवावी असं म्हणतात. फाशी द्यायच्या माणसाला शेवटच्या घडीला काय हवं तें देतात म्हणे! पण माझीं हीं मायेचीं माणसं मला हवं आहे तेंच नेमकं करूं देत नाहीत. त्यांनी आतापर्यंत माझ्यावर प्रेम केलं. आज माझ्यासाठीं दिवसरात्र जागून परोपरीच्या खस्ता खात आहेत. बुवांनी गायनशाळा बंद ठेवली आहे. बाळाभाऊ छाप-

खान्याकडं फिरकत नाहीत. बापू रजा घेऊन डॉक्टरकडं खेटे घालताहेत. जोशीबुवांचं दुकानहि बंदच आहे म्हणे. बागामळ्यांचा अटाला मोकळा टाकून खाशांच्या येरझाऱ्याहि चालू आहेत. तान्हया नंदाला पाळण्यांत कुरकुरत ठेवून वारूताई माझे पाय चेपायला धावते आहे. आक्कांनी जेवण सोडलंय म्हणे. पण मला दूध पाजायला त्या पुढं सरसावत आहेत. इस्पितळांतल्या पगारी दाया करणार नाहीत अशी सेवाचाकरी आशाद्रौपदींनी चालविली आहे माझी. त्यांच्या या एकेक गोष्टी पाहून माझा ऊर भरून येतो आहे. त्यांचे हे उपकार फेडायला किती जन्म घ्यावे लागतील असं वाटतंय. पण उपकार आणि आभार हे शब्दहि उच्चारण्याची बंदी केली आहे यांनी मला. मी आभाराचं नांव काढीन तर या बायांनी आपल्या आणि आपल्या मुलालेकरांच्या गळ्याची शपथ घातली आहे मला. केवढी कठोर शिक्षा ही !

तरीपण माझं कर्तव्य मला केलंच पाहिजे ह्यांनी शपथेच्या कुलुपानं माझं तोंड बंद करून ठेवलं असलं, तरी माझी लेखणी कांही काढून घेतली नाही. तीहि घेतील एखादे वेळीं आणि आता काढूनच कशाला घ्यायला पाहिजे? मलाच आज ती खाली ठेवावी लागणार आहे. पण ती ठेवायच्या आधी मी तिच्या तोंडानं या साऱ्या उपकारी माणसांना माझे प्रणिपात सादर करतें. लहान असतील तीं वयानं असतील, कृतीनं आणि वृत्तीनं ती थोरच आहेत. म्हणून सगळ्यांनाच माझे शतशः प्रणाम आहेत. त्यांचे माझ्यावर अनंत उपकार झाले आहेत, आणि त्याबद्दल मी साऱ्याजणांचे मनोभावानं आभार मानतें. आणि या सर्वांचं सदैव भलं होवो अशी जगाचा जो कोणी चालक असेल त्याच्यापाशी मागणं मागतें.

५

माझ्या फिरत्या व्यवसायाचा मला आतांशा वीट आल्यासारखं झालं आहे. वास्तविक मी प्रवासाचा षोकी. अंगांत तारुण्याची रग असतांना वाटेल तेवढी दगदग सोसून मी प्रवासाची संधि साधून घेत असे. पण अलीकडं ती रग राहिली नाही आणि आगगाड्या मोटारींतील खेचाखेची, यामुळं प्रवास म्हणजे अंगावर काटा उभा राहतो. आजहि घराबाहेर पडतांना मला मोठं संकट ओढ-वल्यासारखं वाटत होतं. या वेळच्या माझ्या सफरींत नाही म्हणायला एकच आनंदाची गोष्ट होती. ती म्हणजे बापूआक्का या मित्र दंपतीची फार दिवसांनी मला भेट होणार होती.

मी बापूंच्या घरांत पाऊल टाकलं पण मला तिथं नेहमीचा उल्हसितपणा दिसला नाही. बापू माझ्या स्वागताला पुढं आले, 'आला, बरं झालं' असं त्यांनी म्हटलंहि, पण त्यांच्या चर्येवर मला तजेला दिसेना! सौ. आक्कांची चर्याहि काळजीनं भारावलेलीच दिसली. ज्यांना मी कधी पाहिलं नव्हतं अशी अनोळखी मंडळी तिथं वावरतांना दिसली. त्यांच्या तोंडावर देखील उदासीन-ताच पसरलेली होती. त्या वातावरणांत मला गुदमरल्यासारखं झालं. मला त्याचं कारण कळेना. 'ठीक आहेना सगळं?' मी उलगडा करून घेण्याच्या हेतूनं बापूंना विचारलं.

'हं' एवढंच उद्गारून बापू थांबले. आक्का कांही न बोलतां आंत गेल्या. जातांना त्यांनी डोळयाला पदर लावलेला दिसला. मी भ्यालों, बापूकडं भेदर-लेल्या नजरेनं पाहूं लागलों. माझा आशय ओळखून बापू म्हणाले, "आमची गुजाताई माहित आहे तुला दादा?"

"हो. पंधरा वर्षांमागं मी तुमच्याकडं आलों होतों तेव्हा—"

"गुजाताईहि नुकतीच आली होती. 'असलं ध्यान कुठून पैदा केलं' अशी तूं हिची थट्टाहि केली होतीस तेव्हा. आठवतं?"

"हो आठवतं तर. आणि त्या थट्टेनं आक्का रागावल्याहि होत्या माझ्यावर. त्यानंतर आतापर्यंत मी तुमच्या त्या गुजाताईंना कधी पाहिलं नसलं तरी

त्यांची आठवण मला वरचेवर होते. आमच्या हिला आक्कांचीं पत्रं अधूनमधून येतात. त्या प्रत्येक पत्रांत 'आमच्या गुजाताईनं हें केलं आणि आमच्या गुजाताईनं असं म्हटलं,' असं कांहीतरी असतं. आक्कांच्या मनावर गुजाताईचा चांगलाच पगडा दिसतो."

"हो. सगळ्यांचंच असं होतं. तुझ्या लिहिण्याबोलण्यांतहि 'आमचा दाजी' उमटतोच की एकसारखा! वैशिष्टयपूर्ण माणसं लाभलीं म्हणजे त्यांची छाप कुणाच्याहि मनावर अशीच बसते. गुजाताईनं तिच्याच काय पण आम्हा सगळ्यांच्या मनावर आपली छाप पाडली आहे. पण आज तिचं असं होऊन बसलंय."

बापूंचा स्वर बोलतां बोलतां घोघरा झाला. त्यांचे डोळे डबडबले मी भिऊन गेलों. "काय झालंय गुजाताईंना?" मी अधीरतेनं विचारलं.

"मरणाच्या दारांत बसली आहे बिचारी."

"चला, पाहूं या."

"थांब थोडा वेळ. तिचा डोळा लागलाय म्हणे. सारी रात्र जागून काढली. आतां चहा स्नान उरकून घे. मग जाऊं तिच्याकडं."

मी माझीं आन्हिकं उरकलीं. बापू आक्का आणि मी बोलत बसलों थोडा-वेळ. माझ्या घरचा क्षेमसमाचार त्यांनी विचारून घेतला. मीहि त्यांच्याकडलं नवल विशेष ऐकून घेतलं. आमचं बोलणं चाललं होतं तरी आक्का बापूंचे डोळे आणि आणि मन गुजाताईच्या खाटेकडंच लागलेलीं आहेत हें मला समजून येत होतं.

आशा घाईघाईनं येऊन म्हणाली—"आक्का, डॉक्टर आलेत. इंजेक्शन देणार आहेत. पाणी उकळायचंय."

"आधण सळसळतंच आहे. आलेंच घेऊन" आक्का स्टोव्ह पातेलं घेऊन उठल्याच. आम्ही त्यांच्या मागोमाग गुजाताईच्या खोलीकडं निघालों.

गुजाताई आपल्या जागीं निश्चेष्ट पडल्या होत्या. त्यांच्या आजूबाजूस माणसं होतीं. पण कोणाचा श्वासोच्छ्वासहि ऐकूं येत नव्हता, इतकी स्तब्धता तिथं नांदत होती. खोलींत अवर्णनीय स्वच्छता दिसत होती. गुजाताईचं आंथरूण पांघरूण परीटघडीचं होतं. सामानसुमानाची कसलीहि अडगळ खोलींत नव्हती.

उदबत्तीचा सुगंध तिथं दरवळत होता. मृत्यूची छाया पसरल्याचं आधी कळलं नसतं तर कुणी श्रीमंतीण मजेनं राजविलासांचा उपभोग घेत आहे असं मला वाटलं असतं तो देखावा पाहून.

डॉक्टरनी इंजेक्शन दिलं. गुजाताईनं डोळे उघडले आणि क्षीण स्वरांत विचारलं–"झालं नाही का अजून? निष्फळ प्रयत्न कां करतांहांत हा डॉक्टर?"

"बोलायचं नाही असं सांगितलंय ना मी?" डॉक्टर म्हणाले.

गुजाताई हसल्या आणि त्यांनी फिरून डोळे मिटून घेतले.

आम्ही बाहेर आलों, बापूंनी डॉक्टरकडे प्रश्नार्थक नजर टाकली.

"कालच्यापेक्षा वाईट तरी खास नाही," डॉक्टरांच्या या शेऱ्यानंसुद्धा सर्वांना हायसं वाटलं. डॉक्टर म्हणाले— "ताप कमी झालाय. आता तो फार करून चढायचा नाही. आजचं हें तिसरं इंजेक्शन. पाचवं इंजेक्शन दिल्यावर काय रीॲक्शन होईल त्यावर यशापयश अवलंबून आहे. परवाचा दिवस उलटल्यावर मग—"

"मग परवापावतर थांबतां कशाला डॉक्टर? आजच देऊन टाका की उरलेलीं दोनहि इंजेक्शनं. लवकर बरी होऊं दे हो ही माझी माय!" द्रौपदीचा हा भाबडा उतावळेपणा डॉक्टरनाच काय पण आम्हांलाहि गमतीदार वाटला.

डॉक्टर गेले. आशा बाहेर आली नी आक्कांच्या कानाला लागली. आक्का माझ्याकडं पाहून हसल्या व म्हणाल्या "गुजाताईनं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत तुम्हांला हेरलं बरं का दादा. पाहुण्यांना घेऊन ये असा निरोप आलाय तिचा."

आक्काबरोबर मी गुजाताईच्या खोलींत गेलों. आपले जीर्ण हात चादरीबाहेर काढून त्यांनी मला नमस्कार केला, आणि विचारलं—"केव्हा आलां? नवं पुस्तक काय काढलं? फार दिवसांत पुस्तक नाही म्हणून रागावल्या आहेत आक्का तुमच्यावर!"

"तुम्ही अगोदर बऱ्या व्हा. वाटेल तितकीं पुस्तकं देईन मी आक्कांना म्हणजे तुम्हाला." मी उत्तर दिलं.

"तुम्ही आलां बरं वाटलं. तुम्हो चहा घेतला की नाही? साडेनऊ होऊन गेले असतील."

" माझा चहा झाला. अगदी ताज्या दुधाचा फक्कड चहा दिला आक्कांनी मला. पण आता आमच्या कांही चौकश्या करायच्या नाहीत तुम्ही. डॉक्टरनी बोलायचं नाही अशी ताकीद दिली आहे ना तुम्हाला ? "

" बरं तर नाही बोलत लक्षांत आहे माझ्या ती ताकीद. "

आम्ही बाहेर आलों. आक्कांनी मला विचारलं " दादा, यांतून गुजाताई वाचेल असं वाटतं तुम्हाला ? "

" हो. तुम्हा सर्वांच्या सदिच्छा फलद्रूप झाल्यावाचून कशा राहतील ? " कांहीतरी बोललं पाहिजे म्हणून मी म्हणालों.

" तुमच्या तोंडांत साखर पडो. माझी गुजाताई बरी झाली तर तुम्हाला मुद्दाम बोलावून आणून खाल तितके पेढे आणि प्याल तितका निरशा दुधाचा चहा देईन. "

गुजाताईच्या आठवणीमागून आठवणी आक्का सांगत होत्या. आणि त्यांच्या एकेक गोष्टीनं आक्कांचे डोळे पाणावत होते. गुजाताईनी केलेल्या एकेक गोष्टी ऐकून मला नवल वाटत होतं. त्यांच्या विचाराची थोरवी पटत होती आणि प्रथमदर्शनी ही कोणीतरी अशीच वेंधळी बाई पोट भरण्यासाठी आक्काबापूंच्या आश्रयाला आली असेल हा संशय घेतल्याबद्दल मी मनांतल्या मनांत ओशाळलों होतों.

जेवण करून बापू आणि मी वामकुक्षी करावी म्हणून पडलों खरे, पण बापूंनी चालविलेल्या गुजाख्यानांत आम्ही दोघांहे तल्लीन होऊन गेलों तिसरे प्रहरच्या चहाची वर्दी येईपर्यंत आम्ही एकाच—गुजाताईच्या जीवनकथेंत गुंग होऊन राहिलों होतों.

आमचा चहा पुरता झाला नाही तोंच दरवाजांत " ताई " अशी प्रेमळ हाक ऐकू आली. सर्वच मंडळी उत्सुकतेनं बाहेर गेलों.

आशानं भावाला पाहतांच ' कोण ? विश्वास ? ' असं म्हणून त्याच्याकडं धावच घेतली. विश्वासचं तिच्याकडं लक्ष कुठं होतं ?

" ताई ! ताई कुठं आहे माझी ? " तो अधिरतेनं म्हणाला. वारूताई दिसतांच तिला मिठी मारून त्यानं विचारलं, " मावशी, असं एकमेकाकडं बघतां

काय तुम्ही ? ताई कुठं आहे सांगा ना ? कामाला गेलीय कुठं ? कुठं गेली आहे ? "

" धीर धर माझ्या राजा, तुझी ताई इथंच आहे. तुझ्या वाटेकडंच डोळे लावून पडली आहे बिचारी. आतातरी आलास हें नशीब तुझं आणि तिचं. " वारूताईचा कंठ दाटून आला. विश्वास गोंधळून गेला. काय प्रकार आहे याची त्याला काय कल्पना असणार ?

आक्कांनी पुढं होऊन त्याला जवळ घेतलं आणि समजुतीच्या स्वरांत म्हटलं " बरं का विश्वासबाळ, तुझ्या ताईला की नाही बरं नाही आहे आताशा. तिला स्वस्थ पडून राहायला सांगितलंय डॉक्टरनी. तिच्याजवळ गेल्यावर तिच्या अंगाशी झटायचं नाही लहानपणासारखं आणि मोठ्यानं बोलायचंहि नाही फार. "

" असं कसं हो झालं ? माझ्या कामाला सुरवातीलाच असा नाट लागला " विश्वास हताशपणे बोलला.

" कसलं काम काढलं आहेस तूं ? "

" माझ्या चित्रांचं आणि पुतळ्यांचं प्रदर्शन मांडलंय मुंबईत. तें पहायला घेऊन जाणार होतों मी ताईला. ताईचा पुतळा केलाय मी. "

" तो रे केव्हां आणि कशावरनं केलास ? " वारूताईनं विचारलं.

" पळून जातांना तिचा फोटो नेला होता मी. शिवाय ताईचं चित्र माझ्या मनावर कोरलेलंच आहे. पुतळा फारच छान झाला आहे मावशी. हें बघ कला-दर्शानं काय लिहिलंय. " विश्वासनं कलादर्शाचा अंक खिशांतून काढला. आम्ही तो आळीपाळीनं पाहिला. त्यांत गुजाताईच्या पुतळ्याचा फोटो होता. त्याच्या खालीं ' माउली ' हें विश्वासनं दिलेलंच नांव छापलं होतं. ' या बाल-कलावंतानं चित्रसृष्टींत दाखविलेलं हें कौशल्य सामान्य प्रेक्षकांना तर चित्ता-कर्षक वाटेलच पण चित्रकार शिल्पकारांचेहि प्रशंसोद्गार मिळवील यात शंका नाही. ' असा अभिप्राय देऊन संपादकांनी बालचित्रकार विश्वासचं अभिनंदन केलं होतं.

" पोरानं नांव काढलं. गुजाताईच्या हाताला यश आलं " बापू म्हणाले,

" वारूताई, छोकरा प्रवासानं शिणला असेल. त्याला आधी खायप्यायला दे. नंतर गुजाताईला जाग येईल. मग मायलेकरांची भेट कर."

वारूताई विश्वासला घेऊन घरांत गेल्या.

" मरण यायचंच असलं तरी समाधानानं मरेल बिचारी आतां " बापू म्हणाले.

" का वंगाळ बोलतां असं ? ताई लेकाचं कौतुक करायला बऱ्या होऊन पुष्कळ दिवस जगतील असं बोला की, " द्रौपदी थोड्या चिडक्या आवाजांत बोलली.

गुजाताई जाग्या झाल्याची वर्दी आल्यावर आम्ही एकेक जण त्यांच्या खोलींत जमूं लागलों. विश्वासच्या आगमनाची वार्ता आक्कांनी टप्प्याटप्प्यानं त्यांना कळविली. या वेळीं आनंदसुद्धा सहन करण्याची कुवत गुजाताईच्या विकल मनांत नव्हती. म्हणूनच जाणत्या आक्कांनी ती आनंदवार्ता हळूहळू सांगून गुजाताईची मनोभूमिका तयार करून ठेवली. तरीहि विश्वास-गुजाताईच्या पुनर्भेटीचा व्हायचा तोच परिणाम झाला. खोलींत पाऊल टाकतांच ' ताईऽऽग ' म्हणत विश्वासनं गुजाताईच्या अंगावर झेप घेतली आणि ' आलास माझ्या राजा ' म्हणत गुजाताईहि त्याला कवटाळण्यासाठीं ताडकन उठून बसल्या ! हा धसमुसळेपणा त्यांना वावडा होता आणि त्यांतच त्यांचं हृदय एकदम बंद पडलं असतं. वारूताईद्रौपदींनी गुजाताईंना सावरून हलके हलके निजवलं.

" नका ग मला अशा बांधून ठेवूं. लेकरू किती दिवसांनी भेटतंय " असं म्हणत त्यांनी डोळे मिटले. त्यांचं तोंड बंद झालं. श्वासोच्छ्वास मंद झाला.

आक्का धावून गेल्या. त्यांनी हलक्या हातानं गुजाताईचं कपाळ, छाती चेपायला सुरवात केली. हर्षाचा तो झटका ओसरून गुजाताईनं डोळे उघडले.

" बरं का गुजाताई, तुझा विश्वासबाळ आता तुला भेटला. आता तो अगदी तुझ्यापाशी राहाणार आहे. मग घाई का करतेस अशी ? अशानं--"

" दिवा विझेल. " आक्कांचं अर्धवट राहिलेलं वाक्य गुजाताईनं पुरे केलं. " पण आक्का आता खुशाल विझूं दे तो. ज्याच्यासाठी जीव घुटमळत होता तो माझा--"

" त्या तुझ्या विश्वासासाठीच तुझा दिवा अखंड तेवत राहिला पाहिजे. आशेनं आलंय लेकरू. त्याच्यासाठी तुला जगलं पाहिजे. तुझा हा धसमुसळेपणा मुळीच चालायचा नाही. स्वस्थ, अगदी स्वस्थ पड. विश्वास तूंहि नुसता बसून रहा. हलुहलु कपाळ हातपाय चेप ताईचं फार बोलूं नको "

विश्वास गुपचूप ताईपाशी बसला. वस्तुस्थितीची भेसुरता त्यालाहि उमगली होती की काय कोणास ठाऊक ! त्याची पहिली उल्हसित चर्या भीतिग्रस्त झाली होती.

विश्वास जवळ बसतांच त्याला अंग चेपूं देण्याऐवजी गुजाताईंनीच त्याचं तोंड कुरवाळायला सुरवात केली. त्याचं डोकं आपल्या अंगावर टेकवून त्याच्या मस्तकावर आपलं मुख नमवलं. दोघांचीहि प्रेमसमाधि लागली.

दोघांच्याहि डोळ्यांतून अश्रू पाझरत होते. आम्हा इतर मंडळींचे डोळेहि तो देखावा पाहून भरून आले.

" आशा, मुसुंबी आहेत ना ग ? " गुजाताईंनी विचारलं.

" आहेत ना. हवीं तेवढीं आहेत. आज आणखी करंडी येईल. देऊं तुला?"

" दे. चांगलं बघून सोल हं. "

आशानं बशी पुढं करतांच त्यांतली फोड उचलून गुजाताईंनी विश्वासच्या तोंडांत घातली.

तें वात्सल्य पाहून मला वाटलं-मीच विश्वास असतों तर काय बहार झाली असती !

कंठेबुवा आले आणि त्यांच्या मागून पांच चार मिनिटांत दरवाजांत घोड्याच्या टापा वाजल्या. खासेसाहेबहि आले होते त्यांनी पिशवींतून संत्री-मुसंबी आणि फुलांचा पुडा काढून आशाच्या हातीं दिला. आशानं शेवंती, गुलाब बाहेर काढले आणि गुजाताईंच्या उशाशी ठेवले.

" आशा, माझी ट्रंक घेतेस इकडं ? " गुजाताई म्हणाल्या.

आशानं ताईंची ट्रंक उघडली.

" त्यांत वरचं पुडकं आहे तें काढ आणि दादांना दे " माझ्याकडं वळून त्या म्हणाल्या, " दादा, हें पुडकं इथं उघडायचं नाही. घरीं गेल्यावर तें उघडून बघा. तुमच्या लेखनव्यवसायाला त्याचा कांही उपयोग झाला तर

बघा. त्यांत कांही तथ्य वाटलं नाही तर पाणी तापवायचा बंब असेलच तुमच्या घरीं! आता आणखी एक काम कर आशा तो रेशमी रुमालांत बांधून ठेवलेला फोटो काढ आणि माझ्यासमोर टेबलावर ठेव."

आशानं फोटो काढून टेबलावर ठेवला. एका सुंदर दांपत्याचा तो फोटो होता. गुजाताईंनी उशागतचे गेंद उचलून आपल्या मस्तकीं लावले आणि आशाच्या हातीं देत म्हटलं, "ही माझी पूजा वाहा त्यांना. माझे देव आहेत ते."

आशानं फुलं फोटोवर बसवलीं. गुजाताईंनी हात जोडले. आणि सद्गदित होऊन बोलायला सुरवात केली, "आक्का, तुम्हा कुणाला आतांपर्यंत मी थांग-पत्ता लागूं दिला नाही पण आता सारं सांगून टाकतें. हे रावजी माझे देव. ह्या देवांचं अर्धांगीपद मला लाभलं. ह्यांनी संतुष्ट रहावं, जगांत आपला प्रकाश पाडावा म्हणून मी होऊन यांच्यापासून दूर झालें. माझी इच्छा होती तसे हे आता सुखी झाले आहेत. यांचं मरते वेळीं दर्शन व्हावं ही एकच आशा अपुरी राहिली आहे. माझं पत्र ह्यांना मिळालंच नाही की काय कुणास ठाऊक!" गुजाताईंनी एक जड सुस्कारा सोडून कपाळाला हात लावला.

"बुवा, आता भजन म्हणा थोडं. आशा, बेटा, तूंहि म्हण त्यांच्या बरोबर." आशा--बुवांनी तंबोरीच्या सुरांत आपला सूर मिळवला. आणि गुजाताईंचं आवडतं गीत सुरू केलं. गुजाताई डोळे मिटून पडल्या होत्या. त्यांनी हात जोडले होते.

आम्ही सारी मंडळी त्या भजनानंदांत तल्लीन झालों होतों.

दरवाज्यांत टांगा थांबल्याचा आवाज आला. डॉक्टर असतील असं वाटलं. आणि ते असले तर आंत येतीलच अशा कल्पनेनं आम्ही आपल्या जागीं बसून राहिलों. पण जोशीबुवा आंत येऊन म्हणाले, "कुणी पाहुणे आलेले दिसताहेत."

बापू आणि मी बाहेर आलों. साध्या स्वच्छ पोशाखांतले एक गृहस्थ आणि तशाच पेहरावांतली एक स्त्री मूल पोटाशी धरून अंगणांत आलेली दिसली. चेहरे ओळखीचे वाटले. पण एकदम उमज पडला नाही.

"रुकमिणीबाई सुदामे इथंच असतात ना?" त्या गृहस्थांनी विचारलं.

" या नावाच्या बाई इथं कोणी नाहीत. " बापूंनी उत्तर दिलं.

" बापूसाहेब गोडसे आपणच ना ? आपल्या घरीं त्या आहेत आणि त्या आजारी आहेत असं पत्र आलंय मला. "

मला एकदम उमज पडला आणि मी उद्गारलों, " आपण रावजी ? बापू, फोटो आताच पाहिलात ना ? या. योग्य वेळीं आलां आपण. "

ते रावजी होते. गुजाताईच्या हाकेसरशी ते धावून आले होते ! गुजाताईच्या निष्ठेचं साफल्य झालं होतं. त्यांना पतीच्या पुनर्दर्शनानं किती समाधान वाटेल तें वाटो, पण उत्कंठित पत्नीला चिरविरहानंतर मृत्युशय्येवर का होईना पण पतीचं दर्शन घडणार या कल्पनेनं माझं मन समाधानानं भरून आलं.

" मन शांत ठेवा हं. भावना अनावर होऊं देऊं नका. ताईंची प्रकृति कमालीची हळूवार झालेली आहे " अशा सूचना देत रावजीगौरींना आम्ही खोलींत नेलं. आमच्या चाहुलीनं बुवांनी प्रार्थनागीत थांबवलं. त्यासरशी गुजाताई डोळे उघडून म्हणाल्या, " चालूं देना बुवा. मला बरं वाटतंय विश्वेश्वराची ही आळवणी ऐकतांना. "

बुवांनी वीणा उचलली. पण मी म्हटलं, " बुवा, थांबा जरासे. तुमच्या आळवणीनं खरोखरच देव धावून आलाय. गुजाताई, शांत राहून पहा हं, हें कोण आलंय तें. "

गुजाताईची क्षीण नजर रावजीगौरीकडं गेली.

" आपण--आपण यायचं ? आणि गौरी तूंहि ? " गुजाताईंना अधिक बोलवेनाच. विश्वासच्या भेटीचीच. पुनरावृत्ति झाली.

गौरी पुढं सरसावली, रावजीहि धावले. दोघे दोहोकडं बसलीं. गुजाताईचे जीर्ण हात त्यांनीं आपल्या हातीं घेतले.

" रुक्मा !--उशीर झाला यायला म्हणून रागावलीस ? " रावजींचा घसा दाटून आला.

" बाई ! तुम्ही--माझा राग तुम्हाला ? मी- मी- " गौरीलाहि बोलवेना.

गुजाताईंनी डोळे उघडले. नजर रावजीगौरीवर खिळवली. गौरीच्या हातांतला हात सोडवून घेतला आणि तिच्या मांडीवरच्या छबडक्याचं तोंड

कुरवाळायला सुरवात केली. सगळ्यांचीं तोंडं बंद होतीं. डोळे डबडबले होते. त्यामुळं अंधळ्या मुक्यांची मैफल जमल्याचा भास होत होता! एकाद्या कादंबरींत शोभणाऱ्या घटना घडून येत होत्या आणि एकाद्या रसाळ काव्याला खुलावट आणतील अशा कोमल भावभावनांचं माधुर्य आम्ही अनुभवत होतों.

